


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

फेमसच्या असंख्य चाहत्यांस ही दिवाळी आनंदाची जावो!

या दीपावलीपासून नवी फेमस चित्रावली!

★ नरगिस ★ ★ मेरा सोहाग ★

★ मोहन ★ ★ चूल आणि मूल ★

निर्मिति – फेमस पिक्चर्स, कॅडेल रोड, मुंबई २८

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




– :दिग्दर्शन: –

**नि ति न बो स**

संगीत— अनिल विश्वास * गीतें— अर्जू व संतोषी.

* भूमिका :— रंजना, दिलीप कुमार शिवाय पहारी संन्याल, मोती चाटर्जी आणि नवी तारका **मीरा मिश्र**

तळपदे प्रॉडक्शन्सची

अभिनव मराठी कलाकृति

## "का र स्था न"

निर्माते : श्री. केशव तळपदे

मूळ कथा : श्री. भा. वि. वरेरकर

संवाद : श्री. दीनानाथ प्रभू

पद्यें : श्री. माडगूळकर, श्री. राजा बढे श्री. प्रभाकर गुप्ते

संगीत : श्री. दत्ता जावडेकर.

**–: भूमिका :–**

श्री. शंकर कुळकर्णी, श्री. जोग, श्री. विनय काळे श्री. माडगूळकर, श्री. वसंत शिंदे, सरस्वती बोडस मालती नाफडे, शांता ठाकूर इत्यादि.

'दीपावली' च्या मंगल मुहूर्तावर—

"मंगल पिक्चर्स"

मराठी बोलपट–रसिकांना मंगल आश्वासन देत आहे कीं पहिलें मंगल चित्र—

## "जय मल्हारी"

सूत्रधार : बाबुराव पेंढारकर, कथा : दि. द. पाटील,
पद्यें : ग. दि. माडगूळकर संगीत : दादा चांदेकर;

–: भूमिका :–

ललिता पवार ※ सुमति गुप्ते
बाबुराव पेंढारकर | माडगूळकर
चंद्रकांत, जोग | झुजारराव
सरस्वती बोडस ※ अबपकर इत्यादि

**लवकरच पडद्यावर येईल.**

**रसिकांना यंदाची दिवाळी व येतें वर्ष 'मंगलप्रद' होवो.**

**जय–हिंद फिल्म एक्स्चेंज**, ११६, चर्नीरोड, मुंबई नं. ४


अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



## अन्नटंचाई व चौरस आहार.

लढाई संपली; पण लढाईबरोबरच अन्नटंचाईचें संकट मात्र निवारण झालें नाहीं त्यासाठीं चाललेला लढा अजून चालूच आहे.

हरेक खेडें अन्नधान्याच्या बाबतींत स्वतःपुरतें स्वयंपूर्ण बनणें हा अन्नटंचाईवरचा खरा उपाय आहे. प्रांतिक व मध्यवर्ति सरकारांनीं प्रयत्नांची पराकाष्ठा केली तर हिंदुस्थानांत एक वर्षांतच धान्यसमृद्ध होऊन सुबत्ता नांदेल.

अन्नधान्याच्या टंचाईचे दुष्परिणाम शरीराला विशेष जाणवूं न देण्यासाठीं, मिळणारा अन्नद्रव्याचा यथायोग्य उपयोग करून आहार शक्यतों समतोल राखावयाचा असतो. निरोगी राहून दीर्घायुष्य साधण्यासाठींही समतोल चौरस आहार अवश्य आहे.

**महायुद्धाच्या काळाप्रमाणेंच अन्नटंचाईच्या चालू काळांतही चौरस व समतोल आहाराच्या तत्वाला जागून सरस, पौष्टिक व आरोग्यदायक खाद्यपेयें पुरवीत राहिल्यामुळें बी. तांबे लिमिटेडचीं सर्व भोजन व उपाहार केंद्रें प्रत्यक आरोग्यदक्ष नागरिकांचें आश्रय व आरमस्थान झालीं आहेत.**






**हेड ऑफीस,**
**१७१ गिरगांव रोड**
**मुंबई, फोन २०६८७**

**१. हमाम स्ट्रीट, फोर्ट.**
**२. ठाकुरद्वार, ३. संझगिरीसदन (कोना रेस्टॉरं)**





## सिक्स एग्यु मिक्चर

मलेरिया-इन्फूलएंझा
व
इतर सर्व तापांवर रामबाण
(घोडा छाप तापाचा दवा)

**मादन सन्स आणि कंपनी**
क्वॉलिफाइड केमिस्ट
३५२, अबदुल रहिमान स्ट्रीट मुंबई.



## आझाद हिंद—

बलशाली सैन्यच विजय मिळवूं शकते.
शक्तिपूर्ण पराक्रमावरच

**आझाद हिंद सेनेनीं शौर्य गाजविलें. तुम्हीं मांसाहारी बनून शक्ति वाढवा!**

●

**अंड्यांचे व्यापारी**
**सातारकर यांचें**

## हेल्थ होम

**गोखले हॉलसमोर, पुणें.**


अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

आधुनिक यंत्र-सामुग्रीनें लौकरच सुसज्ज होणारें
चित्रोत्पादन मंदिर



# दि पूना स्टूडिओज् लिमिटेड,

शंकरशेट रोड, पुणें २

आपल्या हितचिंतकांना दीपावली आणि नवीन वर्ष
सुखसमृद्धिदायक जावो असे चिंतीत आहे.





दसऱ्याचें सुमुहूर्तावर मोठ्या समारंभानें
दे. भ. जी. डी. तपासे,
मुंबई प्रांतिक सरकारचें उद्योगमंत्रि,
यांनीं
मंदिराची कोनशिला बसविली.





**बी. रुक्मैय्या**
मॅनेजिंग डायरेक्टर



अनुक्रमणिका






अभिष्टचिंतन

नूतन वर्ष आणि
ही दिवाळी आमच्या ग्राह-
कांना सुखाची आनंदाची आणि
समृद्धीची जावो !

IEW

इंडिया इलेक्ट्रिक वर्क्स लि.
६ सर फिरोजशहा मेथा रोड फोर्ट, मुंबई.

स्थापना १९१३

# ईस्ट ॲन्ड वेस्ट

## इन्शुअरन्स कंपनी लिमिटेड.

★ सेवा ★ सामर्थ्य ★ संरक्षण
यांजबद्दल ३३ वर्षांचा लौकिक

चेअरमनः—डॉ. सर आर. एम. अलगप्पा चेट्टीयार
M. A., D. Litt., LL. D., Bar-at-Law
मॅनेजरः—श्री. के. एन सामंत, M. Com.

ईस्ट ॲण्ड वेस्ट बिल्डिंग,
अपोलो स्ट्रीट, फोर्ट, बॉम्बे.

रानडे यांचा
पेशवाई चिवडा
पार्टी करिता
अवश्य वापरा

## धरलेला हट्ट !

सासूबाईनीं पुरा केला.
'पेशवाई-
चिवड्या' साठीं
जांवयानीं हट्ट
धरला होता
अखेर—

## 'न्यू सेपरेट कंपनीचा' शोध

करून त्यांचा हट्ट पुरा केला.

पत्ता लक्षांत ठेवा—
न्यू सेपरेट कंपनी
१०१२, सदाशिव पेठ पुणें

आरोग्याचा नंदादीप
रक्तवर्धक

आमचा
शुभ संदेश

आमच्या असंख्य ग्राहकांना हितचिंत-
कांना आणि **आयुर्वेद रसशाळेशीं**
संबंध असणाऱ्या सर्वांना हें वर्ष सुखाचें
जावो. ही दिवाळी आनंदाची जावो
आणि आरोग्याचा नंदादीप अखंड
तेवत राहो.

——×——

## आयुर्वेद रसशाळा, कर्वे रोड, पुणें.


अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

नवयुग तारका : गीता निजामी




: सहकारी :

एस. जी. आजगांवकर

एम्. बी. सामंत

आचार्य धर्माधिकारी, • वि. स. खांडेकर, • आचार्य काका कालेलकर, • ना. सी. फडके, आचार्य विनोबा भावे, • साने गुरुजी, • श्री. म. माटे, • वि. वि. बोकील, • पु. भा. भावे, ना. ग. गोरे, • केशवराव भोळे, • पां. वा. गाडगीळ, • चं. वि. बावडेकर, • व. शां. देसाई, माधवराव जोशी, • भालाकार भोपटकर, • शामराव ओक, • कुसुमाग्रज, • बा. भ. बोरकर, राजा बढे, • ग. दि. माडगूळकर, • श्रीकृष्ण पोवळे, • ज्यूलियस्, • शांताराम आठवले, पु. शि. रेगे, • अनिरुद्ध, • सोपानदेव चौधरी, • शांता शेळके, • गो. ल. आपटे,

Copyright of Pictures, Illustrations and Cartoons
reserved by DALAL ART STUDIO, BOMBAY 4.

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# PHILIPS



**FOR YOUR ALL SOUND ON FILM**

**EQUIPMENTS, ACCESSARIES & SPARES REQUIREMENTS**

**PLEASE GET IN TOUCH WITH:—**

**M|s. CINE AGENCY [INDIA]**

18, QUEEN'S ROAD,
BOMBAY 4.


अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



[ ७८ व्या वाढदिवशीं महात्माजींनीं आपल्या प्रार्थनेनंतर उध्दृत केलेल्या गुरुदेव टागोरांच्या ओळींचा अनुवाद. ]

आटुनि जातां निर्झर जीवन
वर्षत ये होऊन दयाघन
गेली ती माधुरी जिवांतुन
संगीतामृत येई होउन!

त्रिघाड सारा जेव्हां होई
जीवितेश्वरा हळूंच येई
हृदयाचे कोनेहि कोपरे
जगन्नाथ! हे व्यापुनि घे रे!

मन हें होतां कोतें ताठर
दीनहीन-हांकेसी निष्ठुर
उदारात्म! दारें उघडोनी
प्रवेश हृदयीं राजावाणी!

काम-धूलिनें अंध चित्त हें
होउनि चुकल्या वाटे वाहे
सदा जागत्या विशुद्ध देवा
रौद्ररूपिं येऊन जागवा!

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# यथाशक्ति जीवन

: लेखक :

— आचार्य दादा धर्माधिकारी

**आमचे सिद्धान्त आणि आमचें जीवन यांत कांहींच मेळ किंवा संबंध नाहीं. यामुळें जगण्यांतहि उत्कटता उरलेली नाहीं. आपण मनःपूर्वक जगत देखील नाहीं. मरण येत नाहीं म्हणून जीवन सहन करतों आणि कसेंबसें आयुष्य ' घालवितों. '**

गांधी-सेवा-संघाचें तिसरें अधिवेशन चालू होतें. अधिवेशनांत एक ठराव मांडला गेला. त्या ठरावाच्या बाबतींत असा प्रश्न उपस्थित झाला कीं नियम अत्यंत कडक व कांटेकोर बनवावा कीं थोडासा सौम्य बनवावा ? अखेर शेवटीं असें ठरलें कीं, प्रत्येक सभासद प्रामाणिक आहेच. म्हणून फक्त एवढाच नियम बनवावा कीं, प्रत्येक सभासदानें ठरावाचा सिद्धान्त अमलांत आणण्याचा प्रामाणिक प्रयत्न करावा. कुणीतरी सुचविलें कीं ठरावांत ' आटोकाट प्रयत्न करावा ' हे शब्द घालावेत. बापूजींनीं सांगितलें ' आटोकाट ' (भरसक) शब्दांत कांहींशी ज़ास्त जबाबदारी येते. ' आटोकाट ' चा अर्थ ' आपली संपूर्ण शक्ति वेंचून ' असा होतो. याचाच अर्थ आपापल्या शक्तीप्रमाणें. तेव्हां कुणीतरी ' यथाशक्ति ' हा शब्द सुचविला आणि हा शब्द बहुमतानें उपयुक्त समजला गेला.

गांधीसेवासंघाच्या सभासदांनीं पुढें काय केलें याच्याशीं आपल्याला कांहीं करावयाचें नाहीं. तो एक साधकांचा समूह होता. तेव्हां संघाच्या सभासदांनीं ' यथाशक्ति ' शब्दाचा वास्तविक अर्थ समजून घेऊन त्याच वृत्तीनें ठरावाची अंमलबजावणी केली असेल.

परंतु या ' यथाशक्ति ' शब्दानें माझ्या मतांत कितीतरी आठवणी जागृत केल्या. आपल्या धार्मिक व्यवहारांत जे शब्द असंख्य वेळां येतात आणि जे आपल्या येथील मुलामुलींनाहि तोंडपाठ झालेले असतात अशांपैकीं 'यथाशक्ति' हा एक आहे. ' यथाशक्ति द्रव्यदान ' ' यथाशक्ति गोदान ' ' यथाशक्ति ब्राह्मणभोजन ' वगैरे वगैरे.

हिन्दु लोक अत्यंत धार्मिक असतात, त्यांच्या दृष्टीनें ही पृथ्वी ' भोगभूमि ' नसून ' यज्ञभूमि, ' ' उपासनाभूमि ' आहे अशी एक वदंता आहे.

आपले धार्मिक ग्रंथ वाचून पाहिले असतां अशा प्रकारचा कांहींसा भ्रम होतो हि. परन्तु सामाजिक आणि वैयक्तिक आचरण पाहतांच एका क्षणांत या भ्रमाचें निराकरण होतें. एक हिन्दु आपल्या तिजोरीच्या खोलीचें जितकें मूल्य समजतो तितकें आपल्या देवघराचें समजत नाहीं. त्याच्या दैनंदिन जीवनांत शालिग्रामाच्या दगडापेक्षां सुवर्णमुद्रेचें महत्त्व कितीतरी अधिक असतें. तो देवाच्या देवळांत जाऊनहि बहुधा पैशाच्या पिशवीलाच नमस्कार करीत असतो. एखादें मन्दिर जितकें अधिक वैभवसम्पन्न असेल तितकें तें अधिक पवित्र आणि श्रेष्ठ समजलें जातें. मन्दिरांच्या महाद्वारावर (आणि अल्पद्वारावरहि) नंग्या समशेरींचा पहारा असतो. जोंपर्यंत शालिग्रामाच्या शिळेहून सुवर्णमुद्रेचें महत्त्व अधिक राहील, हृदयापेक्षां पोटाची प्रतिष्ठा अधिक राहील, चारित्र्यापेक्षां वैभवाचें मूल्य जास्त राहील तोपर्यंत देव आणि धर्महि तलवारींच्या आधीन राहतील आणि तलवारींचीच सत्ता सर्वोपरि राहील.

धार्मिकतेची फुशारकी मारणाऱ्या आपल्या समाजाची वृत्तीदेखील वास्तविकपणें अर्थप्रधान आणि वैभवलोलुपच आहे. यामुळेंच 'यथाशक्ति' या शब्दाचा

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

जो अर्थ साम्पत्तिक किंवा व्यावहारिक क्षेत्रांत होत असतो तो धार्मिक, नैतिक किंवा सेवेच्या क्षेत्रांत कधीं होत नाहीं.

पुष्कळ वर्षें झालीं त्या गोष्टीला. आमच्या घरीं कुणाच्या तरी लग्नाची तयारी मोठ्या धूमधडाक्यानें चालू होती. माझे आजोबा सामान खरेदी करण्यांत मोठे चतुर समजले जात. ते जेव्हां कापडचोपड खरीदण्यासाठीं दुकानांत गेले तेव्हां त्यांनीं पहिल्या प्रथम भटजी आणि सवाष्ण यांच्यासाठीं वस्त्रें मागितलीं; कारण प्रत्येक मंगलकार्यांत गणपती-पूजनानन्तर ब्राह्मणपूजेचेंच स्थान असतें. दुकानदारानें स्वस्तांत स्वस्त कपडे काढून दिले. त्यानंतर नवरा–नवरी, व्याही मंडळी व नातेवाईक यांच्यासाठीं उत्तमोत्तम कपडे विकत घेण्यात आले. माझ्या मनांत विचार आला, ब्राह्मणपूजेसाठीं स्वस्तांत स्वस्त वस्तु विकत घेणें हीच खरी धार्मिकता असावी! अशीच एक म्हणहि आहे ना कीं 'मेलेली गाय, भटाला दान!' नुसती म्हणच नव्हे तर प्रत्यक्ष वेदांत या गोष्टीला आधार सांपडतो–नचिकेताच्या पित्यानें देखील 'पीतोदका, जग्धतृणा, दुग्धदोहा, निरिन्द्रियाः' (ज्यांच्या ठिकाणीं पाणी पिण्याची किंवा गवत खाण्याचीहि ताकद उरलेली नाहीं, ज्यांचें दूध आटलें आहे, आणि ज्यांची इंद्रियें सुकून गेलीं आहेत) अशाच गायी दान दिल्या होत्या नां? अशा प्रकारें शास्त्राधारहि मिळतो. फक्त तो शोधण्याची दृष्टि हवी.

सगळ्या समाजाला या दृष्टीची चांगली माहिती असते. आणि ही दृष्टि उपयोगी व आवश्यक आहे असेंहि त्याला वाटत असते. आणि म्हणून पूजेचीं पानें, पूजेच्या सुपाऱ्या, पूजेचे नारळ, पूजेचे आंबे सर्व कांहीं वेगळे असते. या वस्तु चांगल्या माणसांनीं खाण्याच्या लायकीच्या नसतात; तर फक्त देव आणि देवांच्या नैवेद्यावर पुष्ट होणारे भटजी पुजारी यांच्यासाठींच असतात. जीं नाणी बाजारांत चालण्यासारखी किंवा पैशाच्या पाकिटांत ठेवण्यासारखी नसतात ती देवळांत चालतात आणि दक्षिणेसाठीं किंवा सत्यनारायणाच्या पूजेच्यावेळीं 'यथाशक्ति' दान म्हणून देण्यांत उपयुक्त समजलीं जातात.

ही आहे आपल्या धार्मिकतेची सखोलता आणि वास्तविकता!

याच 'यथाशक्ति' च्या वृत्तीचा आपण आपल्या सार्वजनिक क्षेत्रांतहि उपयोग करतों; आणि तिला 'व्यवहार कौशल्य' हें प्रतिष्ठित व गोंडस नांव देतों. 'व्यापारांत खरेपणा चालत नाहीं,' पण आपण खोटे आहोंत हें कोण कबूल करणार? यामुळें एक शिष्ट वाक्प्रचार शोधून काढण्यांत आला, 'साधारण व्यापारी नीति' 'राजकारणांत तर असत्याशिवाय पानच हालत नाहीं.' म्हणून तेथें सत्यत्यागासाठीं दुसरा एक प्रतिष्ठित वाक्प्रचार उपयोगांत आणला जातो, 'राजकारणाची भाषा.' धर्म, उपासना आणि चारित्र्य हीं देखील आमच्या 'व्यवहारचातुर्या'चीच उपांगें मानलीं जातात. समाजांत अर्थ, सत्ता आणि प्रतिष्ठा प्राप्त करण्याचीं हीं फक्त साधनें आहेत, त्यांचीं स्वतःचीं अशीं मूल्यें नाहींत.

हल्लींचें युग 'सत्ययुग' न सून 'अर्थयुग' आहे. आणि म्हणूनच 'अनर्थयुग' किंवा 'कलियुग'हि आहे. कारण संघर्षाचें मूळ स्पर्धाच आहे. हीच 'व्यवहार-कौशल्या'ची वृत्ति आपल्या धार्मिक आचारांत आणि उपासनांमध्यें दाखल केली गेली आहे. ईश्वर आणि ईश्वराचे तथाकथित प्रतिनिधी यांच्याशीं आपण सौदाच करूं इच्छितों आणि तसा सौदा करीत असतां, त्यांनाहि फसविण्याची आपली इच्छा असते. यामुळें कमींत कमी त्यागाच्या मोबदल्यांत जास्तींत जास्त भोग, कमींत कमी दानाच्या मोबदल्यांत जास्तींत जास्त ऐश्वर्य आणि कमींत कमी भक्तीच्या मोबदल्यांत जास्तींत जास्त मुक्ति ही आपली नीति आणि वृत्ति आहे; आणि म्हणूनच 'यथाशक्ति' याचा अर्थ 'कमींत कमी' असा समजला जातो.

या 'यथाशक्ति' वृत्तीनें आपलें सारें जीवनच निःसत्व आणि निरालम्ब करून टाकलें आहे. त्यांत कसलाहि रस, उत्कटता किंवा खरेपणा राहिलेला नाहीं. या वृत्तीची एक मोठी मजेदार व मार्मिक गोष्ट मला आठवते.

एका गांवांत एक एक प्रतिव्रता राहात असे. ती अत्यंत पतिनिष्ठ समजली जात असे. गांवांतील सगळ्या स्त्रिया तिच्या चरणांना स्पर्श करण्यांत स्वतःला धन्य मानीत. गांवांत जेव्हां एखादी बाई विधवा होई तेव्हां ती पतिव्रता म्हणे, "ही विधवा सहगमन कां करीत नाहीं? पतिविहीन जीवनाला काय जीवन म्हणावयाचें? माझ्यासारखी असती तर सती गेल्याशिवाय राहिली नसती." •



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

तिच्या या उद्गारामुळें गांवांत तिची कीर्ति जास्तच वाढली आणि आसपासच्या प्रदेशांतहि ती पसरली. ईश्वराची गति नेहमींच अतर्क्य असते. एके दिवशीं सकाळींच तिचा पति परलोकवासी झाला. सगळ्या गांवावर दुःखाची कळा पसरली. गांववाल्यांची खात्री होती कीं आतां ही साध्वी सती जाणार; कितीहि सांगितलें तरी ती ऐकणार नाहीं; आणि ती गेल्या-नंतर सारें गांव भकास वाटूं लागेल.

इकडे त्या पतिव्रतेनेंहि आपला सती जाण्याचा निश्चय जाहीर केला.गांवांत दौंडी पिटाविण्यांत आली. लोकांची गर्दी जमली. घराच्या गच्च्या, छप्परें, खिडक्या झाडें, कंपाउंडच्या भिंती सगळें कांहीं सजीव झालें. कोठें पाय ठेवायलाहि जागा उरली नाहीं. एका सजविलेल्या उघड्या रथांत पतीचें शव ठेवले गेले; आणि त्याच्या पायांजवळ पिवळीं वस्त्रें परिधान केलेली, मळवट भरलेली, सती बसलेली होती. हें दृश्य पाहण्यासाठीं लोकांच्या झुंडीच्या झुंडी लोटल्या. त्या स्मशान–यात्रेची शान आणि शोभा अवर्णनीय होती. मोठ्या धूमधडाक्यांत शव–रथ स्मशान–घाटावर पोंहोचला. रथावरून शव खालीं उतर-विण्यांत आलें. चिता पेटविली गेली. सतीला चितेवर आरूढ होण्यास सांग-ण्यांत आलें. ती ब्राह्मणांना म्हणाली, 'जरा थांबा, मी सहगमनाची तयारीच करीत आहे.'

थोड्या वेळानें ब्राह्मणांनीं पुनः प्रार्थना केली. सतीनें अगदीं शांतपणें उत्तर दिलें. "महानुभावांनो! मी सहगमन केलें. मी एक धर्मपरायण स्त्री आहे. शास्त्रांत सह-गमनाची आज्ञा आहे. शास्त्राप्रमाणें आचर-णाची जी प्रणाली समाजांत प्रचलित आणि शिष्टसम्मत आहे तिच्याप्रमाणें मी सहगमन केलें आहे. मी आपल्या पतीच्या चितेवर माझ्या डोकीचा एक केस काढून टाकला आहे."

ब्राह्मणांनीं क्रोधमिश्रित आश्चर्यानें विचारलें, "हें कसलें सहगमन? हें तर निव्वळ थोतांड आहे."

सतीनें पूर्वीप्रमाणेंच नम्रपणें उत्तर दिलें, "महाराज, सर्व शरीरासह सती जाण्याची शक्ति माझ्या अंगीं नाहीं; म्हणून मी माझ्या शरीराचें एक अंग, उत्तमांगाचा एक सुकेश, अग्नीस अर्पण केला आहे. समाजांत धर्माचरणाची हीच परिपाटी आहे असें मला आढळून आलें आहे. हें माझें 'यथाशक्ति सहगमन' आहे."

ब्राह्मण आणि प्रेक्षक आश्चर्यानें थक्क झाले.

गोष्टीचें तात्पर्य स्पष्ट आहे. आमचा धर्म आम्हाला असें शिकवितो कीं, आपण 'यज्ञशिष्ट' खावें, तेंच अमृत आहे. 'नैवेद्य' हाच आपला 'भोग' (आहार) असला पाहिजे. परंतु या 'यथाशक्ति नीती'नें आमच्या जीवनांत दंभ आणि पाखंडयांचाच सुळसुळाट माजविला आहे. ज्या जातींत मी लहानाचा मोठा झालों त्या एका जातींतील उदाहरण मी येथें दिलें आहे. याचा उद्देश एवढाच कीं कोणाचा गैरसमज होऊं नये किंवा कोणाला वाईट वाटूं नये. परंतु आज सर्वत्र जमातींची अशी स्थिति आहे. आमचे सिद्धांत आणि आमचें जीवन यांत कांहींच मेळ किंवा संबंध नाहीं. सिद्धांतांना पोकळे आणि व्यर्थ बनविण्यांतच आपण आपल्या जीवनाचें सार्थक मानलें आहे. यामुळें जगण्यांतहि उत्कटता उरलेली नाहीं. आपण मनःपूर्वक जगत देखील नाहीं. मरण येत नाहीं म्हणून जीवन सहन करतों आणि कसेंबसें आयुष्य 'घालवितों.' चरित्र्याच्या क्षेत्रांत यथाशक्तीची नीति स्वीकारतांच ती सारें जीवन व्यापून टाकते. आज आपण जगतों तेंहि 'यथाशक्ति'च असतें.

आरको
प्रत्येकांस लागणाऱ्या नित्योपयोगी वस्तु
— निलगिरी —
एरंडेल : : टुथपावडर : : इत्यादी
लक्ष्मी एजन्सी : : मुंबई २४






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

नव्या राष्ट्राची पहिली हांक!



के. टी. डोंगरे आणि कंपनी

गिरगांव, मुंबई. ४




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट


अनुक्रमणिका

## व न रा णी

आज पहांटे वनराणी
सदनीं माझ्या ये कोणी
झंकारित वीणा अपुली
पहांटताऱ्यासह आली
सौंदर्यासह गीत असें
यक्षांच्या जगतांत वसे
वसन मनोरम
इंद्रधनूसम
नेत्रांतून निळ्या तिचिया
पुनवेची निथळे किमया !

विचरत सदना भंवताली
तृणावरोनी मखमाली
कुंजाकुंजामधून ती
पाउल टाकी मंदगती
फुलवेली हृदयीं धरुनी
हितगुज कांहींसें करुनी
नव कलिकांवर
फिरवी निज कर
प्राचीवर चढतां लाली
कलिकांचीं कुसुमें झालीं !

उधळित मंजुळ स्वरलहरी
मजजवळीं ती येत परी
जागवुनी माझ्या हृदया
स्नेहाची विखरी माया
स्पर्शुनि त्यांतिल भावदलां
फुलवी स्वप्नांची माला
करीत गायन
जाई परतुन
प्राचीवर चढतां लाली
अवघीं तीं स्वप्नें सरलीं !

—कुसुमाग्रज




## तुम्हांला आवडणारें साहित्य !

### कादंबऱ्या

| | | |
|---|---|---|
| १ संगम | वि. वी. गुर्जर | २–८–० |
| २ स्वप्नभंग | ,, ,, ,, | २–८–० |
| ३ देवदास | ,, ,, ,, | २–८–० |
| ४ विद्या आणि वारुणी | दिवाकर कृष्ण | २–८–० |
| ५ होमकुंड | य. गो. जोशी | २–०–० |

### नाटकें

| | | |
|---|---|---|
| १ पेल्यांतील वादळ | गोखले | १–०–० |
| २ देवमाणूस | नागेश जोशी | १–४–० |
| ३ विजय | ,, | १–८–० |
| ४ बोलका सिनेमा | य. गो. जोशी | १–८–० |

### निबंध, प्रबंध वगैरे

| | | |
|---|---|---|
| १ इंग्रजांनीं हिंदुस्थान कसा घेतला ? | रा. गो. भिडे | १–८–० |
| २ शिखांचा स्फूर्तिदायक इतिहास | शं. पु. जोशी | १–८–० |
| ३ हिंदुमहासभेचा इतिहास | रा. गो. भिडे | ३–०–० |
| ४ करदर्शन अर्थात सुलभ सामुद्रिक | ल. के. तांबे | ३–१२–० |

**मॉडर्न बुक डेपो, पुणें २**

इनमीन तीन माणसांच्या जगांत वावरणारी जानकी ! दुःख मुख्यतः शरीराचेंच असतें अशी तिची प्रामाणिक कल्पना ! पण—

# तीन जगं !

: लेखक :

वि. स. खांडेकर



काइ्—काइ्—काइ्

टाळयांच्याः त्या प्रचंड कडकडाटानें रघुनाथ दचकला. गांवाच्या अगदीं मध्यभागीं गांधीजींच्या पुतळ्याचा अनावरण समारंभ चाललेला, या समारंभाचे पाहुणं म्हणून आलेल्या बड्या देशभक्तांच्या शेजारीं आपले शेठ बसलेले, त्यांनीं या पुतळयाकरतां सर्वांत मोठी देणगी दिलेली, आलेल्या पाहुण्यांचें गांधींनीं आपल्या देशांत केवढी क्रांति घडवून आणली आहे, याविषयीं मोठें सुरस व्याख्यान चाललेलें ! अशा वेळीं आपण पेंगतोंय् ?

छे—छे—छे—शेटजींना हें दिसलें तर— रघुनाथानें मोठ्या कष्टानें डोळे उघडले.

त्याचा आपल्या डोळ्यांवर विश्वास बसेना. तो सभेंतलें भाषण ऐकत नव्हता ! जानकीनें पुनः पुन्हां ठिगळें लावल्यामुळें एखाद्या भिकारणीप्रमाणें दिसणाऱ्या मच्छरदाणींत तो झोंपला होता ! मच्छरदाणींत व्याख्यानें ऐकण्याचा प्रसंग पुरुषावर अनेकदां येतो हें खरें ! पण त्याची जानकी थोडी रागीट असली तरी आपला राग लोभ तोंडानें बोलून दाखविण्याचा तिचा स्वभाव नव्हता. तिचे डोळेच सुखदुःखाच्या साऱ्या गोष्टी रघुनाथाला सांगत असत. आणि आतां तर ते डोळे सुद्धां मिटलेल्या कमळाप्रमाणें—झोंपेंत हंसत असलेल्या जानकीकडे रघुनाथानें क्षणभर टक लावून पाहिलें. तिनें आपला डावा हात दोघांच्या मध्यें झोंपलेल्या मोहनच्या अंगावर मोठ्या हळुवारपणानें ठेविला होता. फुलांवर दंव पडतें ना ? अगदीं तस्सा ! रघुनाथानें त्या हाताकडे पाहिलें. सोन्याची अवघी एक बांगडी त्या हातांत होती. नि ती सुद्धां उणीपुरी तोळयाची असेल नसेल. त्यानें हळूंच त्या हाताच्या नाजुक तळव्याला स्पर्श केला. भांडीं घांसतांना तिच्या हाताला पडलेले ओरखडे त्याला जाणवले. निखाऱ्याचा चटका बसवा तसा त्यानें आपला हात मागें घेतला. तिच्या हाताचे ते ओरखडे म्हणजे आपल्या हृदयाच्या जखमा आहेत असा क्षणभर भास झाला त्याला. पांच वर्षांपूर्वीं मोठ्या प्रेमानें पत्नी म्हणून घरांत आणलेल्या या काळ्या सांवळ्या अल्लड गोड पोरीच्या अंगावर ती आई होऊन दोन वर्षें झालीं तरी आपण तोळाभर सोनें सुद्धां घालूं शकलों नाहीं, तिची एक हौससुद्धां आपल्याला पुरी करितां आली नाहीं, या विचारानें तो अस्वस्थ झाला.

लगेच त्याची दृष्टि मोहनकडे वळली. त्याचा ओंका ओका दिसणारा गळा—या पांच वर्षांत जानकीनें हट्ट असा एकदांच धरला.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

गतवर्षी मोहनच्या पहिल्या वाढदिवसाच्या दिवशीं त्याच्या गळ्यांत तोळाभर सोन्याची माळ करून घालावी, नि त्या माळेला गांधीचा छोटा फोटो असलेलें एक लॉकेट लावावें असें त्या वाढदिवसा आधीं किती तरी दिवस तिचें त्याच्या मागें टुमणें होतें. पण—

महिना पन्नास रुपयांवर एका कापड दुकानांत दिवसाचें दहा तास राबणाऱ्या कारकुनाच्या बायकोनें आपला हट्ट धरणें म्हणजे शुद्ध वेडेपणा आहे. नाहीं का ? तिनें सकाळपासून संध्याकाळपर्यंत संसाराचा गाडा ओढावा नि आपल्या बाळाला नटविण्यांची हौस अगदीं आवरेनाशी झाली तर चार आठ आण्यांची कांचेच्या रंगीबेरंगी मण्याची माळ त्याच्या गळ्यांत घालावी.

रघुनाथाच्या आठवणी जाग्या झाल्या— तिचा तो हट्ट कांहीं केल्या आपल्याला पुरवितां आला नाहीं. महागाई वणव्यासारखी पसरत होती. पन्नास रुपयांची चार दिवसांत चिमूटभर राख होऊन जाई. अशा स्थितींत मोहनला एक तोळ्याची कां होईना सोन्याची माळ करायला पैसे आणायचे कुठून ? दागिन्याप्रमाणें हट्टही श्रीमंतांना शोभतात असं कांहींतरी बोलून आपण त्या वाढदिवसाच्या दिवशीं जानकीची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. तिनें पुन्हां माळेच्या बाबतींत एक अवाक्षर सुद्धां काढलें नाहीं. पण शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या मुलांच्या गळ्यांतलें दागिनें पाहिले म्हणजे नकळत मुद्रेवर येणारी खिन्नपणाची छाया कांहीं तिला कधीं लपवितां येत नसे. ती उदास छाया पाहूनच आपण मनांत बेत केला कीं मोहनच्या दुसऱ्या वाढदिवशीं—

देवाच्या दयेनें रात्रीं नऊ ते दहाची एक शिकवणीही मिळाली आपल्याला. आपण मॅट्रिक नसूनहि इंग्रजी शिकवणी मिळाली. दुकान नवाला बंद होतें नि मग मी लायब्ररींत जाऊन तासभर वाचीत बसतो असें सांगून आपण जानकीला जवळ जवळ वर्षभर फसवीत आलों. पण त्याचा सारा वचपा आज—

रघुनाथ उघड्या डोळ्यांनीं स्वप्न पाहात होता—

—आज मोहनचा दुसरा वाढदिवस. सराफानें ती माळ आज दुपारीं बारा वाजतां नक्की देतों म्हणून सांगितलें आहे. दुपारीं ती माळ जेव्हां आपण जानकीच्या हातांत ठेवूं तेव्हां आपल्या नवऱ्याला कुठें ठेवूं नि कुठें ठेवूं नको असें होऊन जाईल तिला. जेवण झाल्यावर विडा द्यायच्या निमित्तानें ती आपल्या जवळ येईल नि मग—मग आपण तिला म्हणूं 'विडा खाणाऱ्याची जीभ रंगते हें आजपर्यंत हजारदां पाहिलं होतं मी ! पण विडा देणाऱ्याच्या गालावरही तो रंग पसरतो हा चमत्कार—हें गुलाबी कोडं कांहीं निराळंच आहे हं !'

कल्पनेच्या या तंद्रींतच रघुनाथानें जानकीकडे पाहिलें. तिचा निद्रित हंसरा चेहरा पाहून त्याच्या मनांत आलें—आपलं गुपित हिला कळलं तर नाहीं ना ?

तो तसाच तिच्याकडे पाहत राहिला. पाहतां पाहतां त्याला वाटलें, आपल्या शेटनीं ठेवलेल्या रोशनबाईपेक्षां जानकी खरोखरच सुंदर आहे. पण ती एका गरीब पुराणिकाची सून नि एका दरिद्री कारकुनाचा बायको झाली म्हणून तिच्या अंगावर फुटका मणी सुद्धां नाहीं. त्या रोशनबाईप्रमाणें जर कुणातरी धनिकाची—

आपल्या मनांत आलेल्या या विचित्र विचाराचें त्याचें त्यालाच आश्चर्य वाटलें. फुलांच्या राशींतून एकदम विंचू बाहेर पडावा तशी वाटली ती कल्पना त्याला. रोशनसारख्या शरीरविक्रय करणाऱ्या बाईशीं जानकीसारख्या पतिव्रतेची तुलना करून आपण तिला फार अन्याय केला अशी रुखरुख त्याला वाटूं लागली. तो मनांत म्हणाला—जानकीचें जग निराळें, रोशनचें जग निराळें ! पति हा जानकीचा देव आहे, आपलें बाळ हा जानकीचा देव आहे. रोशनच्या जगांत पैसा हाच देव आहे. हीं दोन जगें अगदीं भिन्न आहेत. एक स्वर्ग, दुसरा नरक !—खाड्-खाड् खाड्—

मघाशीं आपण दचकून जागे कसे झालों याची रघुनाथाला आतां कल्पना आली. पहांट होत आल्यामुळें त्याच्या घरावरून मधून मधून एखादी खेड्याकडून येणारी बैलगाडी जाऊं लागली होती. खांचखळग्यांनीं भरलेल्या रस्त्यावर त्या गाडीचा होणारा खाडखाड आवाज नि काल संध्याकाळच्या सभेंतला टाळ्यांचा काड काड असा कडकडाट यांची सांगड आपल्या स्वप्नसृष्टींत असा कुणीं घातली कुणाला ठाऊक ! पण त्या आवाजा-


★ दिवाळी व नूतन-वर्ष शुभचिंतन ★ ★ ★

[ रजिस्टर्ड ]
हॅरि-टोन
व्हायोलीन
व
रेडिओ टाइप हार्मोनियम
हेड ऑफिस : दादर, मुंबई नं. १४
टेलिफोन नं. ६०८४२

हरीभाऊ विश्वनाथ कं.
दादर
बी.बी. स्टेशनसमोर

ब्रँच नं. १—सॅन्डहर्स्ट रोड, मुंबई नं. ४ | सविस्तर माहितीकरितां सचित्र कॅटलॉग मागवा. | ब्रँच नं. २—गांधी रोड, अहमदाबाद.


अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

मुळेंच-गाडीचा आवाज आतां दुरून ऐकूं येऊं लागला. त्याच्यांत मधाचा कर्ण कटुपणा नव्हता.

कालच्या व्याख्यानांतल्या अनेक गोष्टी रघुनाथाला आठवूं लागल्या. त्याचें मन उल्हासानें भरून गेलें. मच्छरदाणींतून तो हळूंच बाहेर आला. दाराची कडी त्यानें हलक्या हातानें काढली. दार उघडतांच पहाटेच्या शीतल वायुलहरींनीं त्याचें अंग पुलकित झालें. त्यानें वर पाहिलें. वद्य चतुर्दशीची बारीक चंद्रकोर मोठी रमणीय दिसत होती. जणुं कांहीं आपल्या दरिद्री संसाराला सजविणाऱ्या जानकीच्या प्रीतीची प्रतिमाच होती ती !

संध्याकाळीं नदीच्या घाटावर पाण्यांत पाय सोडून बसण्यांत जो आनंद असतो त्याची आठवण होऊन रघुनाथ स्वतःशींच हंसला आणि दारांतल्या पायरीवर बसला. वाऱ्याच्या गार झुळुका-दूरच्या देवळांतून ऐकूं येणारे सनईचे सूर-विश्वाला चंदनाची उटी लावीत पहाट काकडा आरती म्हणत होती.

रघुनाथाला रात्रीच्या उकाड्याची आठवण झाली. मच्छरदाणींत मोहन जेव्हां एकसारखा या कुशीवरून त्या कुशीवर होऊं लागला तेव्हां जानकी म्हणाली होती, ' काय मेला उन्हाळा आहे यंदाचा !' कसं मोदकपात्रांत घालून शिजविल्यासारखं होतंय !'

आतांचा गारवा अनुभवितांना रात्रीं विलक्षण उकाडा होत होता हें रघुनाथाला क्षणभर खरेंच वाटेना. कालच्या व्याख्यानाचा राहून राहून विचार करणारें त्याचें मन म्हणालें—सहा तासांत सृष्टींत केवढा फरक होतो ! मग गांधीजींच्या पंचवीस वर्षांच्या प्रयत्नांनीं समाज बदलूं लागला असला तर त्यांत नवल कसलें ?

कालचे ते देशभक्त व्याख्याते म्हणाले होते, ' बटु वामनानं तीन पावलांनीं त्रिभुवन व्यापून टाकलं. ही पुराणांतली कथा गांधीजींनीं या कलियुगांत खरी करून दाखविली आहे. श्रीमंतांचें जग, मधल्या लोकांचें जग आणि अगदीं हाल-अपेष्टांत आयुष्य कंठणाऱ्या गोरगरिबांचं जग अशीं आपल्या समाजांत आजपर्यंत तीन जगं होतीं. पण गांधीजींनीं या तीन जगांतला सारा भेदभाव नाहीसा केला आहे. तिन्ही जगांचं मिळून एक नवं जग त्यांनी निर्माण केलं आहे.'

आणि उदाहरण म्हणून त्या देशभक्तांनीं पांढरा शुभ्र खादीचा पोशाख घालून त्यांच्या शेजारी बसलेल्या आपल्या शेटजींकडे प्रथम बोट दाखविलें. त्याच वेळीं त्या देशभक्तांचें रात्रीच्या गाडीचें सेकंड क्लासचें रिझर्व्हेशन झालें आहे हें शेटजींच्या कानांत सांगायला आपण व्यासपीठावर चढलों होतों. शेटजींनीं त्याबद्दल आपली पाठ थोपटली. या दृश्याकडे त्या देशभक्तांनीं लगेच बोट दाखविलें. ''एक मालक आपल्या नोकराशीं किती प्रेमानें तें पहा, गांधीजींच्या शिकवणीचाच हा परिणाम आहे, असेंच जणूं कांहीं त्यांनीं त्या मूक अभिनयानें सूचित केलें. लगेच त्यांनीं शेटजींच्या पाशाजवळ बसलेल्या सीतारामाकडे बोट दाखविलें. गांधींच्या पुतळ्याच्या गळ्यांत इतरांप्रमाणें कुणींतरी हरिजनानें हार घालणें आवश्यक होतें. आयत्या वेळीं शेटजींच्या तें लक्षांत आलें. गर्दींत मागें उभा असलेला सीताराम चटकन् आपल्या दृष्टीला पडला. त्या गरीब हरिजन विद्यार्थ्याला गेल्या वर्षापासून आपण दरमहा एक रुपया मदत म्हणून देत असल्यामुळें—अर्थात जानकीला न कळेल अशा बेतानें—त्याचा चांगलाच परिचय होता आपल्याला. आपण खूण केल्याबरोबर तो पुढें आला. मागें पडलेल्या हारांच्या ढिगांतून एक हार आपण त्याच्या हातांत दिला. पुतळ्याला हार घालून तो परत जाऊं लागला. पण त्या देशभक्त व्याख्यात्यांनीं त्याला थांबवून आपल्या गळ्यांतला हार त्याच्या गळ्यांत घातला. टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला. लाजलेला सीताराम लगबगीनें व्यासपीठावरून खालीं उतरूं लागला. पण शेटजींनीं खुर्चीवरून उठून त्याचा हात धरला आणि आग्रहानें त्याला आपल्याजवळ बसविलें. पुन्हा टाळ्यांचा गगनभेदी गजर झाला.

आमच्या ग्राहकांना ही दिवाळी व नवें वर्ष सुखाचें, आनंदाचें आणि भरभराटीचें जावो.




अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

A friend to you so sweet, and gay
To make it work is a child's play!



MADHOO
Radios

55 – Girgaum Road,
BOMBAY.

तुमच्या फायद्यासाठीं मेहरबानी करून वाचा आणि
नोंद करून ठेवा !

## –नांवांत खूप काहींतरी आहे!–

## कलकत्ता केमिकल

आम्ही ही दिवाळी सुखाची जावो असें इच्छितों

कलकत्ता केमिकल ही कंपनी हिंदुस्थानच्या औद्योगिक
उत्तेजनाला गेलीं तीस वर्षें एकसारखा हातभार
लावीत आहे.

नेहमीं तुमच्या प्रकृतीसाठीं या वस्तू वापरा.

खालील वस्तू वापरून खात्री करा:—

मार्गो सोप—आरोग्यास योग्य असा साबू
नीम टूथ पेस्ट—दंत रोगावर उत्युत्कृष्ट
रेणुका फेस पावडर / टुरिना ब्युटी मिल्क { चामडीवरील पुरळासाठीं
लॅवोनी स्नो—
कॅस्टोरॉल / भृंगॉल { केसांच्या वाढीसाठीं
सिल्ट्रेस—केसाच्या वळणासाठीं
नो पेन—दुखीवर रामबाण
मार्ग्युन्टम—कापणें, भाजणें, चामडीचे रोग यांजसाठीं
मलम आणि इतर टॉयलेट्स् पेटंट औषधें
फार्मास्युटिकल्स इत्यादिसाठीं.

लिहा—

## कलकत्ता केमिकल, कलकत्ता

मुंबई ऑफिस— प्रिन्सेस स्ट्रीट




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

संध्याकाळच्या सभेंतलें तें विलक्षण दृश्य—शेटजी, आपण आणि सीताराम—व्याख्यात्यांचे ते स्फूर्तिदायक शब्द—तिन्ही जगांचं मिळून एक नवं जग गांधीजींनीं निर्माण—

'आई, आई' या मोहनच्या लडिवाळ हांका कानावर पडतांच रघुनाथ पायरीवरून उठला. 'आई, चहा कलायला चल, चलना गऽ!' त्याचे बोबडे शब्द त्याच्या कानांवर पडले.

कालच्या त्या व्याख्यानाच्या नादांत आपण आपला गोड करार पाळला नाहीं म्हणून जागी झालेली जानकी क्षणभर खोटी खोटी रुसेल अशी कल्पना आंत येतांना त्याच्या मनांत आली. करार तसा अगदीं सोपा होता. आणि आतापर्यंत दोघांपैकीं कुणीही तो मोडला नव्हता. दोघांपैकीं आधीं जें कुणी जागें होईल त्यानें दुसऱ्यापाशीं जाऊन त्याला जागें करायचें आणि पांखरें जशीं पहांटे घरट्यांत थोडा वेळ किलबिल करून मग पोटाकरतां बाहेर पडतात तसा—एकमेकांच्या गळ्यांत गळा घालून घटकाभर गोड गोड गोष्टी करायच्या नि मग उभ्या दिवसाचे कष्ट उपसायला उठायचें. पहांटेच्या या गुज-गोष्टी म्हणजे रघुनाथ आणि जानकी यांच्या जीवनसंगीतांतली भैरवीच होती. त्यांच्या—पंचवार्षिक संसारांत विरहकालावांचून या कार्यक्रमांत कधींच खंड पडला नव्हता. पण आज—

रघुनाथ चोर पावलांनींच आंत आला. मोहनच्या बोबड्या लाडक्या हांका ऐकूनही जानकी अजून जागी कशी झाली नाहीं याचें त्याला आश्चर्य वाटलें. हळूच मच्छरदाणींत येऊन त्यानें जानकीचा डावा हात आपल्या हातांत घेतला. कांचेच्या बांगड्यांचा किणकिण असा अस्पष्ट मधुर नाद झाला. त्या लाजऱ्या पोरी काय कुजबुजल्या तें रघुनाथाला समजलें. जानकीचा हात फुलाहूनही नाजुक वाटला त्याला. त्या हाताचे ओरखडे! कुणी जादुगारणीनें ते नाहींसे केले कुणाला ठाऊक? रघुनाथानें आपले ओंठ तिच्या ओंठाजवळ नेले. मोहन तिच्या मंगळसूत्राशीं खेळत होता. त्याला हें पाहून काय वाटेल असला विचार रघुनाथाच्या मनांत आला. तो स्वतःशीच किंचित लाजला, मग हंसला. एखादें फुलपांखरूं—फुलांभोंवतीं घिरट्या घालतां घालतां एकदम त्याचें चुंबन घेतें, त्याच प्रमाणें त्याचे ओंठ—

जानकीनें झटकन् मान वळविली. रघुनाथ मोठ्यानें हंसून म्हणाला, 'बायका लबाड असतात असं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं हं!'

'नि पुरुष निर्दय असतात असें म्हणतात तें सुद्धां कांहीं खोटं नाहीं हं!' त्याच्याकडे न पाहतां जानकीनें उत्तर दिलें.

हे बोलतां बोलतांच तिनें मोहनच्या गालाला आपला गाल लावला. आणि त्याच्या ओल्या ओल्या दिसणाऱ्या गळ्याकडे पहात ती म्हणाली, "आज माझ्या राजाचा दुसरा वाढदिवस! पण तुम्हाला त्याची कुठं आठवण आहे? तुमचे शेठ—त्याचा तो गांधींचा पुतळा—"

ती पुढें कांहींच बोलली नाहीं. मात्र तिनें निराश दृष्टीनें रघुनाथकडे एक कटाक्ष फेंकला आणि मोहनला घेऊन ती मच्छरदाणींतून बाहेर पडली. पण दारांतून जातां जातां मागें वळून पाहिल्यावांचून तिला राहवलें नाहीं. ठिगळें लावलेली ती मच्छरदाणी पाहून तिला एक विचित्र भास झाला—आपलें आयुष्य हे असेंच फाटकें—तुटकें—भोकें पडलेलें—ठिगळें लावून तीं भोकें कशीं बशीं बुजवायची हें आपलें काम—मरेपर्यंत आपल्याला तेंच केलें पाहिजे.

या भासानें तिनें आपल्या मनाला घातलेला बांध फुटला. एक अस्पष्ट हुंदका तिच्या गळ्यांतून बाहेर पडला.

तिनें रघुनाथाकडे पाहिलें. तो झटकन बाहेर येऊन आपल्याला जवळ घेईल, आपल्या पाठीवरून हात फिरवील, आपण त्याच्या कुशींत डोकें खुपसून हें सारं दुःख विसरून जाऊं अशी अंधुक आशा तिच्या त्या दृष्टिक्षेपांत होती. पण रघुनाथ तर तिच्याकडे पाहून मिस्किलपणानें हंसत स्वस्थ बसला होता. फणकाऱ्यानें जातां जातां ती मनात म्हणाली, "पुरुष पाषाण असतात हेंच खरें! बायका त्या पाषाणाला देव मानतात—त्याची पूजा करतात...पण—"

●

नेहमीप्रमाणें बरोबर आठला रघुनाथानें दुकानांत पाऊल टाकलें. त्याच्याकडे नजर जातांच समोरच्या हॉटेलांतून चहाचा सिंगल आणून त्याचा आस्वाद घेण्यांत तल्लीन झालेले म्हातारे कारकून उद्गारले, "आज कांहीं विशेष दिसतंय् रघुनाथराव!"

हातांत काठीला लावलेले एक भलें मोठें फडकें घेऊन समोरच्या आरशावरली धूळ



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

दिवाळीच्या आनंदांत भर

**निर्मल साहित्याचीं**

**संग्राह्य पुस्तकें**

सुखाचा लपंडाव—खेर
दिलीप दाते —डांगे
कमळाचं जाळं —कु. बाबर
तूं तिथं मी —बोरकर
गांवगप्पा —उमाकांत भेंडे

**आगामी**

नेपोलियन व हिटलर—का. न. केळकर
कथा संग्रह —य. गो. जोशी
? —सौ. कमलाबाई टिळक

आमच्या वाचकांस ही दिवाळी सुखाची होवो!

**सारस्वत को-ऑपरेटिव्ह बँक लिमिटेड**

(स्थापना १९१८)

सारस्वत बँक बिल्डिंग-गिरगांव, मुंबई ४

| | | |
|---|---|---|
| अधिकृत भांडवल | रु. | ५,००,००० |
| विक्रीस काढलेलें भांडवल | रु. | ४,००,००० |
| वसूल झालेलें भांडवल | रु. | ३,६०,००० |
| रिझर्व व इतर फंड | रु. | १,९५,००० |
| ठेवी | रु. | ६५,००,००० |
| एकूण खेळतें भांडवल | रु. | ७१,००,००० |

सर्व तऱ्हेचे बँकेचे व्यवहार केले जातात. स्पेशल सेव्हिंग स्कीम ...व्याज २ टक्के. विशेष माहितीसाठीं लिहा अगर भेटा—

शाखा—दादर बी. बी. स्टेशन समोर.

वा. पु. वर्दे बी. कॉम्., चेअरमन
शं. वि. संझगिरी बी. कॉम्., सेक्रेटरी

**नाईकस् ब्रास अँड आयर्न वर्क्स्**

टे. नं. ४३६२२

त्रिंबक परशराम स्ट्रीट गोलपिठा-मुंबई नं. ४

आमचे कारखान्यांत सर्व जातीच्या लोखंडी टाक्या, चिमण्या, खिडीचे दरवाजे, ट्रुसेस, फेन्सींग, रेलिंगस, व इतर सामान बनवून मिळतें, त्याचप्रमाणें लेथ वरचे सर्व काम आमचे कारखान्यांत होते. तरी एकवेळ अनुभव घेऊन खात्री करावी.

प्रोप्रायटरः रामराव एम्. नाईक

**—शुभ चिंतन—**

आमच्या असंख्य आश्रयदात्यांस व हितचिंतकांस दिवाळी व नूतन वर्ष सुखसमृद्धीचें जावो!

**देव्हारे आणि कंपनी**

सर्वांत जुने व कित्येक संस्थानचे मान्यवर फोटोग्राफर्स व आर्टिस्टस

कच्छ कॅसल, सँडर्स्ट रोड, मुंबई.

(दिवाळीनिमित्त खास सवलती ठेवलेल्या आहेत)

दिपावलीचा आनंद दागिन्यांत असतो.

**वामन हरी पेठे**

सोने, चांदी, मोती, हिरे वगैरे रत्नांचे दागिने बनवून देतात. याशिवाय भेट म्हणून विविध अशी प्रेझेन्टेशन्स् तयार मिळतात.

पेठे बिल्डींग ठाकुरद्वार नाका मुंबई नं. ४ | फोन नं. ३०३८५






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

झाडीत असलेल्या पांडू गड्यानें ते शब्द ऐकतांच चमकून मागें वळून पाहिलें.

एरवीं त्या म्हातारे बुवांच्या शब्दांचा अर्थ चटकन् रघुनाथाच्या ध्यानांत आला नसता पण पांडू बाजूला झाल्यामुळें आरशांत पडलेलें आपलें प्रतिबिंब पाहून त्यांच्या टीकेचा रोख त्याला पुरेपूर कळला. त्याला कालची आठवण झाली. तो स्वतःशीच हंसला. काल एवढा मोठा समारंभ झाला. शेठजींचा त्यांत पुढाकार असल्यामुळें जणुं कांहीं आपल्या घरचें लग्न आहे असें समजूनच दुकानांतल्या सर्व नोकरांना त्यांत भाग घ्यावा लागला. अगदीं पांडू सुद्धां ठेवणींतला गुलाबी फेटा बांधून काल हारांच्या पाट्यांची नेआण करीत होता. पण आपल्या अंगावरचा मळकट कोट मात्र कायमच होता. तो बदलायचा तरी कसा? इनमीन सान्या दोन कोटांत आपला गृहस्थपणा साठविलेला. परटाकडे टाकलेला दुसरा कोट आणायला आपण परवां संध्याकाळीं गेलों. पण परीट, शिंपी, सोनार, यांनीं वेळेवर जर आपलीं कामें केलीं तर—छे! मुलाच्या लग्नांत लागणारा कोट बापानें त्याच्या मुंजींत परटाकडे टाकला तरच त्याला तो वेळेवर मिळण्याचा संभव! नाइलाजानें तो कळकट कोट घालून आपल्याला कालच्या समारंभांत वावरावें लागलें. सान्यांच्या तें लक्षांत आलें. एकदोघांनीं तें बोलूनहि दाखविलें. मग आज आपण अंगांत भट्टीचा स्वच्छ नीटनेटका कोट घातलेला पाहून त्यांनीं आपली थट्टा केली तर त्यांत अस्वाभाविक असें काय आहे? जानकीनें परटाच्या पाठीमागें लागून काल हा केव्हां पैदा केला कोणाला ठाऊक! पण मघांशीं घरांतून निघतांना जेव्हां आपण कालचाच मळकट डगला अंगांत चढवूं लागलों तेव्हां हळूंच हा कोट घेऊन ती पुढें आली आणि म्हणाली, "आज बाळाचा वाढदिवस आहे म्हटलं!" आपण मुकाट्यानें मळलेला कोट तिच्या हवालीं केला अन् धुतलेला कोट अंगांत चढविला. जी स्थिति कोटाची तीच दाढीची! काल दाढी केल्यानंतर आपल्या नियमाप्रमाणें आपण आज ती करायला नको होती. सेफ्टी रेझरची पाती भलतीकडे महाग झाल्यापासून आपणांला रोजच्या दाढीला रजा द्यावीच लागली. हो! पुरुषांच्या वाढलेल्या दाढीचा त्रास झाला तर तो त्याच्या बायकोला व्हायचा! इतर लोकांना त्यानें दाढी केली आहे की वाढवली आहे या चांभार-चौकशा करून काय फायदा आहे? गेल्या वर्षीपासून आपण तीन तीन दिवसांनीं दाढी करूं लागलों आणि आठवड्यानें परटाकडे द्यावयाचा कोट पंधरवड्यानें देऊं लागलों म्हणून तर सीतारामासारख्या गरीब विद्यार्थ्याला दरमहा १ रुपयाची मदत आपण करूं शकतों आणि तीसुद्धां पैन् पैचा हिशेब ठेवणाऱ्या जानकीला पत्तासुद्धां न लागूं न देता.

तिला आपलें हें करणें कळलेंही नसतें आणि आवडलेंही नसतें. पण केवळ गरीबीमुळें ज्याची मॅट्रीकची परीक्षा हुकली आहे आणि त्यामुळें सारा जन्म करंटेपणानें कारकुनींत काढायची पाळी त्याच्यावर आली आहे, त्यालाच——

म्हणूनतर आज आपण दाढी करणार नव्हतो. पण जानकी कसली वस्ताद चहा होतांच तिनें आधण पाणी माझ्यापुढें ठेवलें. मी त्या पाण्यांतून निघणारी वाफ बघत बसलों. तिनें आरसा पुढें आणून ठेवला मी त्यांत माझा चेहरा पाहूं लागलों. तिनें दाढीचें सामान आणून पुढ्यांत आपटलें. आतां आपण टंगळ मंगळ केली तर ही धर्मपत्नी आपली दाढी करायला सुद्धां कमी करायची नाहीं असें वाटून आपण मुकाट्यानें तोंडाला साबण फासायला सुरवात केली.

पण हा सारा इतिहास या म्हातारे बुवांना समजावून कसा सांगावयाचा? त्यांना तरुणपणीं बायको नवऱ्यावर किती आणि कसें प्रेम करते हें कांहीं केल्या आठवायचें नाहीं. आणि हरिजन विद्यार्थ्याला मी मदत करीत असतो म्हणून त्याला सांगितलें तर तें मलाच शिकवायला तयार व्हायचे नाहींत. पण खरोखर ही मदत हाच आपल्या आयुष्याचा सर्वांत उज्ज्वल भाग आहे. सिताराम्च्या हातांत दरमहा गुपचुप एक रुपया ठेवताना आपल्याला जो विलक्षण आनंद होतो—छे! लग्न होऊन जानकी घरी आल्यावर सर्वांचा डोळा चूकवून तिचें आपण जे पहिलें चुंबन घेतलें त्याच्या आठवणीचा आनंद सुद्धां त्याची बरोबरी करूं शकत नाहीं. किती झाल तरी हे अत्म्याचें समाधान आहे. शरिराचें नाहीं. कुठलातरी एक गरीब कारकून सुद्धां आपली शिकवण विलक्षण निष्ठेनें पाळत आहे हें गांधीजींना कळलें तर त्यांना सुद्धां—

तो भर भर जिना चढून वर गेला. दुकानाच्या माडीवरून चौकांतला गांधींचा पुतळा स्पष्ट दिसत होता; मात्र त्याची पाठ दुकानाकडे होती भर्कन् चिमण्यांचा थवा यावा आणि उडून जावा त्याप्रमाणें कालच्या समारंभाच्या सान्या गोड आठवणी रघुनाथाच्या मनांत पहांटे प्रमाणें येऊन गेल्या. त्या आठवणींत तो रमत राहिला असता. पण— समोरच्या कपाटाकडे लक्ष जातांच त्याच्या छातींत धस् झालें. इन्कमटॅक्सचें पत्र भरून पाठवायची मुदत अगदीं जवळ आली होती. मधल्या या समारंभामुळें दोन तीन दिवस कांहींच काम झालें नव्हतें. शेठजी काय नुसते सहीचे धनी. डोळ्यांत तेल घालून हिशेब तपासणाऱ्या अधिकाऱ्याला सुद्धां शेठजीनें काळाबाजार करून मिळविलेल्या पैशाचा पत्ता लागूं द्यावयाचा नाहीं म्हणजे आपणच—

त्यानें कपाट उघडलें वह्या बाहेर काढून तो आंकडेमोड करूं लागला. पण कां कोणें जाणे, त्या वह्यांत त्याला गांधींचा पुतळा पुनः पुनः दिसूं लागला. तो स्वताशींच म्हणत होता, खोटा हिशेब करणें हें पाप आहे. हें पाप आपण शेठजीसाठीं करीत असलों तरी त्याची जबाबदारी—छे! लगेच त्याला वाटलें, हें पाप आपण पोटासाठीं करीत आहे.

अस्वस्थ मनानें रघुनाथ उठला आणि खिडकींतून बाहेर पाहूं लागला. पाठमोरा गांधींचा पुतळा त्याला स्पष्ट दिसत होता, त्याला वाटलें, सत्याचा पुरस्कार करणाऱ्या गांधीजींच्या, या पुतळ्याला जर कानानें ऐकूं येत असतें तर बाजारपेठेंतल्या या तीन तीन मजली इमारतींच्या दगडांनीं सुद्धां आपल्या साक्षीनें चालणारी पापें त्याला ओरडून

( पान ४७ वर पहा )



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



: कवि० :

ना. घ. देशपांडे

## कुणकूण

वाळली सगळीं फुलें, उरला तरीपण वास हा !
लोपली वनदेवता, पण राहिला वनवास हा !
पालवी झडली तरी, उरलें जुनें पण पान हें !
गाव ते उठले तरी, उरले अजून वसाण हे !
अग्नि तो विझला जरी, निघतो तरीपण धूर हा
वेदना सरली जरी, सुकतो तरीपण नूर हा !
घोर वादळ सम्पले, पण राहिली हुरहूर ही
चन्द्रिका विझली तरी उरलीच रात्र निसूर ही !
वाद ते मिटले तरी पण राहिलेत विषाद हे
साद ओसरले तरी पण राहिले पडसाद हे !
घाव तो बुजला जरी उरली तरीपण खूण ही
तें रहस्यच लोपलें पण राहिली कुणकूण ही !


सण्डे स्पेशल मसाला

**मसाले**— सोनारी मसाला, पाठारे प्रभु सांभार कायस्थ मिरकुट, ब्राह्मणी गोडा व तिखट मसाला, ब्राह्मणी मेतकूट, लोणच्याचा तयार मसाला व उत्तम हिंग नेहमीं तयार मिळतील

★ पापड तिखट, गोडे, मुगाचे व उडदाचे.
★ सर्व प्रकारचीं लोणचीं व मुरंबे.

**परशराम आबाजी मसालेवाले**

ठाकुरद्वार रोड मुंबई २—ताडदेव, मुंबई ७
बाहेरगांवीं माल व्ही. पी. नें पाठवूं.

प्रदीप पिक्चर्सचीं दोन प्रभावीं आकर्षणें





**शराव आणि त्याग**

नामांकित नटनटींच्या प्रभावळींत झळकणार

दिग्दर्शकः-जी. पी. पवार

निर्मात्याः—कमळाबाई मंगळूरकर

प्रदीप पिक्चर्स २१३ चर्नी रोड, मुंबई नं. ४.

आगामी आकर्षणः—राणी अहिल्याबाई होळकर

**दिवाळी आणि नूतन वर्ष**

आमच्या सर्व ग्राहकांस व हित-चिंतकांस सुखसमृद्धिची जावो

सोल एजंट : **महाजन ब्रदर्स**, मांगलवाडी–मुंबई ४ ( टे.नं. ३११८९)


अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# गोव्याचें भाग्य

: लेखक :

आचार्य–काका कालेलकर

•

•• स्वाभिमान, आत्मविश्वास आणि जीवनसिद्धि या तीन गोष्टींवरच कोणत्याहि परंपरेचें भवितव्य अवलंबून असतें.

राजकीय दृष्ट्या गोवा एक दुर्दैवी प्रांत आहे. कधीं न संपणारी दुःखपरंपरा जशी गोव्याच्या वाट्याला आली आहे तशी कदाचित पोलंडच्याहि वाट्याला आली नसेल. इतकें असूनहि गोव्यांतील प्रजा जीव धरून आहे इतकेंच नव्हे तर जीवनांतील अनेक क्षेत्रांत स्वतःच्या व्यक्तित्वाची छाप पाडण्याची कला गोव्यांत कधींच मंदावली नाहीं. रत्नागिरी जिल्ह्यानें कांहीं अप्रतिम नररत्नें पैदा केलीं यामुळें त्या जिल्ह्याचें रत्नागिरी हें नांव सार्थ झालें असें म्हणतात. पण गोव्यानं संख्येने आणि विविधतेनें जितकी रत्नें आजवर दिली आहेत तितकीं दुसऱ्या कोणत्याच एवढ्या छोट्या प्रदेशाच्या वांट्याला आली नसतील.

कोण कोणत्या क्षेत्रांत कुणी कुणी कसें काय नांव मिळविलें आहे याचें स्मरण करण्याचें येथें प्रयोजन नाहीं. कारण गोव्याच्या या कीर्तीसंबंधानें कोठेंहि दुमत नाहीं. पण प्रश्न असा आहे कीं गोव्यामधें ही शक्ति आली कोठून ?

गोव्यांतील सृष्टिसौंदर्य अप्रतिम आहे हें खरें पण तसेंच सौंदर्य हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर ठिकठिकाणीं सांपडेल. उडपी, कारकळ, मंगळूरकडील प्रदेश कमी सुंदर नाहींत. जलविहाराला अत्यंत अनुकूल असे केरळ प्रांतांतील सृष्टिसौंदर्य कोणालाहि लोभनीय वाटेल. काश्मीर, कामरूप आणि केरळ हीं हिंदुस्थानचीं तीन तांत्रिक टोकें सौंदर्याच्या बाबतींत एकमेकांशीं अखंड स्पर्धा करीत राहणार. अशा सौंदर्यनिधान हिंदुस्थानामधें गोव्यानें सृष्टिसौंदर्यासाठीं अभिमान बाळगला तरी गर्व करावयास नको.

विशिष्ट आहारामुळें विशिष्ट गुणांचा उत्कर्ष होतो असे कांहीं लोक म्हणतात; पण तसं कांहीं निरपवाद अनुभव नाहीं. ज्या सरहद्द प्रांतानें पाणिनीसारखा अद्वितीय वैयाकरण उत्पन्न केला त्या प्रांतांतील आहार आजवर मुळींच बदलला नसला तरी त्याला आपली परंपरा टिकवतां आली नाहीं.

हवामानावर प्रजेची कर्तबगारी बहुतांशीं अवलंबून असते असें सिद्ध करण्याचा कित्येक युरोपियन लोकांनीं कसून प्रयत्न केला आहे. पण तोहि नियम अजून सिद्ध झाला नाहीं.

अमूक प्रकारची कर्तबगारी अमूक वंशांतच दिसून येते असें मानण्याकडे प्राचीनकाळच्या सर्वच समाजशास्त्र्यांचा कल होता. ही गोष्ट सिद्ध करण्याइतका निश्चित पुरावा आपणाला कधींच मिळण्याजोगा नाहीं.

तेव्हां शेवटीं असेंच म्हणावें लागतें कीं उज्ज्वल परंपरा टिकणें हें ती परंपरा टिकविण्याच्या आग्रहावरच अवलंबून असतें. त्या त्या लोकांनीं आपापली परंपरा टिकविण्याचा आग्रह जोपर्यंत कायम ठेवला आहे आणि जगाला त्या परंपरेची चहा आहे तोपर्यंत ती परंपरा टिकणार. स्वाभिमान, आत्मविश्वास आणि जीवनसिद्धि या तीन गोष्टींवरच कोणत्याहि परंपरेचें भवितव्य अवलंबून असतें.

गोव्याच्या बाबतींत आश्चर्य हें आहे कीं राजकीय दृष्ट्या एकसारखा तेजोवध होत असून देखील गोव्यांतील प्रजेनें अगदीं अद्भुतपणें वरील तीन गुणांची जोपासना केली आहे. किंबहुना एका बाजूनें झालेली हानि भरून काढण्यासाठीं तेथील जनतेनें दुसऱ्या अनेक क्षेत्रांत पुरुषार्थ करून दाखविण्याचा निश्चय केला असावा.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

ही गोष्ट जर खरी असेल तर गेल्या पांचशें हजार वर्षांच्या अनुभवानें गोव्यांतील जनतेची खात्री होऊन चुकली असली पाहिजे कीं एका स्वातंत्र्याच्या अभावीं सर्व गुणांचा समुदाय आणि कलांचा कलाप फिका पडतो. एका स्वातंत्र्याच्या अभावीं सर्व जीवनकलेला वैधव्य दशेंतच रहावें लागतें. कोणतीहि जीवनसिद्धि स्वातंत्र्यसिद्धीची गरज भागवूं शकत नाहीं. स्वातंत्र्याला कसलाहि पर्याय चालत नाहीं.

●

धर्मभेद, जातिभेद, आणि व्यवसायभेद यांनीं अनेक रीतीनें विभिन्न असलेल्या गोव्यामधें एकतेचें तत्त्व फक्त कोंकणी भाषा आहे. हिंदु असो किंवा क्रिरिस्तांव असो किंवा मुसलमान असो, गोवेकर घरांत आणि आपसांत कोंकणींतच बोलावयाचा. मग तो पोटासाठीं युरोपांत गेला असो किंवा अमेरिकेंत. गोवेकरांची हृदयाची भाषा ही कोंकणीच आहे.

जेव्हां जेव्हां गोव्यांतील भाषेचा विचार करतों तेव्हां तेव्हां तेथील लोकांच्या भाषाभक्तीचें आणि भाषाद्रोहाचें मला राहून राहून आश्चर्य वाटलें आहे.

कोंकणी भाषेला स्वतःचें असें साहित्य नाहीं त्याअर्थीं ती स्वतंत्र भाषाच नव्हे. हल्लींच्या चढाओढीच्या जगांत कोंकणीला जगण्याचा अधिकार नाहीं. तिला जगविण्याचा प्रयत्न करण्यांत अर्थ नाहीं असें कित्येक लोक म्हणतात. कोंकणीला स्वतःचें साहित्य नाहीं ही गोष्ट खरी आहे. कोंकणीची थोडीशी लोकगीतें आणि कोंकणींतील मार्मिक म्हणी यांना कितीहि पुढें केलें तरी कोंकणीमधें नांव घेण्याइतकें साहित्य आहे असें सिद्ध होत नाहीं. कोंकणीला स्वतःचें साहित्य नाहीं ही जितकी दुःखद गोष्ट आहे तितकीच आश्चर्यकारकहि आहे.

पण ज्या भाषेला साहित्य नाहीं तिनें मेलेंच पाहिजे काय ? वडुर लोकांची भाषा हिंदुस्तानांत दूरवर पसरलेली आहे. हे वडुर लोक मोठ्या चिकाटीनें स्वतःच्या भाषेला टिकवीत आहेत. पण वडुर लोक संस्काराच्या बाबतींत अगदींच मागसलेले. जीवनसमृद्धि म्हणजे काय हें त्यांना ठाऊकच नाहीं. जात या नात्यानें वडुर लोक कांहीं असाधारण पुरुषार्थ करून दाखवणार आहेत अशी अपेक्षा कुणालाच नाहीं. त्यांना स्वतःलाहि नाहीं यामुळें वडुर लोकांच्या भाषला कोणतेंच भवितव्य नाहीं असें कोणी म्हटलें तर तें समजून येण्यासारखें आहे. दक्षिणेकडील नय्याडी लोक, सिलोन मधील वेड्डा लोक यांच्या भाषेविषयीं देखील असेंच म्हणतां येईल.

पण कोंकणी भाषेचें तसें नाहीं. कोकणी भाषा संस्कृत कुटुंबांतील आहे. धातु, प्रत्यय, शब्दसमृद्धि, समास बनवण्याची शक्ति कोणत्याहि बाबतींत बंगाली, हिंदी, मराठी किंवा गुजराती या भाषेहून कोंकणी कमी कमावलेली नाहीं. चार भावांपैकीं तिघांनीं पुष्कळ संपत्ती शिलकीला टाकली आणि एकाद्यानें पुरुषार्थ असूनहि धनसंग्रह केला नाहीं म्हणून कांहीं तो कमी संस्कारी ठरत नाहीं. हिंदुस्थानांतील सर्व प्रांतीय भाषांत जें साहित्य आहे तें तर कोंकणींत आणण्याचा कोणी प्रयत्न केला तर ती भाषा खात्रीनें कमी पडणार नाहीं. भाषेंत सामर्थ्य नाहीं अमूक विचार किंवा कल्पना आम्हांस कोंकणींत आणवां येत नाहीं असें म्हणण्याची पाळी कोंकणी लेखकावर कधीं यावयाची नाहीं.

आणि कोंकणी भाषा पोरकी भाषा नाहीं. संस्कृतचें दूध तर तिला मिळत आलें आहेच. मराठी, गुजराती, हिंदी, बंगाली इत्यादि भाषा तिच्या बहिणीच आहेत. त्यांच्या घरची समृद्धि कोंकणीसाठीं परधन म्हणतां यावयाचें नाहीं आणि कोंकणीनें कानडी, इंग्रजी, पोर्तुगीज [illegible] भाषांशीं संपर्क ठेवल्यामुळें तेथील भाषा सौष्ठवहि तिला आपलेसें करतां आलें आहे. कोंकणीमधें साहित्य नाहीं हें जितकें खरें आहे तितकेंच हेंहि खरें आहे कीं कोंकणीच्या साहित्य शक्तींत कसलेंच दैन्य नाहीं.

कोंकणी भाषेचें आयुष्यहि थोडथोडकें नाहीं. मराठी, गुजराती, कानडी, तेलगू या भाषा जितक्या जुन्या आहेत तितकीच कोंकणीहि जुनी आहे. अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत कोंकणीचे पुत्र तिला चिकटून राहिले आहेत. गोवेकरांची कोंकणीनिष्ठा अपूर्व आहे.

आश्चर्याची ही आहे कीं कोंकणी बोलणाऱ्या लोकांनीं कोंकणी सोडून इतर कितीतरी भाषांची निष्ठापूर्वक सेवा केली आहे आणि या त्या भाषेंत नांव मिळविले आहे. जे लोक घरीं कोंकणी बोलतात अशांनीं संस्कृत, मराठी, कन्नड, पोर्तुगीज, फ्रेंच आणि इंग्रजी या भाषांतल्या साहित्यांत भर घालून कीर्ति मिळविली आहे. 'यथा भाषकः तथा भाषा' हें सूत्र जर खरें असेल तर अनेक भाषांतून ज्यांनीं स्वतःला साहित्यस्वामी म्हणवून घेतलें त्यांच्या भाषा क्षीण किंवा दुर्बळ आहेत असें कधींहि म्हणतां यावयाचें नाहीं.

पण ज्या प्रमाणें एका स्वातंत्र्याची उपेक्षा करून गोवेकरांनीं असंख्य विद्येंत आणि क्षेत्रांत पराक्रम करूनहि त्यांना आपलें मुख उज्ज्वल करतां आलें नाहीं त्याचप्रमाणें अनेक साहित्यांची सेवा करून फक्त मातृभाषेचीच त्यांनीं उपेक्षा केली हे पाप त्यांना धुवून काढतां आलें नाहीं. मातेची कितीहि उपेक्षा केली तरी ती आपल्या अपत्यांना शाप देत नसते हें खरें आहे. तरीहि मातेची उपेक्षा करणाऱ्या पुत्रांच्या जीवनांत तजेला हा कधींच येत नसतो.

●

कोंकणी ही निराळी भाषा नसून मराठीचीच ती एक बोली आहे असें सांगतात. हा प्रश्न जर भाषा शास्त्र्यांनीं सोडविण्याजोगा असेल तर डॉ. कत्र्यांसारख्या विद्वानाची साक्ष आपल्याला पुरेशी झाली पाहिजे. ते म्हणतात कीं कोंकणी ही एक मराठी व गुजरातीला जवळ असलेली एक स्वतंत्र भाषा आहे.

कोंकणी बोलणाऱ्या लोकांचें मत घेऊन हा प्रश्न सोडविण्याजोगा असेल तर अर्धे अधिक कोंकणी लोक म्हणतील कीं कोंकणी ही आमची घरगुती भाषा आहे. मराठी हें तिचें साहित्यिक रूप आहे.

मराठी बोलणाऱ्यांचा अभिप्राय विचारला तर मुलूखगिरीची आठवण असलेले महाराष्ट्रीय ताबडतोब म्हणणार कीं कोंकणी ही मराठीचीच एक बोली आहे यांत शंका नाहीं.

आपण हा प्रश्न परिस्थितीच्या आणि भविष्याच्या दृष्टीनें सोडविविण्याचा प्रयत्न करूं.

कोंकणी आणि मराठी या दोन्ही भाषा जशा एकमेकाला अतिशय जवळच्या आहेत त्याचप्रमाणें प्रादेशिक दृष्ट्या या अगदीं जवळच्या

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

शेजार भाषा आहेत. गोव्यांतील आणि त्याच्या आसपासच्या कोंकण प्रदेशांतील लोकांचा संबंध आसपासच्या मराठी प्रदेशाशीं आणि मराठी बोलणाऱ्या लोकांशीं अगदीं जवळचा आहे. लग्नाच्या बाबतींत, आर्थिक व्यवहाराच्या बाबतींत आणि सामाजिक पुरुषार्थाच्या बाबतींत गोव्यांतील लोकांचें जीवन महाराष्ट्राशीं पूर्णपणें निगडित आहे. अशा स्थितींत गोव्यांतील हिंदूंना आणि किरिस्तावांना मराठी शिकल्यावाचून गत्यंतर नाहीं.

हिंदुस्तानांतील इंग्रजांचें राज्य झपाट्यानें संपुष्टांत येत आहे. इंग्रजाबरोबर त्यांच्या भाषेची प्रतिष्ठाहि आपल्या देशांतून कमी होणार आहे. येथील राज्यव्यवहार आणि लोकव्यवहार देशी भाषांतूनच चालणार आहे. गोव्यामध्यें देखील लोकसत्ता स्थापना झाल्यापासून रहाणार नाहीं. लोकसत्तेच्या स्थापनेचें पाहिलें लक्षण म्हणजे राज्यव्यवहार लोकभाषेंतून होणें हें आहे. आज गोव्यांत सरकारी प्राथमिक शिक्षण पोर्तुगीज भाषेंत दिलें जात असलें तरी गोव्यांतील सर्व अंमलदारांना गोव्याच्या भाषेंतूनच राज्यकारभार चालवावा लागणार आहे.

अशा स्थितींत गोव्यांतील किरिस्तांवांना देखील पोर्तुगीज भाषेची कास सोडून आणि इंग्रजीचा वाटत असलेला मोह टाकून कोंकणी आणि मराठीचीच उपासना करावी लागणार आहे.

गोव्यांतील पोर्तुगीज सरकार कोंकणी मराठीच्या वादाचा फायदा घेऊन हिंदु संस्कृतीला चिरडून टाकील अशी शंका घेण्याचे आणि भीति बाळगण्याचे दिवस आतां उरले नाहींत. गोव्यांतील हिंदूंनीं आणि किरिस्तांवांनीं येत्या पंचवीस वर्षांपुरतें ठरवावें कीं गोव्यांतील प्राथमिक शिक्षण कोंकणींतून दिलें जावें कीं मराठींतून. राज्यकारभार चालविण्याच्या बाबतींत देखील एका पिढीपुरतें त्यांना हेंच ठरवावें लागेल कीं राज्यकारभार मराठींतून चालवावयाचा कीं कोंकणींतून. मराठी बोलणाऱ्या आणि हिंदु संस्कृतीचा अभिमान बाळगणाऱ्या लोकांत जर दीर्घदृष्टि असली तर हा प्रश्न सोडवणें मुळींच कठीण जाऊं नये.

●

आतां मराठीच्या आग्रही लोकांना दोन शब्द सांगणें आवश्यक आहे. कोंकणीला तुम्ही मराठीचीच एक शाखा किंवा बोली समजतांना ? तसें असेल तर कोंकणीला मराठीच्या घरचे कोंडेकुस्कर बनवूं नका. कोंकणीचे सर्व शब्द, सर्व वाक्प्रचार, सर्व म्हणी आणि सर्व लोकगीतें आपलीं म्हणून स्वीकारण्याची मराठीची तयारी असली पाहिजे. कोंकणीला हेंगाडी म्हणून हिणवावयाचें आणि ती आमच्याच कुटुंबातील आहे असा तिच्यावर अधिकार सांगावयाचा ही विसंगत नीति महाराष्ट्रीयांनीं सोडून दिली पाहिजे.

महाराष्ट्रीयांनीं कोंकणीचें आपुलकीनें अध्ययन करावें. कोंकणी प्रत्ययांना मराठी प्रत्ययाबरोबर वैकल्पिक स्थान द्यावें. कोंकणींतील म्हणी अभ्यासून त्यांचा आपल्या साहित्यांत मोकळ्या हातानें पेरावें. कोंकणांतील आणि विशेषतः गोव्यांतील सामाजिक जीवनाशीं एकरस होऊन आपल्या कथाकादंबऱ्यांतून त्याचे गोडवे गावेत. शरद्बाबूंनीं बंगाल्यांतील गृहजीवनाला स्वतःच्या साहित्यानें जसें नटविलें आहे तसें महाराष्ट्रीय लेखकांनीं गोव्यांतील सामाजिक पुरुषार्थांचा प्रेमानें पुरस्कार करावा आणि मग म्हणावें कीं गोवा हा महाराष्ट्राचा एक भाग आहे. मुलुखगिरीचे दिवस आतां उरले नाहींत. प्रेम, सेवा आणि आत्मीयतेचें बलिदान यांच्या जोरावरच यापुढें प्रदेश, समाज आणि राष्ट्रें आपलीशीं करतां येतील.

स्वतःचें आणि दुसऱ्याचें रक्त वहावयास लावून विजय मिळविण्याचें युग आतां संपलें. स्वतःचेंच रक्ताचें सेवाद्वारा कामांत रूपांतर करून हवी ती मुलूखगिरी करा. तुम्हांला कुणी नाहीं म्हणणार नाहीं. प्रथम सेवेच्या द्वारा लोकांच्या हृदयावर राज्य मिळवा. लोकांना तुमच्या हृदयांत स्थान द्या. एवढें केलें म्हणजे कोंकणीचा आणि मराठीचा काय संबंध आहे या प्रश्नांची तुम्हांला चर्चाच करावी लागणार नाहीं.

●

ज्या युगांत सर्वच धर्मांचा निःपात करण्याचा विडा अधर्मानें उचलला आहे त्या युगांत धर्मांनीं आपापसांत दुही माजवणें म्हणजे आत्महत्या करणेंच आहे. प्रेमधर्मी, ब्रह्मचारी, परमभागवत येशूच्या उपदेशावर आधारलेल्या धर्माची उपेक्षा आपण काय म्हणून करावी ? आपल्याच देशांतील आपल्याच हाडामांसाच्या लोकांनीं ज्या धर्माचा स्वीकार केला त्याला आपण परकी धर्म कसें म्हणावें ? जवळ जवळ हजार वर्षें जो धर्म आपल्या देशांत नांदत आहे त्यांची पाळेंमुळें आपण उपटून कशी टाकणार ? ख्रिस्ती धर्म म्हणजे सद्गुरूच्या मार्फत ईश्वराची उपासना करणारा एक पंथ आहे. जसा शीख धर्म तसाच ख्रिस्ती धर्म. एकाद्यानें ख्रिस्ती धर्म स्विकारला म्हणून त्याला आपण समाजबाह्य काय म्हणून ठरवावें ? हिंदु धर्म आणि ख्रिस्ती धर्म यांचे धर्मग्रंथ निरनिराळे असतील. पण तेवढ्यासाठीं या दोन धर्मांचे समाज निरनिराळे पाडण्याचें मुळींच कारण नाहीं. शैव, शाक्त, वैष्णव यामध्यें उपास्यभेद असून देखील यांच्यामध्यें सामाजिक ऐक्य टिकूं शकतें. द्वैती आणि अद्वैती किंवा विशिष्ट अद्वैती यांच्यामधें दर्शनभेद असून देखील त्यांनीं आपले निरनिराळे समाज स्थापन केले नाहींत. वैष्णवधर्म वैदिक आणि जैन धर्म वेदबाह्य असा मौलिक भेद असून देखील गुजराथमध्यें त्यांना एक समाज होऊन रहातां येतें तर यापुढें गोव्यांतील हिंदूंना आणि किरिस्तांवांना एक समाज होऊन गुण्यागोविंदानें कां राहता येऊं नये ?

गोव्यांत सर्वत्र मराठी भाषा चालवावयाची असली तरी देखील पायरी वापरून आणि तिचा आशीर्वाद घेऊनच तसें करतां येईल.

हिंदु संस्कृति निराळी आणि ख्रिस्ती संस्कृति निराळी असें म्हणण्याचे दिवस आतां संपले. हिंदु, मुसलमानी, आणि ख्रिस्ती आदि सर्व संस्कृतींचा जिच्यांत समावेश होतो त्या हिंदुस्तानी संस्कृतीचे दिवस आतां उगवले आहेत. 'सागरे सर्व तीर्थानि' हा धार्मिक सिद्धांत सागराच्या किनाऱ्यावर रहाणाऱ्या लोकांना तरी तावडतोब पटला पाहिजे.




अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

: लेखक :

**ना. सी. फडके**

विनायक बाहेरच्या खोलींत बसला होता. पण मधूनच तो आपल्या मनगटा-वरच्या घड्याळावर पाही. तेवढी गोष्ट वजा केली तर त्याचं सारं लक्ष आंतल्या खोलींत वेषभूषा करण्यांत गुंतलेल्या गुलाबच्या हाल-चाली अर्धवट उघड्या राहिलेल्या मधल्या दारांतून जेवढ्या दिसतील तेवढ्या पहाण्याकडे होतं. आपल्याकडे कुणी पहात नाहीं अशा खात्रीनं वेषभूषेंत गुंतलेल्या स्त्रीच्या हालचाली इतक्या चित्ताकर्षक असतील अशी विनायकची कल्पना नव्हती. तें हालतं चालतं सौंदर्य तासान् तास पहात रहावं असं त्याच्या मनांत आलं. तेवढ्यासाठी सिनेमाला जाण्याचा बेत रद्द करण्याची त्याची तयारी होती. या जिवंत सौंदर्यापुढें सौंदर्याच्या त्या पडद्यावरील छायांची काय पाड ? परंतु सिनेमाला जाण्यांत एक मोठा फायदा होता. या क्षणीं ज्या लावण्याची हालचाल त्याला बाहेरच्या खोलींत बसून अंतरावरून चोरूनच पहाता येत होती तें लावण्य सिनेमाच्या थिएटरांत गेल्यावर त्याच्या सन्निध बसणार होतं. शिवाय आताचा मुकेपणा सोडून तें बोलूंहि लागणार होतं. आणि गुलाबच्या सौंदर्याकडे अधिक लक्ष द्यावं कीं तिचे गोड गोड शब्द कान भरून ऐकावेत अशी त्याची धांदल उडणार होती...

म्हणूनच तो वरचेवर घड्याळांत पाहून घाई करीत होता. तो पुनः पुन्हां तिला मोठ्यानं सांगत होता 'लौकर निघायला पाहिजे बरं का,' 'उशीर होतो आहे हं;' आणि तिकडून आपल्या खोलींतून गुलाब मानहि न वळवितां कानापासला केसांचा फुगा दुरुस्त करीत किंवा शंभराव्यांदा साडीचा पदर मनाजोगा करीत म्हणत होती, 'हूं' 'हूं'. अखेर गुलाब आरशापासून दूर झालेली विनायकला दिसली तेव्हां त्याला वाटलं, तिची वेषभूषा संपली असावी. ती बाहेर आल्याबरोबर लगेच निघावं अशा हेतूनं विनायक कोचावरूनं उठला आणि आपली टोपी आपण कुठें काढून ठेवली तें पाहूं लागला.

तितक्यांत टेलिफोन वाजला. झटकन् कोपऱ्यांतल्या टेलिफोनच्या टेबलापाशी जाऊन त्यानं रिसीव्हर उचलून विचारलं, "हलो, कोण आहे ?"

त्यानं ऐकलं, "गुलाब आहे का घरांत ?"

तो आवाज त्याच्या ओळखीचा मुळींच नव्हता. पण तो एका तरूण पुरुषाचा होता खास. हें लक्षांत आल्यामुळें असेल किंवा सिनेमाला निघायला आतां आणखीन् उशीर होणार या कल्पनेनं असेल, परंतु जरा चिडखोरपणानं त्यानं म्हटलं,

"आहे, पण ती फार घाईंत आहे."

"असूं दे, तिला म्हणावं एक मिनिट टेलिफोनवर ये."

विनायक म्हणाला, "उद्या सकाळी फोन केलात तर नाही चालणार काय ?"

"नाहीं चालणार ! गुलाबशी आत्ताच बोललं पाहिजे मला. तिला म्हणावं एक मिनिट ये."

विनायकच्या मनांत आलं, अशा प्रकारें बोलणारा हा कोण मोठा सोकाजी ? क्षणभर त्याला वाटलं, फोन बंद करून टाकावा पण तितक्यांत आंतून गुलाबनं विचारलं,

"कोण रे विनायक ?"

विनायकच्या मनांत जें होतं तें बोलण्या-सारखं नव्हतं. तो म्हणाला, "तूंच बघ येऊन !"



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# "तेचि पुरुष दैवाचे!"

गुलाब लगबगीनं बाहेर आली व तिनं रिसीव्हर तोंडाला लावला. तिच्या खांद्यावर टॉवेल होता. त्यावरून विनायकनं ओळखलं कीं तिचा जामानिमा अजूनहि पुरा व्हायचा होता. ती फोनमध्यें बोलूं लागली,

"हलो, कोण आहे?"

"मी! ओळखलंस ना?"

गुलाबचा चेहरा एकदम बदललेला विनायकला दिसला. फोनच्या दुसऱ्या टोंकाहून कोण बोलत असेल याची त्याला कल्पना होईना. त्या व्यक्तीचं बोलणं त्याला ऐकूं येणं शक्य नव्हतं. त्याचा अदमास करण्यासाठीं तो गुलाबचं बोलणं अधिक लक्ष देऊन ऐकूं लागला. ती म्हणाली,

"म्हणजे काय? ओळखणार नाही असं होणं शक्य आहे काय? परंतु दोन वर्षे अजिबात तुझी कांहीं एक बातमी नव्हती आणि आतां ध्यानीं-मनीं नसतां तूं

• • भारी उदास आणखी एकटं वाटायचं. तुझी पत्रं येईनाशीं झाली. आणखी अखेर तर तुझी बातमीच समजेना. तेव्हां माझी जी अवस्था झाली तिचं मी कसं वर्णन करूं—

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

एकदम माझ्याशीं फोनवरून बोलतो आहेस त्यामुळें–"

" तुला आनंद झाला कीं—"

" हें काय विचारणं तुझं ? फार आनंद झाला ! " परंतु हें सांगतांना गुलाबच्या मनांत आलं, आपले हे शब्द मनापासूनचे नाहींत हें ऐकणाऱ्याला अगदीं सहज कळण्यासारखं आहे.

म्हणून ती पुन्हां म्हणाली,

" फार आनंद झाला. पण खरं म्हणजे तुझा रागहि आलेला आहे ! "

" राग ? तो कां बुवा ? "

" ही काय रीत झाली होय ? दोन वर्षांनीं परत मुंबईस येतो आहेस आणखी मला नुसता फोन करतो आहेस ! "

" त्याचं असं झालं, दोन घटकां पूर्वीच मी मुंबईत आलों. चहा घेतला, अंघोळ केली, कपडे बदललं आणि तुझ्याकडेच येण्याचा विचार केला. पण म्हटलं, तुला फोन करावा आणखी तूं घरीं आहेस कीं नाही त्याची खात्री करून घ्यावी. आहेस ना घरीं ?"

" अं...अं...आहे, पण अगदी बाहेर जायला निघालें आहे रे ! रागावूं नकोस हं मनोहर ! "

" रागावत नाहीं, पण बाहेर म्हणजे कुठं निघाली आहेस ! "

" सिनेमाला. तूं येतोस काय ? "

" मी होय ? तुझ्याबरोबर कोण आहे ! "

" बरोबर होय ?...तूं ये म्हणजे ओळखच करून देतें. अगदी ताबडतोब ये हं मात्र. कारण आधींच फार उशीर झाला आहे ? "

" कुठल्या सिनेमाला जाणार आहेस तूं ?"

" मेट्रोला ! "

" मग हें बघ, असं करतों. मी तुझ्याकडे या मग सिनेमाला जायचं असं करण्यानं फार उशीर होईल. या हॉटेलपासून मेट्रो थिएटर जवळ आहे. तेव्हां मी तुला थिएटरबरच भेटतों."

" असं म्हणतोस ? कांहीं हरकत नाहीं. मात्र नक्की ये हं... अच्छा ! "

ती फोनपासून दूर झाली आणि जणू विनायक थोड्या अंतरावर उभा आहे हें अजिबात विसरल्याप्रमाणें ती आपल्या खोलीकडे जाऊं लागली.

त्यानं विचारलं, " कोण ग ? "

ती म्हणाली, " मग सांगेन ! "

" बरं, असेल कुणी मला काय करायचं आहे ! पण आतां जास्ती उशीर केलेला मला खपायचा नाही. "

गुलाबची चर्या एकदम बदलली व ती म्हणाली, " खपायचा नाही ? असलं अधिकाराचं बोलणं मलाहि खपायचं नाहीं हं ! माझी तयारी तर पुरती व्हायला हवी ? कां आपली येऊं तशीच ? "

विनायकला तिचे ते शब्द मोठे चमत्कारिक वाटले. ती असं अगदीं उसळून त्याच्याशीं पूर्वी कधीं बोलली नव्हती.

स्वतः गुलाबच्याहि लक्षांत आलं कीं आपण विनायकशीं जरा एकदम कडवटपणानं बोललों. परंतु त्याचं कारणहि तिला समजत होतं. ती आणि विनायक एकमेकांच्या प्रेमांत गुंतली होती हें जरी खरं तरी पूर्वी ज्या तऱ्हेचं प्रेम तिनं मनोहरवर केलं होतं तें निराळं होतं. मनोहरनं आपल्यावर अधिकार गाजवावा याचा तिला कधीं राग आला नव्हता. उलट ती गोष्ट तिला आवडत असे. तिचा तिला अभिमान वाटत असे. उलट विनायकबरोबर लग्न करण्यासदेखील ती कबूल झाली होती, परंतु त्यानं आपल्यावर अधिकार गाजवावा ही गोष्ट तिला अगदीं नापसंत होती.

ती आरशापुढें छोट्या स्टुलावर बसली आणि टॉवेलनं तोंड घाईनं पुसूं लागली तेव्हां तिच्या मनांत आलं, आत्ता मनोहर भेटला नसता तर आपण विनायकशीं कडवटपणानं बोललों नसतों...मनोहरच्या या आकस्मिक येण्यानं आपल्या मनोवृत्तीवर बरेच परिणाम होणार आहेत...

मनोहर भेटला म्हणून झालेल्या आनंदाची तिची पहिली उर्मी ओसरली तेव्हां तिला वाटलं, आतां आपण कसं वागायचं ?...

तिचं आणि विनायकचं लग्न अगदीं रीतसर ठरलेलं नसलं तरी भोवतालची सारी माणसें ओळखून होती कीं तें होणार. मनोहरला ती मनानं अजिबात विसरून गेली असती तर कांहीं प्रश्नच नव्हता. मनोहरला तिला सरळ सांगतां आलं असतं कीं मी विनायकशीं लग्न करणार आहे. परंतु मनोहरला ती विसरलेली नव्हती. इतकंच नव्हे तर आतां ज्या क्षणीं तिनं विनायकच्या प्रश्नाला उत्तर दिलं होतं त्या क्षणीं तिला पूर्णपणें कळलं होतं कीं, आपलं मन जसं मनोहरच्या ठिकाणीं गुंतलेलं आहे तसं तें दुसऱ्या ठिकाणीं गुंतणं शक्य नाहीं. तिला एकदम वाटलं होतं कीं सैन्यांत दाखल होऊन आघाडीवर मनोहर जायला निघाला त्यावेळीं जी परिस्थिति होती तीच आज जशीच्या तशी असती तर केवढी चांगली गोष्ट झाली असती. पण आतां विनायकमुळें निराळी परिस्थिति होती. हा बदल एकदम नाहीसा होईल व एकदम पूर्वीची परिस्थिति येईल तर किती बरं होईल असं तिच्या मनांत आवेगानं आलं होतं. आणि याच कारणानं तिनं विनायकला तोडून उत्तर दिलं होतं...

ओठांवरून लिपस्टिक फिरवितांना तिला एक चमत्कारिक आठवण झाली. पुरुषानं मिशा ठेवलेल्या तिला आवडत असत. मनोहर ओठांवरच्या मिशा साफ काढीत असे. तिनं मिशा ठेवण्याबद्दल आग्रह करावा आणि तो त्यानं ऐकूं नये. अखेर एकदां अगदी रुसलेला चेहरा करून ती त्याला म्हणाली होती,

" तुझ्यासाठी वाटेल तें करीन म्हणतोस, आणखी मी मिशी ठेव म्हटलं तर तेवढं सुद्धां होत नाही तुझ्या हातून ! "

यावर मनोहर खूप मोठ्यानं हसला होता, व म्हणाला होता, " अग माझ्या चेहऱ्याला शोभायच्या नाहीत मिशा ! "

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"बघुं या" असं म्हणून तिनं आपली भुंवया कोरण्याची पेन्सिल घेऊन त्याच्या ओंठावर ऐटबाज छोट्या मिशा काढल्या होत्या.

आणि मग त्याच्याकडे पाहतांच तिला विलक्षण हंसूं लोटलं होतं. मनोहर म्हणाला होता, "झाली आतां तुझी खात्री ?" आणि त्यानं घाईनं आपले ओंठ रुमालानं स्वच्छ केले होते.

या आठवणीवरून आतां तिच्या मनांत आलं–मनोहर आतां कसा दिसत असेल बरं ? पूर्वीसारखाच ? देखणा, हंसरा किंचित् उतावळ्या स्वभावाचा ? कीं त्याच्यांत कांहीं बदल झाला असेल ? तो प्रत्यक्ष आपल्या दृष्टीस आतां केव्हां पडेल अशी अधीरता तिला वाटूं लागली.

●

विनायकबरोबर मेट्रो सिनेमाच्या थिएटरवर जाऊन प्रवेशद्वाराजवळच्या दिव्यांच्या झगझगीत प्रकाशानं न्हाऊन निघालेल्या वर्तुळाकार जागेंत जेव्हां ती मनोहरची वाट पहात उभी राहिली तेव्हां तिच्या मनांतली ही अधीरता वाढली होती. विनायक तिच्याशीं सारखं कांहीं तरी बोलत होता, पण त्याच्या बोलण्याकडे तिचं मुळींच लक्ष नव्हतं. किंबहुना विनायकाच्या शेजारी ती उभी होती या गोष्टीचा मनांतल्या मनांत तिला राग आला होता. मनोहरच्या भेटीसाठीं ती एकटीच उभी असती तर तिला फार आनंद झाला असता. आतां मनोहर जेव्हां तिला भेटेल तेव्हां ती विनायकच्या संगतींत असलेली त्याला दिसेल, ही गोष्ट तिच्या मनांत वरचेवर येत होती, व तिला त्या गोष्टीचा राग येत होता. नाईलाज म्हणून ती विनायकच्या शेजारी उभी राहिली होती. ज्या क्षणीं दोन वर्षांपूर्वी मनोहरनं तिचा निरोप घेतला होता तो क्षण आणि आतां ज्या क्षणीं मनोहर तिला भेटणार होता तो क्षण, ह्या दोन क्षणामधला सारा काळ पुसून टाकून तिला सांधता आले असते तर तिला फार बरं वाटलं असतं. पण तें शक्य नव्हतं. मधल्या काळांत ज्या गोष्टी घडल्या त्या कांहीं अशी झटकन् पुसून टाकतां येण्यासारख्या नव्हत्या. मनोहर जवळ त्यांचा खुलासा तिला करावा लागणार होता. या घटकेला तिला विनायक जवळ उभं राहणं भाग होतं !...

मनांत हे विचार करतां करतां तिची नजर सारखी मनोहरला शोधीत होती. थिएटरपुढें येऊन उभ्या राहणाऱ्या प्रत्येक गाडीकडे ती आशाळभूत डोळ्यांनीं पाही, परंतु तिची निराशा होई. अखेर घंटा झाली. विनायक तिला म्हणाला,

"किती वेळ उभी राहणार आहेस तूं ? आतां सिनेमा सुरूं होईल. चल कीं."

ती म्हणाली, "तुला घाई असेल तर तूं जा आंत आणि बैस आपल्या जागेवर."

"पण तूं किती वेळ उभं रहायचं ठरवलं आहेस ?"

"मनोहर आल्यावाचून रहायचा नाहीं. नक्की येतो म्हणाला तो."

"पण कदाचित कांहीं अडचण आली असेल आणखी त्याला येतां आलं नसेल."

नजरेनं दूरवर शोधीत तिनं मान हालविली. "अं हं. असं व्हायचं नाहीं. तो आल्यावाचून रहायचा नाहीं."

"वेडी आहेस तूं. दुसरी घंटासुद्धां झाली बघ. चल." विनायकनं तिचा दंड हलकेंच धरला.

परंतु तिनं तो झटका देऊन सोडवून घेतला, व त्याकडे न पहातांच ती म्हणाली, "तुला वाटलं तर आंत जाऊन बैस म्हणून सांगितलं ना. किती वेळ थांबायचं तें माझं मी ठरवीन. तूं कोण माझ्यावर अधिकार चालविणार ? मला नाहीं खपायचं."

गेल्या दोन घटकांच्या अवधींत हें वाक्य ती आतां दुसऱ्यांदा उच्चारीत होती. आणि तें उच्चारतांना तिच्या मनांत पुन्हां येत होतं मनोहरनं तिच्यावर अधिकार चालविणं वेगळं. त्यापासून तिला आनंद होण्यासारखा होता. विनायकनं काय म्हणून तिच्यावर अधिकार चालवावा. मनोहरविषयीं ज्या भावना तिच्या मनांत होत्या त्या कांहीं विनायकविषयीं नव्हत्या. तिनं मनोहरवर प्रेम केलं होतं. उलट विनायकवर तिनं प्रेम केलं नव्हतं, तर फक्त तिनं त्याला तिच्यावर प्रेम करूं दिलं होतं. हा फरक किती महत्त्वाचा होता याची तीव्र जाणीव तिला यावेळीं झाली होती...

तिच्या दुरुत्तरानं रागावलेला विनायक म्हणाला, "ठीक आहे. मग मी आंत जाऊन बसतो तर. ही दोन तिकिटं संभाळ हें तुझं. आणखी हें त्या—" वाक्य पुरं न करतांच तो झटकन वळला आणि आंत गेला.

विनायक गेल्याबरोबर सुलभाच्या मनांत एकदम आलं, हें एक प्रकारं बरं झालं, आतां मनोहर आला म्हणजे आपण एकट्याच उभ्या असलेल्या त्याला दिसूं. आपल्याजवळ विनायक उभा असलेला त्याला दिसणार नाहीं. आर्थात् आंत गेल्यावर तो दिसेल परंतु आंत जाऊन बसण्याच्या आधींच आपल्याला मनोहरशीं एकीकडे कांहीं बोलतां येईल...

ती अतिशय उत्सुकतेनें मनोहरची वाट पाहूं लागली.

पण दहा मिनिटं झाली, पंधरा मिनिटं झालीं तरी तिला मनोहर दिसेना. सिनेमापुढच्या रस्त्याच्या एका बाजूला मोटारींची रांगच्या रांग स्वस्थ उभी होती. दारापुढें एकहि गाडी आतां येऊन उभी रहात नव्हती. वीस मिनिटांपूर्वीची सारी गडबड थांबून आतां तो भाग अगदीं शांत झाला होता. ज्या वर्तुळाकार दालनांत ती उभी होती त्या ठिकाणीं दोनचारच माणसं रेंगाळत होती.

आतां अधिक वेळ वाट पाहण्यांत अर्थ नाहीं असं ठरविणं सुलभाला भाग होतं. आंत जायचं तिच्या जिवावर आलं होतं. परंतु तिचं उभं राहणं भोंवतालच्या लोकांना चमत्कारिक वाटूं लागलं होतं हें त्यांच्या पाहण्यावरून तिच्या लक्षांत आलं होतं. चित्रपट पहाण्याची यत्किंचितही इच्छा तिला उरली नव्हती. तिचं अंतःकरण निराशेनं अगदीं जड झालें होतं. गत्यंतरंच नव्हतं

( पान १०२ वर पहा )

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



-: कवि :-

बा. भ. बोरकर

## साद !

एकच माझा साद, ऐक प्रभु, एकच माझा साद
पचूं न देई मला कधींही इवलासाहि प्रमाद !
स्वार्थें माझे मिटतां लोचन
घाल त्यांत अविलंबें अंजन
मोहिं गुंततां जरा कुठें मन मागें लाव प्रवाद !
परदुःखावर शिजलें जें सुख
विटाळलें जरि तेणें हें मुख
या हृदयांतुनि त्या दुःखाचे उठवीं शत पडसाद !
ठेंच अचानक लाव पदांला
खोक पडूं दे अभिमानाला
पांज[1] यशाची चढतां मजला चढला जरि उन्माद !
कलेंतुनी घसरतां विलासीं
अथवा स्वातंत्र्यांतुनि दास्यीं
आग लावुनी आत्मसुखाला धुमसत ठेव विषाद !
निष्ठा जरि मम दुबळी झाली
खचवीं भू झणिं चरणांखालीं
विकल करीं वरवंचित प्राणा कोंडुनि अंतर्नाद !
विश्वनाट्यविकसनीं तुझ्या या
रंगत मजला हवें फुलाया
दयामया ! कविपति ! निजनियमा न करी मज अपवाद !
पापासरशीं देउनि शापा
सन्मार्गीं मज लावी बापा !
जाणतसें, मी तुझ्या घरीं प्रभु ! शासन हाहि प्रसाद !

१ पांज= दगडी, पायऱ्यांचा डोंगरचढणीचा जिना


आपल्या
ग्रंथ कोशाचें वैभव

झुलता मनोरा
[ कादंबरी ]
ले. श्री. भा. वि. वरेरकर

★

वैष्णव
[ कादंबरी ]
ले. वि. वा. शिरवाडकर (कुसुमाग्रज)

★

मी तुझाच आहे
[ कादंबरी ]
ले. वासुदेव पोवळे

★



धरित्री प्रकाशन
काँग्रेस हाऊस समोर,
विठ्ठलभाई पटेल रोड, गिरगांव, मुंबई.


अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# "दिवाळींतील स्वरपुष्पें"

**शाहीर पां. द. खाडीलकर**

एम्. ए. बी. टी.

N 15277 { दिवाळीचा फराळ आणि
भाऊबीज भाग १–२

N 15273 { गांधी विलायतेस जातात
हिंसा आणि अहिंसा

N 15270 { ने ता जी सु भा ष
जय हिन्द हिन्द बोला

**संत तुकडोजी महाराज**

N 15278 { अवताराचे कार्य कराया
हि न्द भू च्या ले क रा

N 26812 { बजादे बजादे तेरी बन्सी
मुझे प्यारा भारत मेरा

**वासंती**

N 15047 { अ हा दि वा ळी
भाऊबीज

या खेरीज दुसऱ्या रेकॉर्ड करितां
दिवाळीचा खास कॅटलॉग पहा.

**कुमारी विमल पत्की**

N 15266 { धांव सख्या यदुराया
दारीं उभा ब्रीजलाल

N 26705 { सुमीर होनाम–जीवनपुरी
रंगरसिया करत-मालकौंस

**मा. वाटवे**

N 15183 { शेजारी भाग १
,, ,, २

**मा. मनहर बर्वे**

N 26811 { गुंद गुंद लावोरी–देशी
बित गये दिन–भैरवी

**शान्ता आपटे**

N 26810 { झगमग छाई दिवाली
बोली मधुर बन्सी

N 26646 { मोरे आंगनमें चंदा
मैं तो ना बोलुं रे



**हिज मास्टर्स व्हॉइस**

डमडम, मुंबई, मद्रास, दिल्ली, लाहोर


अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# AT LAST!

## MICRON XI.

THE WORLD'S LARGEST SOUND PROJECTOR

FROM

EUROPE'S LARGEST PROJECTOR FACTORY

EMPLOYING

2000 Artisans – 1000 Machine Tools – 200 Technicians – And Three Plants.

THE MOST MODERN POSTWAR SOUND PROJECTOR.

IT'S AN




LINE!

The Latest and most up-to-date Soundheads, Arc-lamps, Rectifiers for arclamps, and LANSING Multi-cellular horn Large Theatre Speaker Systems Acknowledged the world's Best, and Amplifiers incorporating the very latest improvements like Noise Supression, Cathode Follower, & other new developments in Electronics.

**EVERY THING LATEST**

**INTERNATIONAL TALKIE EQUIPMENT CO. LTD.,**

17, NEW QUEEN'S ROAD,
BOMBAY.

Telephone : 20892 Tele : SOUNDHEAD

: *Branches* :

18, Mount Road,
MADRAS, 2.

117, New Cavendish St.,
LONDON, W. 1.

20, Pine Street,
NEW YORK, 5, N.Y.


अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

—आचार्य विनोबा भावे—

# आजची आवश्यकता

**● ● वीर पुरुषांची वीरता आणि सन्त पुरुषांची निर्मळता हीं दोन्हीं मिळून सत्याग्रह बनला आहे. आणि मी जसजसा विचार करतों तसतसें मला वाटूं लागतें कीं—**

प्रत्येक कालांत जी शक्ति अन्तर्हित असते ती प्रकट करण्यास त्या काळचे महापुरुष केवळ निमित्तमात्र असतात. म्हणजे असें कीं त्यांचें कार्य कालप्रेरित असतें. दह्यापासून लोणी निघते तें दह्यांतच गुप्त रूपानें वास करीत असते व मन्थन केल्यानें बाहेर येतें. याच प्रमाणें त्या त्या काळांत जो कांहीं शक्ति असते ती महापुरुषांच्या जीवनाच्या द्वारें मुखरित होते. ज्याच्यांतून ही शक्ति उत्पन्न होते तो कालात्मा होय. कार्ल मार्क्सनें याचें एक शास्त्रच बनविलें आहे. बापूजींच्या स्थूल जीवनाचा विचार मी सोडून देतों; कारण माझा असा विश्वास आहे कीं हिन्दुस्थानला आज ज्या गोष्टीची आवश्यकता होती तिचें व्यक्त स्वरूप कोणत्या ना कोणत्या रूपांत प्रकट होणारच होतें. तें कित्येक विशेष पुरुषांच्या रूपानें प्रकट झालें. रवीन्द्रनाथ ठाकुरांनीं गायिलें आहे कीं ‘संचार करो सकल कर्मे शांत तोमार छंद !’ आमच्या सर्व कर्मांत, सर्व कार्यांत भगवंताचा शांत छंद, शांत राग, अनुराग प्रकट झाला पाहिजे. याचा अर्थ असा कीं परमेश्वराची भक्ति कर्मांच्या रूपानें, मानवसत्तेच्या रूपानें आणि भूतमात्रांच्या सेवेच्या रूपानें प्रगट झाली पाहिजे. ही एका कवीची वाणी आहे. लोकमान्य टिळकांनीं आपल्या पद्धतीनें हीच गोष्ट सांगितली. ती त्यांच्या जीवनांतहि होती आणि तात्त्विक दृष्टिनें त्यांनीं तिचें विवेचनही केलें आहे. स्वामी विवेकानंदांनींहि आग्रहानें हेंच प्रतिपादिलें आहे कीं या जगांत सर्वोत्तम वेदान्त दरिद्रनारायणाची सेवा हाच आहे. ‘दरिद्रनारायण’ हा शब्द त्यांचाच आहे. स्वामी दयानन्द सरस्वती यांनींहि हीच गोष्ट स्पष्ट केली; आणि वेदांचा उपयोग करून त्यांनीं हें दाखवून दिलें कीं आपल्या राष्ट्रावर अकर्मण्यता पसरलेली आहे; आणि ती दूर करणें आपलें कर्तव्य आहे. ‘अकर्मण्यता’ हा शब्द स्वामी दयानंदांचा आहे आणि त्यांनीं तो वेदामधून घेतला आहे. रानड्यांनीं देखील हीच गोष्ट आपल्या पद्धतीनें सांगितली कीं समाजसेवा, राजकारण, धर्म, इतिहास वगैरे जीवनाचीं पृथक्‌ पृथक्‌ अंगें आहेत; जीवन एक आहे आणि तें प्रत्यक्ष कृतीनेंच अनुभूत केलें पाहिजे. गांधीजींच्या जीवनांत आपल्याला हीच गोष्ट आढळते. सारांश, आजच्या युगांत भारतांतील प्रत्येक महापुरुषाला हेंच सुचतें. येथें मी भिन्न भिन्न प्रकृतीच्या लोकांचीं नांवें सांगितलीं. कुठें रवीन्द्रनाथ आणि कुठें टिळक महाराज! कुठें दयानन्द आणि कुठें रानडे! पण या सर्वांना हीच गोष्ट सुचली. याचा अर्थ इतकाच कीं आजच्या काळाला ज्या वस्तूची आवश्यकता होती तिचाच उच्चार कालात्मा करीत आहे. बापूजींच्या जीवनांत हिंदुस्थानांतील विभिन्न विचारांचें सम्मेलन झालें आहे. हिन्दुस्थान अत्यंत प्राचीन देश आहे. भगवद्‌गीतेच्या जन्माला चार हजाराहून अधिक वर्षें झालीं. आणि वेद तर गीतेच्याहि आधीं प्रकट झाले होते. सांख्यांचें सृष्टिशास्त्र कपिलानें तयार केलें. चित्त-वृत्तीच्या निरोधानें योगहि होता. आत्म्याचें, अद्वैतानें ज्ञान देणारीं उपनिषदेंहि निर्माण झालीं होतीं. ईश्वराच्या उपासनेचाहि एक भागवत धर्म होता. कर्ममीमांसेचाहि संप्रदाय होता. इतके सगळे विचार गीतेच्या आधींहि अस्तित्वांत होते. गीतेनें त्या सर्वांना उपयोग—समन्वय—केला आणि सर्वांना उचित स्थान दिलें. इतकेंच नव्हे तर त्यांचें एक स्वच्छ, शुद्ध, रमणीय शास्त्र बनविलें. इथीं आपल्याला जो विचार सुचत आहे तो आपल्याला गीतेंत आढळतो; आणि तो अशा अक्षरांत, अशा शब्दांत मिळतो कीं त्याहून अधिक स्पष्ट, सुंदर स्वरूपांत अन्यत्र कोठेंहि तो सांपडत नाहीं. आणि आपणहि तो आहे त्याहून अधिक सुन्दर स्वरूपांत व्यक्त करूं शकत नाहीं.

गीतेच्या बाबतींत माझा हा पक्षपातहि असूं शकेल. कारण लहानपणापासून मी ज्या ज्या विषयांवर सूक्ष्म अभ्यास केला आहे त्यांपैकीं गीतेनें मला जसें घट्ट धरून ठेवलें आहे, गीतेशीं-गीतेंतील विचारांशीं व शब्दांशीं—माझा ज्या प्रकारचा संबंध आला आहे तसा दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथाशीं आलेला नाहीं. ग्रंथाशींच नव्हे तर कोठल्याहि माणसाशीं देखील तशा प्रकारचा सम्बन्ध जडलेला नाहीं. तेव्हां मला हें कबूल केलें पाहिजे कीं गीतेच्या बाबतींत मी तटस्थ राहूं शकत नाहीं. प्रथम मी तटस्थ होतों. परंतु आतां तो तटस्थपणा राहिलेला नाहीं. आतां मी निष्पक्ष आहे असें म्हणू शकत नाहीं. जेव्हां मी काशीस होतो तेव्हां मजवर कित्येक विकाराचे आक्रमण होत असे, झोप येत नसे म्हणून मी उशाला गीतेचें पुस्तक घेऊन झोपूं लागलों. त्यानंतर मला अनुभव आला (अर्थात् श्रद्धेमुळें) कीं माझे विकार शमले आहेत; आणि मला झोप येऊं लागली. हा अनुभव एवढ्यासाठींच सांगितला कीं मी गीतेच्या बाबतींत निष्पक्ष राहूं शकत नाहीं.





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

गीतेनें प्रत्येक युगांत त्या त्या वेळच्या महापुरुषांना स्फूर्ति दिली आहे. गीतेचे भाष्यकार अनेक होऊन गेले. परंतु जे भाष्यकार आपापल्या काळचे महापुरुष होते व ज्यांनीं पांडित्य-प्रदर्शन न करतां स्वानुभवाचे बोल लिहिले त्यांचींच भाष्यें अजूनपर्यंत टिकलीं आहेत.

शंकराचार्यांनाहि गीतेकडून स्फूर्ति मिळाली. त्यांनीं गीतेवर भाष्य लिहिलें. ते आपल्या स्वतःविषयीं नेहमीं बहुवचनाचाच प्रयोग करीत असत-स्वतःला उद्देशून ते आम्ही शब्द वापरीत. 'मी' शब्दाचा प्रयोग त्यांनीं कधीं केला नाहीं. सिंहासारखी गर्जना त्यांची! परंतु तेहि जेव्हां गीतेविषयीं लिहायला बसले तेव्हां त्यांनीं लिहिले 'अतः तद् विवरणे यत्नः क्रियते मया!' एकवचन आणि त्यांतहि पुनः नमतासूचक कर्मणि प्रयोग यांची त्यांनीं कास धरली. किती नम्र भावनेनें लिहिलें आहे!

यानंतर आपल्याला असें दिसून येते कीं रामानुज, ज्ञानदेव वगैरे जुन्या भगवद्भक्तांना आणि आजच्या जमान्यांतील देवेंद्रनाथ, अरविंद, टिळक, गांधी वगैरे कित्येक महापुरुषांना गीतेपासुन स्फूर्ति मिळाली आहे. म्हणजे आपल्या जीवनांत जे विविध विचार आहेत त्या सर्वांचा मेळ गीतेंत बसलेला आहे.

हिंदुस्तानांत आपल्याला असें दिसून येतें कीं प्राचीन काळीं एकीकडे संतांची परम्परा होती आणि दुसरीकडे वीर पुरुषांची. गीतेमध्यें दोन्ही विचार एकत्र आले आहेत. गांधीजींच्या तत्त्वज्ञानांत हे दोन्ही प्रवाह एकरूप झाले आहेत. वीर पुरुषांची वीरता आणि सन्त पुरुषांची निर्मळता हीं दोन्ही मिळून सत्याग्रह बनला आहे. आणि मी जसजसा विचार करतों तसतसें मला वाटूं लागतें कीं सत्याग्रह हें एक सम्पूर्ण दर्शन आहे. अपूर्णता असेल तर तो आपल्यांत आहे. त्या विचारांत अपूर्णता नाहीं. लोकांनीं तलवारीचे पुष्कळ प्रयोग केले. पण त्यांचा निकाल असा लागलाच नाहीं. जेव्हां तलवारीहून महान् अशी शक्ति निर्माण होईल तेव्हांच तलवारीचा त्याग करण्याचा प्रयोग होऊं शकेल; कारण तलवारींत शक्ति, संघटना, त्याग, सामुदायिक सहकार्य, शौर्य वगैरे 'दैवी सम्पत्ति' चे हि गुण आहेत. या गुणांबरोबरच तिच्यांत दुष्टता, अन्याय, पारतंत्र्याचीं मुळें, असत्य, असन्तोष, बुद्धिहीनता वगैरे दोषहि आहेत. तेव्हां हे दोष नाहींसे करून तिच्यांतील गुणग्रहण करण्याचा मार्ग आपल्या जवळ असला पाहिजे. एकीकडून असा प्रयोग झाला कीं 'आम्हाला तलवारीचे गुणहि नको, आणि दोषहि नकोत. तिचा आम्ही त्यागच करतों.' यामुळें निवृत्तीची उपासना करणारे महापुरुष निर्माण झाले. हे लोक अरण्यांत गेले, त्यांनीं आपलीं शरीरें सुकविलीं आणि नानाप्रकारचे कष्ट सहन केले. त्यांचा आम्हाला अभिमान आहे. कारण त्यांच्याच मुळें आमची संस्कृति निर्माण झाली. त्यांनीं तलवारीचे गुण-आणि दोष दोन्हींचा त्याग केला. संन्यासाचा उत्तम आदर्श स्वीकारला आणि तो आदर्श-जगापुढें रुजूं केला. पण जगांत त्याचें अनुकरण करणें अशक्य ठरलें. त्याचा आदर खूप झाला पण उपयोग मात्र झाला नाहीं. इकडे तलवार आपल्या गुणदोषांतहि काम करीत राहिली. कांहीं वीर पुरुषांनीं तिचा उपयोग सत्य, धर्म आणि न्याय यांचें रक्षण करण्यासाठीं केला. तलवारीशीं तलवार लढली. पण निर्णय मात्र लागला नाहीं. याचा परिणाम असा झाला कीं सत्य वगैरे तत्त्वांचें पालन अशक्य होऊन बसलें-अर्थात् कांहीं बाबी वगळून! ज्या मार्गानें आणि ज्या पद्धतीनें विजय मिळविणें शक्य वाटलें, त्या मार्गानें आणि त्या पद्धतीनें विजय मिळविण्याचा प्रयत्न केला गेला. मनांत विश्वास असे कीं कांहीं झालें तरी सत्य आपल्याच बाजूस आहे. अशा प्रकारें सत्यासाठीं असत्याचा, अहिंसेसाठीं हिंसेचा, न्यायासाठीं अन्यायाचा, रक्षणासाठीं संहाराचा आणि स्वातंत्र्यासाठीं जबरदस्तीचा उपयोग करण्यांत करण्यांत आला. आपण मनांत समजूं लागलों कीं भावना मुळांत चांगली आहे. आणि मग लोकांनीहि क्षमा केली. इतिहासकारांनीहि गुणगान केलं. परंतु ज्या वस्तूच्या प्राप्तीसाठीं हें सर्व केलें गेलें ती वस्तु हातीं आली नाहीं. साध्य मिळालें नाहीं. तलवार आणि निवृत्ति यांचे हे दोन्ही प्रयोग महान् होते. एका प्रयोगांतून असें निष्पन्न झालें कीं हिंसेच्या चक्रांत बुद्धीचा अभाव आहे, आणि त्याचा निर्णय किंवा निकाल असा लागतच नाहीं. एका तत्त्वाचें तात्त्विक रक्षण केलें एवढेंच.

दुसऱ्या प्रयोगामुळें असा लाभ झाला कीं समाजांत प्रतिकाराची भावना आणि भक्ति कायम राहिली. समाजाला प्रतीकार शक्तीची आवश्यकता असते. जर आपण ती घालवून बसलों तर समाज निर्जीव होईल. म्हणून प्रतीकार शक्ति नेहमीं जागृत राहिली पाहिजे.

अशा प्रकारें दोन प्रयोगांतून दोन गोष्टी मिळाल्या तरीहि मार्ग सांपडलाच नाहीं. पण हा त्यांचा दोष नव्हे.

आज एकीकडे आंतरराष्ट्रीय प्रमाणावर शस्त्रांचे आयोजन केलें जात आहे तर दुसरीकडे निःशस्त्रीकरणाचे प्रयोग होत आहेत. आतां प्रतीकारासाठीं एखाद्या स्वतंत्र प्रयोगाची आवश्यकता भासूं लागली आहे. गांधीजींच्या जीवनांतून आपल्याला या नव्या रूपाचें दर्शन झालें. आपली संस्कृति आणि परंपराहि अशा प्रयोगासाठीं अनुकूल आहे. येथें पूर्वींहि अहिंसेचे पुष्कळसे लहानमोठे प्रयोग झाले. उदाहरणार्थ; मांसाहार सोडण्याचा प्रयत्न, शस्त्रास्त्रांचा उपयोग क्षत्रियवर्गापुरताच मर्यादित ठेवणें वगैरे. क्षत्रिय वर्गालाहि अहिंसेच्या नियंत्रणाखालीं ठेवण्याचा प्रयत्न केला गेला. 'वर्णानाम् ब्राह्मणो गुरुः' असें म्हणून शिक्षणशास्त्रावर सरकारची नव्हे तर ज्ञानाची सत्ता असली पाहिजे हें दाखवून दिलें. क्षत्रियांना ब्राह्मणांची आज्ञा मानावी लागत असे. स्त्रियांना शस्त्रग्रहण करण्याची मनाई असे.

अशा प्रकारें जेथें पूर्वींहि अहिंसेचे प्रयोग झाले आहेत अशी ती हीच भूमि आहे. या भूमीवर सर्वोत्तम साहित्य पडलेलें आहे. 'या साहित्यापैकीं सर्वोत्तम ग्रंथ कोणता?' असें जर मला कोणी विचारील तर मी गीतेचे नांव घेईन. रामायणासारखे काव्यग्रंथ आणि कालीदासासारखे महाकवि या भूमींतून निर्माण झाले आहेत. हिन्दुस्तानची




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

सगळी निसर्गसम्पत्ति अेकीकडे आणि त्याचें सारस्वत-त्याची विचारसम्पत्ति दुसरीकडे ठेवून जर वजन केलें तर कोणत्या सम्पत्तीचें पारडें भारी होअील हें सांगणे कठीण आहे. आपली विचारसम्पत्ति कांहीं कमी नाहीं, असली तर जास्तच असेल. परन्तु अितक्या विशाल साहित्यांत सर्वांत अधिक प्रतिनिधिक अशी गीताच आहे.

गीता हें एक रसायन आहे; सर्व रसांचा समन्वय आहे. निवृत्ति आणि प्रवृत्ति, ज्ञान आणि कर्म अित्यादि विरोधी प्रवृत्तींचा सुन्दर समन्वय गीतेनें घालून दाखविला आहे. अशाच प्रकारें ' सत्याग्रहांत ' हि विरांच्या आणि सन्तांच्या वृत्तींचा समन्वय आहे. येथें ( तुरुंगांत ) आपण मनानें, वाणीनें आणि शरीरानें त्याचा अभ्यास केला पाहिजे. अहिंसेच्या शास्त्रांत कर्मसंन्यास, कर्मयोग वगैरे सर्व कांहीं आहे. आपण त्याचें चिन्तन केलें पाहिजे. येथें अनेक व्यक्ति आहेत. पुस्तकांत काय आहे ? अहिंसा ही एक नवीन वस्तु आहे. ती आपणाला सामाजिक रीत्या अंमलांत आणावयाची आहे, एक नवीन प्रयोग करावयाचा आहे. सतत चिन्तनाच्या द्वारें आपल्याला तिचा अविष्कार करावा लागेल. मध्यंतरींच्या काळात ज्ञानाची चर्चा करणारे जे सन्त पुरुष आणि भक्त होऊन गेले त्यांच्यापेक्षां आपल्या समोर जास्त महत्त्वाचें काम आहे. परन्तु त्यांत आपली विशेषता नाहीं. तें काळाचे वैशिष्ट्य आहे. त्या प्राचीन पुरुषांनीं आपल्या पद्धतीनें प्रयोग केले. आतां प्रयोग करण्याची पाळी आपली आहे. त्याकरितां आपण जय्यत तयार राहिलें पाहिजे. या कामासाठीं परिपूर्ण चित्तशुद्धीची आवश्यकता आहे. मी तर असेंहि म्हणेन कीं जुन्या लोकांना चित्तशुद्धीची जितकी आवश्यकता होती त्याहूनहि अधिक आवश्यकता आम्हाला आहे; कारण त्यांचे प्रयोग वैयक्तिक होते, आपला प्रयोग सामाजिक आहे. परन्तु मित्रांना हें पटत नाहीं. ते विचारतात, ' चित्तशुद्धीची काय जरूर ? ' पण माझी अशी खात्री आहे कीं चित्तशुद्धीची जास्तींत जास्त जरूर आहे. सन्तांचा प्रयोग त्यांच्या व्यक्तित्वापर्यंतच मर्यादित होता. पण आपण अेक व्यापक प्रयोग करूं अिच्छित आहोंत. हिमालया-सारखा अेक महान् पर्वत उभा करणें आणि सगळ्या पृथ्वीचा थर दोन फूट जास्त ऊंच करणें या दोन कामांत जास्त मातीची आवश्यकता कोठें आहे ? पृथ्वीची ऊंची दोन फुटांनी वाढविणें ही कांहीं सामान्य गोष्ट नाहीं. संत हिमालयपर्वताप्रमाणें वैयक्तिकरीत्या महान् झाले पण आपल्याला समाजाला वर उठवावयाचें आहे. आणिः म्हणूनच चित्त-शुद्धीची आवश्यकता आहे.

* नागपूरच्या तुरुंगांत असतांना श्रीविनोबांनीं दिलेलें अेक प्रवचन.

पैसा आपलें आत्म-
चरित्र लिहूं लागला तर
?
दिवाळीच्या मंगलमय दिवसांत
हर्षभरानें जाहीर करीत आहोंत




दिग्दर्शक : कुमारसेन समर्थ
कथा–संवाद : पंडीत फणी
–: भूमिका :–
वीना पाल, कृष्णकांत, वसंत ठेंगडी,
विमल वैसास, बेबी शकुंतला
नवयुग स्टुडिओ [ पुणें ]
येथें तयार होत आहे.
–: प्रकाशक :–
जयहिंद फिल्म एक्स्चेंज
११६ लॅमिंग्टन रोड : मुंबई ४.

: लेखक :

साने गुरुजी




त्या दिवशीं सायंकाळीं हेमा फिरायला गेली नव्हती. आणि रंगरावहि एकदम घरींच आले. हेमाला घरीं पाहून त्यांना आश्चर्य वाटलें.

" हेमा, आज फिरायला नाहीं गेलीस ? " त्यांनीं विचारलें.

" कंटाळा आला होता आणि आज मला आईची आठवण येत होती. बाबांचीही.आठवण.आली. "

" तुझे बाबा तुझ्यावर प्रेम करीत का ? "

" हो मला जवळ घ्यायचे,माझ्यासाठीं फुलें आणायचे."

" हेमा, मी का तुझ्यावर प्रेम करीत नाहीं ? "

" तुम्हीहि करतां. तुम्हीं आधार दिलात म्हणून तर मी सुखी आहे. नाहीं तर ही पोरकी हेमा एकटी या जगांत काय करती ? "

"हेमा तुझी आई तुझ्याजवळ कांहीं बोलली होती का?"

" कशाचे बाबतींत ? "

" माझ्या विषयीं तिनें कांहीं सांगितलें होतें ? "

" पुष्कळ वर्षांपूर्वी तिचा नि तुमचा लग्नाचा संबंध होता. होय ना ? "

" आणखी कांहीं तिनें सांगितलें होतें का ?"

" आणखी तसें कांहीं विशेष तिनें नव्हतें सांगितलें. "

" हेमा, मी तुला आज कांहीं सांगणार आहे. "

" सांगा "

" हेमा, तूं माझी मुलगी आहेस, माझी आहेस." असें म्हणून त्यानें तिला जवळ घेतलें. क्षणभर कोणी कांहीं बोललें नाहीं.

" हेमा, तूं माझी मुलगी. तूं त्या जयंताची नाहींस तूं माझें आडनांव तुझ्या नांवाशीं लावीत जा. तूं माझी असून, माझी नव्हतीस. आता हे सारे पडदे जाऊं देत." असें म्हणून त्यानें तिला पहिल्यापासूनची-सारी हकीगत सांगितली. ती ऐकत होती. मधून तिचे डोळे भरून येत होते.

" हेमा होशील ना तू माझी ? मला या जगांत कोण आहे ? किती तरी वर्षें मी एकट्यानें काढालीं. दारूला मी स्पर्श केला नाहीं. लाखों रुपये मिळविले. मानसन्मान मिळविला. परन्तु हृदयांत आनंद नव्हता. माझें जीवन एकाकी होतें आणि इतक्यां वर्षांनंतर माया माझ्या जीवनांत आली. पण तीहि फार दिवस राहिली नाहीं. ती देवाकडे गेली. जणु तुझ्यासाठींच ती माझ्याकडे आली. आतां तूं नि मी राहिलों. हेमा, खऱ्या नात्यानें आपण आतां राहूं. तूं






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

माझी मुलगी. घेशील ना माझें नांव ? ' हेमा जयंत हारित ' असें नांव आतां नको लावूंस. आतां ' हेमा रंगराव सुनीत ' असें नांव लाव. येईल ना बाळ. "

" भाऊ, मला विचार करूं दे. मी का जयंतांना त्या माझ्या पूर्वीच्या बाबांना एकदम विसरूं ? तुम्ही माझे जन्मदाते, परंतु त्यांनीं मला लहानाचें मोठें केलें. मला होडींतून न्यायचे. लाटांवर आमची नाव नाचे. बाबा गाणीं म्हणत. समुद्रकाठच्या सुंदर शिंपा, कवड्या माझ्यासाठीं आणीत. माझ्या जीवनांत ते आहेत. त्यांना का माझ्या जीवनांतून काढून टाकूं ? मला विचार करूं दे. इतकीं वर्षें ज्यांना मी माझे जन्मदाते समजत आले, त्यांना एकदम कशी विसरूं ? आणि तुमचेंहि म्हणणें बरोबर आहे. मी तुमची असून दुसऱ्याच्या नांवानें वावरावें यानें तुमच्या पितृहृदयासहि वेदना होत असतील. भाऊ, मी काय करूं ? "

" तूं मला भाऊ नको म्हणत जाऊंस. "

" मग काय म्हणूं ? "

" मला बाबा म्हण. मी तुझा पिता आहे. तूं माझी मुलगी हें सुख, हा आनंद मला अनुभवूं दे. "

" मी विचार करीन बाबा. आजची रात्र जाऊं दे. मी सकाळीं काय तें सांगेन. "

हेमाच्या डोक्यावरून हात फिरवून रंगराव निघून गेले. ते बाहेर गेले. बराच वेळ झाला तरी ते घरीं आले नाहींत. हेमा एकटीच जेवली. ती आपल्या खोलींत गेली नि अंथरुणावर पडली. तिला झोप येईना ती वरतीं गच्चींत गेली. आकाशांतील ताऱ्याकडे ती बघत होती. तो तारा का माझ्या आईचा ? तो का माझ्या बाबांचा ? परन्तु माझे खरे बाबा कोण ? ते जयन्त ते माझे खरे बाबा नव्हत. परन्तु त्यांनीं किती प्रेमानें मला वाढविलें उद्यां रंगरावांना मी काय सांगूं ? तेहि माझ्यावर किती प्रेम करतात ? ज्या दिवशीं मी त्यांना प्रथम ती आईची चिठी आणून दिली, त्यादिवशीं त्यांचे डोळे मला पाहून भरून आले होते. त्यांनीं मला द्राक्षे दिलीं, त्यांनीं मला बाळ म्हटलें, बेटी म्हटलें, मलाहि त्यांना उद्यांपासून बाबा म्हणूं दे. त्यांचें पितृहृदय सुखी होऊं दे. ती खालीं गेली. उशीवर डोकें ठेऊन पडली. तिला झोप लागली.

रंगराव उशीरां घरीं आले. ते आज जेवले नाहींत. हेमाच्या खोलींत त्यांनीं डोकावून पाहिलें. नंतर ते आपल्या खोलींत गेले. तेहि अंथरुणावर पडले. त्यांच्या मनांत किती तरी विचार येत होते. उद्यां हेमा काय सांगेल, उद्यांपासून ती हक्कानें माझी होईल का, का ती नाहीं म्हणेल ? नाना कल्पना, शंका, आशा, निराशा मनांत उसळत होत्या. एकाएकीं त्यांना एक आठवण आली. कशाची बरें ? मायानें मरायच्या आधीं एक पत्र त्यांच्याजवळ दिलें होतें.




# ही दिवाळी

आमच्या
सर्व ग्राहकांस
सर्व हितचिंतकांस
सर्व व्यापाऱ्यांस

पूर्ण

सुखाची जावो

## किर्लोस्कर बंधु लिमिटेड

किर्लोस्कर वाडी.





अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

हेमाच्या लग्नानंतर हें फोडा नि वाचा असें तिनें सांगितलें होतें. काय बरें असेल त्या पत्रांत ? आज फाडले म्हणून काय झालें ? कदाचित् जी गोष्ट आज मी हेमाला सांगितली, तीच त्यांत हेमासाठीं म्हणून असेल तो उठला. हातांत कंदील घेऊन वरती गेला. तेथील एका पेटींत तें पत्र होतें. त्यानें तें पत्र बाहेर काढलें. फोडूं कीं न फोडूं ? मृताची इच्छा भंगणें पाप आहे. परन्तु फोडलें म्हणून काय झालें ? शेवटीं त्यानें तें पत्र फोडून वाचलें. त्याची चर्या गंभीर झाली. पांढरी फटफटीत झाली. तें पत्र त्यांच्या हातांतून गळलें. त्याच्या मुद्रेवर निराशा, तिरस्कार, दुःख किती तरी भावना प्रतिबिंबित होत होत्या. काय होतें त्या पत्रांत ?

" प्रिय रंगा,

एक गोष्ट तुझ्या पासून मी लपवून ठेवली होती सर्वांच्या हितासाठीं म्हणूनच ती मी लपविली. तूं मला क्षमा कर. रागावूं नकोस. मी लिहूं तरी कसें ? परंतु लिहिलें पाहिजे. आतां हेमाचें लग्न लागलें असेल. नवीन घर तिला मिळालें असेल. तूं तिचें सारें चांगलें केले असशील. परंतु रंगा, हेमा तुझी मुलगी नव्हे. तुझी मुलगी लहानपणींच तिकडे परदेशांत देवाघरीं गेली. आणि ती हेमा, जयंताची ही मुलगी. मी पहिल्या मुलीचेंच तिला नांव ठेवलें. या मुलीचें सारें नीट व्हावें म्हणून ही गोष्ट तुझ्यापासून मी लपविली. तूं मातेचें हृदय ओळख नि मला क्षमा कर. हेमावर पूर्वीप्रमाणेंच प्रेम कर, लोभ कर. तूं माझ्या बाबतींत एके काळीं अन्याय केलास. तो मी विसरलें. मी तुला क्षमा केली. आतां तूं मला कर. मरणोन्मुख मायेची ही इच्छा आहे.

तुझी माया

असें तें पत्र होतें. रंगरावानें तें पत्र कुसकरलें. त्याला काय करावें समजेना. मायाचा त्याला संताप आला. परंतु ती या जगांत नव्हती. परंतु मायाचा काय अपराध ? तो पुन्हां जरा शांत झाला. एकूण हेमा माझी नाहीं. ती मला माझी कां बरें वाटली ? तो तिचा चेहरा डोळ्यांसमोर आणूं लागला. हेमा निमगोरी आहे. मी काळसावळा आहे. माझ्या लक्षांत हें मागेंच आलें पाहिजे होतें. तो उठला. हातांत कंदील घेऊन तो हेमाच्या खोलींत हळूच गेला. ती मुलगी शांतपणें झोपली होती. तिच्या तोंडावर कंदिलाचा मंद प्रकाश पडला. तिची मुद्रा तो बघत होता. नाहीं, हेमा माझी नाहीं, ही त्याचीच आहे. आणि हिला मी माझी म्हणून समजत आलों. आणि माझें नांव लाव म्हणून तिला सांगितलें. शेवटीं मला कोणी नाहीं मी दुर्दैवी आहे. तो उठला. त्यानें कंदील खालीं ठेवला. तो घरांतून बाहेर पडला. अंधारांतून कोठेतरी जात होता. नदीच्या तीराकडे गेला. वेगवती वेगानें वहात होती. सारा सारंग गाव झोपला होता. परन्तु नदी वहात होती. माझें जीवनहि असेंच वहात राहणार. सारीं माझीं माणसें माझ्या जवळून जातील. वरी मी एकटा जिवंत राहणार. माया आली नि कायमची गेली. हेमा कालपर्यंत आतांपर्यंत माझी वाटत होती. तीहि दूर गेली. सारी सृष्टि जणुं माझ्या विरुद्ध कट रचीत आहे, मला एकटें पाडीत आहे. नदीवरच्या पुलावर रंगराव जरा बसले. क्षणभर स्वतःचें जीवन संपवावें असें त्यांना वाटलें. परंतु क्षणभरच. पुन्हां ते उठले नि घरीं आले. तळमळत ते अंथरुणावर पडले. पहांटे त्यांचा जरा डोळा लागला.

●

आतां उजाडलें. हेमा उठली. ती हंसत होती. सुखी होती. तिनें केसांत दोन फुलें घातली होतीं. बाबा कधीं उठतील याची ती वाट पहात होती. ती त्यांच्या खोलींत गेली. त्यांची मुद्रा तिला त्रस्त दिसली. काळवंडलेली दिसली. हेमा तेथें उभी होती. थोड्या वेळानें ती हळूच निघून गेली.

रंगराव उठले. प्रातर्विधी आटोपून ते आले.

" बाबा, आजपासून मी खरोखरच तुमची होणार आहे. तुमचें नांव मी लावणार आहे. ते जयन्त बाबा, त्यांनींहि माझ्यावर किती प्रेम केलें ! तें प्रेम मी हृदयांत ठेवीन. त्यांचें नांव माझ्या हृदयांत अमरच आहे. परन्तु आतां तुम्ही खरेखुरे बाबा भेटलेत. मी तुमची मुलगी. आतां मात्र पोरकें वाटणार नाहीं. तुमच्या प्रेमामुळें वाटत नव्हतेंच. परंतु आतां तुमच्या प्रेमावर माझा हक्क आहे, वारसा हक्क. खरें ना बाबा !" हेमा प्रेमानें रंगरावजवळ बसून म्हणाली. त्यांनीं तिला जवळ घेतले. वात्सल्यानें त्यांनीं तिचा मुका घेतला. त्यांच्या डोळ्यांतून दोन अश्रु आले. तिच्या डोक्यावर त्यांनीं हात ठेवला.

" हेमा, तूं माझी. माझीच आहेस !" ते म्हणाले.

परंतु त्या शब्दांत आनंद होता कीं दुःख ? निराशा होती कीं आशा ?

---





# अजानवृक्षाच्या सावलींत –

: लेखक :

श्रीपाद महादेव माटे, एम. ए.

इंद्रायणीच्या तिरींची पंचक्रोशी नानाप्रकारच्या स्मृतींनी समृद्ध बनलेली आहे. ज्ञानेश्वरानें जेव्हां या नदीच्या कांठीं समाधी घेतली तेव्हां नामदेवाचा जीव अगदीं गलबलून गेला. या उदात्त प्रसंगीं महाराष्ट्रांतील सर्व पारमार्थिक लोकशाही इंद्रायणीच्या कांठीं जमा झालेली होती. तेथें नामा शिंपी होता; सांवतामाळी होता; सेना न्हावी होता; गोरा कुंभार होता; स्त्रीत्वाच्या आणि दासीपणाच्या दुहेरी जाणिवेनें खिन्न झालेली जनाबाई होती. पंढरपुरच्या विठ्ठलाची मूर्ति प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलेला चोखोबाही होता. जातोजात जे सारे संत संभवलेले होते ते येथें जमा झालेले होते. परंतु, या संतांना इंद्रायणीच्या तीराचा महिमा पटविण्यासाठीं नामदेवानें सांगितलें कीं ही पंचक्रोशी पुरातन आहे. हिचें पुरातनत्व फक्त चतुराननालाच माहित असलें पाहिजे. या ठिकाणींच एक कोटी यज्ञ झालेले होते; या ठिकाणींच ऋषीमुनींनी युगानुयुग तप केलेलें होतें; या ठिकाणींच त्रिवेणी गुप्त आहे. या ठिकाणचा महिमा असा आहे कीं, देव हे पक्ष्यांचें रूप धारण करून या वनांतील वृक्षांवर आणि वेलींवर कूजीत करीत बसतात. नामदेवाच्या या अद्‌भुत वर्णनानें त्या जमलेल्या लोकशाहीला अर्थातच् आनंद झाला असेल, आणि त्या इंद्रायणीच्या तीराचें आधींच सिद्ध असलेलें पवित्रपण त्यांना पटलें असेल. परंतु, या नदीचें, आधींचें हे पवित्रपण ज्ञानेश्वराच्या समाधीनंतर सहस्रपटीनें वाढलेलें आहे. देव पक्ष्याची रूपें घेऊन वृक्षवेलीवर बसतात हा तर केवळ काव्यगौरव आहे. आणि येथें एक कोट यज्ञ झाले होते ही प्राचीन काळची परंपरेनें प्राप्त झालेली एक नवलकथा आहे. परंतु ज्ञानेश्वरानें या ठिकाणीं जिवंत समाधी घेतली हा सर्वमान्य इतिहास आहे. आणि आतांच सांगितलेली महाराष्ट्रांतील परमार्थिक लोकशाही येथें जमा झालेली होती हेंही नामदेवानेंच सांगून ठेविलेलें आहे. अशा या पवित्र स्थलीं एखादे वेळीं मनानें तरी जावेसें वाटतें. प्रत्यक्ष जाण्यापेक्षां मनानें जाण्यांत पुष्कळदां जास्त आनंद असतो. आणि त्या मोहांत मनानें गुंजारव करीत बसावें असें आपल्याला वाटतें ज्ञानेश्वरांच्या समाधीचें असेंच आहे. मनानें तेथें जाण्यांत आणि तेथें आपल्याशींच संवाद करण्यांत खरेंखरें सुख प्राप्त होतें. जीं मोठमोठालीं देवस्थानें आहेत, तेथें मला फारसें चैन पडत नाहीं. पडलेंच तर ते येवढ्यापुरतें कीं, या मूर्तींच्या पायावर श्रेष्ठ लोकांनीं आपलीं मस्तकें लवविलीं होतीं. शुद्ध मूर्तींचा किंवा स्थानांचा महिमा मला कांहीच वाटत नाहीं. नाना ठिकाणच्या आणि दरजातीच्या साधुसंतांनीं पाया पडून पडून विठ्ठलाचीं पाऊलें पातळ केलीं या गोष्टीमुळेंच पंढरपूरचा महिमा मला विशेष वाटतो. ज्ञानेश्वराची समाधी याच दृष्टीनें मला अत्यंत प्रिय वाटते. तेथें, एक मोठा रसिक तत्वज्ञानी, समाधी लावून बसला आहे येवढ्यामुळेच मला त्या ठिकाणासंबंधानें आत्मीयता वाटते. ज्ञानेश्वर आपल्यापेक्षां केवढाही मोठा असेल. पण तो आपल्या माणसाच्या जातीचा होता. येवढें लागतेपण मला पुरेसें वाटतें. एका समान भूमिकेवर येण्याला येवढें आसन पुरेसें आहे.

त्याच्या त्या अजानवृक्षाखालीं बसून थोडें रेलावें आणि आपल्याच मनाशीं गुणगुणत पडावें असें मला कितीदां तरी वाटतें. ज्ञानेश्वराच्या दारांतला पिंपळ हा सोन्याचा आहे असें अनेक भक्तांनीं म्हटलेलें आहे. खरोखर या पिंपळाचीं पानें जर सोन्याचीं असतीं तर ज्ञानेश्वराचे भक्त हे विरक्त आहेत असें मानूनसुद्धां या पिंपळाला एकही पान शिल्लक राहिलें नसतें असें वाटतें. ज्यात्याला ज्ञानेश्वराचा प्रसाद हवा असणारच! आणि प्रसाद किती घ्यावा याला सीमा

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

नसल्यामुळें सर्व यात्रेकरूंनीं मिळून या पिंपळाचा खराटा करून सोडला असता. आणि पुढल्या वसंतांत हा सोन्याचा पिंपळ पुन्हां फुलणार आहे ही आशा मनांत तेवत ठेवून ही भक्तमंडळी घरोघर गेली असती. परंतु हा पिंपळ सोन्याचा आहे हें ज्यांनीं पहिल्यानें म्हटलें आणि त्यांचे अभंग जे गात असतात त्या दोघांनींही प्रेमाच्या पोटीं एक अतिशय मनोरम अतिशयोक्ति केलेली आहे. ज्ञानेश्वराच्या दारांत आल्यानें किती सुख व्हटतें, ज्ञानेश्वराच्या दारात कसला वृक्ष बहरून जावा, तर ज्या सोन्याने प्रपंचांत सुख उत्पन्न होतें आणि ज्याच्या योगानें प्रपंचालाही वहर येतो, त्या सोन्याचाच हा वृक्ष असावा अशी अनुकूल कल्पना भक्तांच्या कवि–मनानें केली. भक्त मोठे लाघवी कवि होते. पंढरपूरचें स्तवन करतां करतां नामदेव एकदां म्हणाला 'आधीं वसविली पंढरी । मग वैकुंठ नगरी ॥ जेव्हां नव्हते चराचर । तेव्हां होतें पंढरपूर ॥ जेव्हां नव्हती गंगा गोदा ! तेव्हां होती चंद्रभागा ॥ ही अतिशयोक्ति करणाराला आणि ती ऐकणाराला दोघांनाहि तिचें मर्म आणि तिचें लाघव हीं कळतच होतीं. तसेंच ह्या सोन्याच्या पिंपळाचें सुद्धां आहे. या पिंपळाचा महिमा थोड्या विषयांतरानें मी वर्णन केला, पण स्फुट विचारांच्या आविष्कारांत, गमतीचें विषयांतर हेंही मनाला उत्तेजक वनते. या पिंपळाखालीं वसलें म्हणजे समाधींत बसलेल्या ज्ञानेश्वराला उद्देशून बोलावेसें वाटतें.

खरोखर ! या समाधींत येऊन आसनस्थ होतांना हे योगियांच्या राजा ! तुला ज्यांनीं पाहिलें असेल त्यांच्या हृदयांचे कंद त्या दिवशीं उन्मळून आले असतील. भोंवतीं उभे असलेले सारे वेदान्ती भक्तच होते परंतु वेदान्त्यांनासुद्धां माणुसकी सुटत नाहीं; त्यांना ती चुकवितां येत नाहीं. नामदेवानेंच म्हटलें आहे कीं हे लोक गहिंवरून गेले आणि कांहीं तर ढसढसां रडूं लागले. आज इतकीं वर्षें होऊन गेल्यानंतर आधुनिक विचारांत वाढलेलें माझें मन जर तुझ्या दारीं "एकदम इतकें द्रवू लागतें, तर ज्यांनीं तुझें हें दारुण तप आपल्या डोळ्यांनीं पाहिलें त्यांच्या मनाची काय कालवाकालव झाली असेल हें कल्पनेनें आणि सहानुभूतीनें ओळखावयास हवें. पण तसें तरी कशाला ? नामदेवाची जबानी अगदीं उघड आहे. माझ्या ज्ञानेश्वरा ! तुझा तो वडिल भाऊ निवृत्ती हा तर 'संकोचला संसार । पारुषला व्यवहार' या मन:स्थितीला जाऊन पोंचलेला होता. संसाराची क्षितिजापर्यंत पसरलेली सांवली ज्याच्या केवळ पायाखालीं येऊन ठेपली आणि ज्याला जगाच्या प्रपंचांत केवळ रखरखीतपणा, म्हणजे पारुष्य उत्पन्न झाले, तो तुझा निवृत्तिसुद्धां लहान मुलासारखा रडूं लागला, वेदनाचें वैराग्य आणि माणुसकीचें ममत्व याचा चमत्कारिक संकर या योग्याच्या मनांत त्यावेळीं झाला असेल. मुक्ताबाई तर बोलून चालून लहानच होती; तिला साऱ्या जुन्या आठवणी होऊं लागल्या. या लोकांच्या मनाची प्रवृत्तीच जरी आतां वेदांताची आणि वैराग्याची वनलेली असली तरी या प्रसंगीं त्यांचीं मानुषविकृति वर उचंबळून आली. आणि, त्या मुलीनें गहिंवरुन सांगितलें कीं "सोपानाला मला खेळविण्यासाठीं घरीं ठेऊन हा ज्ञानेश्वरदादा कोरान्न मागण्यासाठीं माधुकरीचें फडकें घेऊन बाहेर जात असे. मला तो सारा प्रसंग आतां आठवतो. तो गेला म्हणजे "दादा कोठें गेला ?" म्हणून मी विचारी, "परंतु हें कोरान्नाचें रहस्य मला तेव्हां कळत नव्हतें. आतां हा योग्यांचा 'बनलेला' राणा आणि पारमार्थिक बुभुक्षितांना पोटभर जेऊं घालणारा हा ज्ञानेश्वर आतां कायमचा दृष्टिआड होतो यामुळें माझें मन उद्वेगानें भरून जाते." खरोखर इतका करुणास्पद देखावा महाराष्ट्राच्या इतिहासांत दुसरीकडे कोठें दिसला असेल असें वाटत नाहीं.

माझें बोलणें भोळेपणाचें, विनाकारण भावनातिरेकाचें असें वाटेल, पण मला खरें बोलल्याचें श्रेय मात्र मिळेल. कितीदां तरी वाटते कीं आपल्याला तीं तीं माणसें आणि ते ते देखावे पुन्हां दिसावें; पतिव्रतांची राणी ती जी जानकी; आणि एकपत्नीव्रत जगाला शिकविलेला क्षत्रियांचा राजा तो धनुर्धर राम; द्रौपदीच्या वेणीची आठवण होऊन क्रुद्ध वनलेला आणि कौरवांच्या शासनाला उद्युक्त झालेला तो स्त्रियांचा पक्षपाती श्रीकृष्ण; संसाराची सर्व वाताहत होऊन हिमालयाची वाट चालूं लागलेले ते पांच पांडव आणि त्यांची पत्नी ती द्रौपदी; हे सारे मला एकदां तरी दिसावें असें वाटतें. ते दिसले तर उरलेल्या आयुष्याची किंमत मी खुषीनें देईन. ते चक्र चर्मचक्षूनीं दिसावे. ज्ञानेश्वरा ! तुझ्या संबंधानेंही मला असेंच वाटतें. तुमच्या लहानपणीं मी जर तिथें असतों, तर मुक्ताबाईला मी खेळवीत बसलों असतों, नाहींतर स्वतःच कोरान्नाला जाऊन तें तुला आणून घातलें असतें त्या नेवाशाच्या खांबाला टेकून ज्ञानेश्वराचें तें अत्यंत मधुर काव्यरसानें भरलेलें आणि वेदान्ताची मोहरी लाविलेलें तें भाष्य तूं सांगत असतांना मी तें उतरुन घ्यावयास बसलों असतों, आणि रेड्याच्या पाठीवर मारलेल्या आसूडाचे वळ तुझ्या पाठीवर जर खरोखरच दिसलें असतें तर, सगळ्या गांवांत मी ओरडत फिरलों असतों कीं, "काय अद्भुत चमत्कार झाला आहे पहा !"

ज्ञानेश्वरा ! येवढ्या लहानपणीं तूं आपल्या दारांत कैवल्यस्वरुपाचा वेल लाविलास आणि त्याचें पोषण तूं एवढ्या उत्सुकतेनें केलेस कीं तो हां हां म्हणतां गगनांत जाऊन पोंचला. या मोगऱ्याचा विस्तार खूपच झाला. आणि मग, तुझ्या वाणीला जेव्हां वहर आला, तेव्हां, "मोगरा फुलला फुलें वेचायला चला" असें गांवांतले लोक एकमेकांना ओरडून सांगूं लागलें. या लोकांत जर मीं असतों तर फार बरें झालें असतें. माझ्याशीं बोलतांना एकदां पांगारकर म्हणाले, "एकदां मी अर्धवट जागा आणि अर्धवट सुषुप्तींत असतांना मला एक कसला तरी प्रचंड झोत दिसला. त्यांत त्या चाफळच्या वैराग्याची भव्य मूर्ति उभी होती. दासनीं मला सांगितलें,

( पान १११ वर पहा )



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

फाइन आर्ट प्रिंटिंगसाठीं
सुप्रसिद्ध !

: आमचीं वैशिष्ट्यें :
डाय आणि कॉपर प्लेट एनग्रेव्हिंग; टेक्स्टाइल आणि परफ्यूमरीसाठीं लागणारी, "गोल्ड एम्बॉस्ड" लेबल्स व सील्स—पोस्टर्स, शो कार्डस, ग्रेइंग कार्डस् व फॅन्सी लेडी टिकेट्स्–औषधें, साबू, तेलें, सिगा-रेट्स्साठीं लागणारी बॉक्सेस (Cartoons) लेटर हेडस्, व्हिजिटिंग कार्डस् वगैरेची मनपसंत छपाई !

SEAL OF PERFECTION QUALITY

SENEFELDER LITHOWORKS
244, BELLASIS ROAD BOMBAY 8

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

: लेखक :

**– वि. वि. बोकील –**

जगाकडे पाहण्याची माझी दृष्टि विकृत आहे असें सर्वांचें मत आहे. अतिशय संकुचित मनानें मी लोकांच्या कृत्यांची छाननी करतों असा माझ्या मित्रांचा माझ्यावर आरोप आहे. मी अतिशय तुसड्या स्वभावाचा असल्याचा दाट संशय आईनें माझ्या तोंडावर अनेकवार व्यक्त केला आहे. माझ्या वडिलांनीं तर माझ्या हेकट स्वभावाला कंटाळून माझ्यासंबंधीं एक अक्षर तोंडावाटें न काढण्याची प्रतिज्ञाच घेतलेली आहे. माझी धाकटी बहीण माल्र आतां चांगली चार मुलांची आई झाली आहे. पण सुमारें बारा वर्षांची होती तेव्हांपासून तिनें मला 'चक्रम'पणाची किताबत बहाल केली होती, ती अजून तिनें परत घेतली नव्हती. एकंदरींत माझ्याविषयीं चांगले बोलणारे लोक औषधाला तरी सांपडतील कीं नाहीं याची मला दाट शंका आहे.

काव्यशास्त्रविनोदाच्या ऐसपैस पांघरुणाखालीं अचाबचा बोलणारे माझे मित्र मी जवळ आलों कीं हवापाण्याच्या आणि मंडईतल्या बाजारभावाच्या गप्पा मारूं लागतात हें अनेक वेळां माझ्या प्रत्ययास आलें होतें. घरांत माझें पाऊल पडण्याच्या आधीं आई आणि मुलगी ज्या जिव्हाळ्यानें बातचीत करीत असत तो जिव्हाळा, तो लाघवीपणा माझ्या आगमनामुळें पार पळून जाई हेंही मला दिसून आलें होतें. माझ्या बहिणीची चारही मुलें आसपासच्या इतर मुलांपेक्षां जास्त नीटनेटकी दिसत असत हें मी कबूल करतों. वडिलांच्या सधनतेमुळें त्या मुलांची वस्त्रप्रावरणाची टापटीपही चांगली होती हेंहि मला मान्य आहे. तरीसुद्धां मामाभाच्यांमध्यें







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# तें स्मित!

**गुलाबच्या नजरेस मी प्रथमच नजर दिली. आणि माझ्या साऱ्या कोमल भावनांनीं एकदम टाहो फोडला!**

विशेष अशी आपुलकीची भावना कधींच निर्माण झाली नाहीं. कदाचित् माझ्या या तुटकपणाच्या वागणुकीमुळें हींच मुलें मोठीं झाल्यावर माझ्या निंदकांत आणखी थोडीशी भर पडेल.

मला हें सर्व स्वच्छ दिसत आहे. इतरांनीं माझ्याविषयीं करून घेतलेला ग्रह मला स्पष्ट समजतो आहे. लोकांनीं माझ्याविषयीं विनाकारण मन कलुषित करून घेतलें आहे असा कांगावा करण्यांत मला बिलकूल स्वारस्य वाटत नाहीं. बाह्य रूपावरून परीक्षा करण्याची जगाला खोड आहे हें मी कसें विसरेन! लोकांनीं माझ्यासंबंधीं बेपर्वाई दाखवावी, क्वचित् प्रसंगीं समाजाचा शत्रु म्हणून हेटाळणी करावी यांत लोकांचें कांहींच चुकत नव्हतें.

हो! म्हणजे माझ्याविषयीं बनलेलें लोकमत मला संपूर्णतया मान्य होतें असा मात्र याचा अर्थ घेणें चुकीचें होईल. प्रसंगानें बनलेल्या माझ्या वरपांगीं तऱ्हेवाईक भासणाऱ्या स्वभावाला इतिहास होता—तो फारच थोड्यांना माहीत होता. स्पष्टच बोलायचे तर मला आणि तिला! आम्हा दोघांनाच—

पण आतां सांगतोंच ती हकिकत!

पंधरा वर्षांच्यावर अवधि लोटला असेल. त्यावेळीं मला चौदावें संपून नुकतेंच पंधरावें वर्ष लागलें असेल. मालू सुमारें बारा वर्षांची परकरी पोर होती. घरांत लहान मुलें अशीं आम्ही दोघेंच हयात होतों. माझ्या आधीं दोन आणि मालूच्या पाठीवर आणखी दोन अशीं चार भावंडें मरण्यासाठींच जन्माला येऊन गेलीं. घरांत मुलगा एकटा मी. अर्थात्च चेहऱ्या मोहऱ्यानें थोडासा कुरुप असलों तरी सोन्याचा तुकडा या नात्यानें विशेष लाडिकपणानें वागवला जात होतों. मी म्हणेन ती अक्षरशः पूर्व दिशा ठरावी, मी हुंकार दिला कीं सबंध घर कोसळून पडणार असें भयभित वातावरण निर्माण व्हावें, माझें डोकें दुखूं लागलें कीं दशदिशा सुन्न भासूं लागाव्यात आणि मी माझ्या पुढें आलेल्या दांतांच्या फटींतून हसूं लागलों कीं निरभ्र आकाशांत चांदवा विलसूं लागल्याचा प्रसन्नपणा त्या घरांत खेळूं लागावा असा थोर अधिकार निसर्गानें मला बहाल करून टाकला होता.

परंतु एके दिवशीं घरांतल्या आरशानें माझें हें सुखस्वप्न पार धुळीस मिळवून टाकलें. वयांत येईपर्यंत मुलांना या गोष्टींचा फारसा मनस्ताप होत नाहीं. आपला चेहरा सुरूप आहे कीं कुरूप आहे ह्या विचारांचा त्यांना पत्ताही असण्याचें हा वेळपर्यंत कांहीं कारण नसतें. मालूच्या बाबतींत निसर्गानें आपली चूक सव्याज भरून काढली होती, आणि या कारणामुळेंच कीं काय मला तिनें हजारों वेळां चिडवून घेतलें असेल. अशा वेळीं मी किंचित् चिडखोरपणानें कांहीं बोलूं लागलों तर आई माझ्या बाजूनें बोलूं लागे. एकदां मला आठवते मालू माझ्यावर खूप चिडली होती. तिची वही मी बळकावून बसलों होतों. माझ्या आडदांडपणाला सक्रिय उत्तर देणें तिला शक्य नसल्यामुळें तिनें तावातावाने शब्द उच्चारून स्वतःच्या दुखावलेल्या मनाला मलमपट्टी लावण्याचें ठरविलें असावें. बोलतां बोलतां उपहासानें ती माझ्यापुढें हात ओवाळून म्हणाली—

"अहाहा ऽ ऽ रे ध्यान! म्हणे हे पुरुष. हाका मारले पुरुष, रंग काळा कुळकुळीत, काजळालासुद्धां लाज वाटेल असा. कान तर गाढवापासून उसने आणलेले, म्हाताऱ्या माणसासारखं पाठीला हें एवढं पोंक—वरचा ओठ उंदरानं मधेंच कुरतडलेला. अन् शिंग्यासारखे राठ केस. कानावरसुद्धां तुझ्या केस यायला लागले आहेत. मागच्या जन्मीं अस्वल होतास कीं काय कुणास ठाऊक! आईनं तुझा कितीही कैवार घेतला तरी काय कोळशाचा रंग बदलणार आहे होय!"

"माले, मालिटले—" मी संतापानं खवळून ओरडलों. पण माझ्या संतापाकडे लक्ष न देतां ती हंसून पुढें म्हणाली—"आणि रागवलास म्हणजे अता कांहीं मदनाचा पुतळा दिसतोस कीं गुरुवारीं रात्रीं भीक मागायला येणारा आंधळा भिकारी तरी चांगला दिसेल तुझ्यापेक्षां, आणि म्हणे हे पुरुष! माझ्या अंगाला हात लावलास तर पहा आपला विचार—"

मालीला मी त्या दिवशीं यथेच्छ बडवून काढलें. आईनें मधें पडून आमची लढत तात्पुरती थांबवली. आणि मालीला [illegible] दिवशीं माझ्या हातचा मार व आईच्या तोंडचे रागाचे शब्द ह्या दोन्हीं अन्यायांना मुकाट्यानें मान लववावी लागली. आईनें मालीला दटावले, "कारटे, कां उगाच त्याच्याशीं असा उभा दावा खेळतेस ग? तूं काय एखादी इंद्राणी लागून गेली आहेस तें दिसतंच आहे. पण लक्षांत ठेव, दुसऱ्याच्या घरांत चूल अन् पोतेरं करीत बसण्यासाठींच तुझा जन्म आहे. दुसऱ्याच्या घरीं उठतां हाथ अन्

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

बसतां बुक्की बसेल तेव्हां तुझी मिजास उतरेल. जिवंत राहिलें तर तोहि तुझा तमाशा या डोळ्यांनीं पाहीन. जग् कसाही असला तरी या घरांतला आहे. तुझ्यासारखी शंभर ठिकाणीं दाखवण्याची फजिती या जन्मांत तरी त्याच्या नशिबीं नाहीं, समजलीस–! ”

आईच्या या वक्तव्यानें मालूचें समाधान झालें कीं नाहीं हें समजायला मला मार्ग नव्हता. मात्र त्यावेळीं एक गोष्ट माझ्या मनाला सहजच चाटून गेली. माझ्या कुरूप-पणा विरुद्ध तिनें आकांडतांडव कितीही केलें तरी माझा कुरूपपणा तिलाही मान्य करावा लागलाच. मी कुरूप नाहीं असें एकही विधान तिच्या तोंडून बाहेर पडलें नाहीं या गोष्टीची मला अस्पष्ट जाणीव झालीच. पण मालीला रडकून खेटरें खावीं लागलीं या विजयोन्मादांत ही गोष्ट मी चटकन् विसरून गेलों.

पण—पण मला हा रूपांतील अवगुण हळू-हळू वयोमानाप्रमाणें मधूनमधून अस्वस्थ करून सोडूं लागला हें मात्र निश्चित! मी ..चें समाधान करूं लागे. पुरुषांना नाहीं .देखणेपणाची काय गरज आहे? बायकी ..रा असणें म्हणजे उलट कमीपणाच ..णार नाहीं का? आणि अशा नाजूक ..डाच्या मुलांना आम्ही शाळेंत चिडवल्या-..वाय कधीं तरी सोडतों का? पुरुषांच्या ..पाची चर्चा करण्यापेक्षां त्याच्या पराक्रमाकडे जगाचें लक्ष वेधत असतें. ती बाजू बळकट असल्यावर जगाच्या उपहासाला कवडीची किंमत उरणार नाहीं. अशा तऱ्हेच्या युक्तिवादानें मी समाधान मानून घेत असे—

परंतु शाळेंत, आमच्या वर्गांत एके दिवशीं मिस् गुलाबनें प्रवेश केला. इंग्रजी सहावींत मी त्यावेळीं होतों. आमची शाळा सरकारी हायस्कूल होतें. मुलांच्याप्रमाणें मुलींनाही पण त्या इमारतीचें दार सताड मोकळें होतें. पण गेल्या सहा वर्षांत आमच्या शाळेंत फक्त पंधरा वीस मुलीच शिकत असलेल्या मला दिसल्या. आणि त्यांपैकीं बहुतेकजणी चवथीच्यावर आल्याच नाहींत. तो काळ आजच्याहून थोडासा निराळा होता. मुलगी इंग्रजी शाळेंत जाते हें वर पक्षाला दाखविण्यासाठींच त्या काळीं मुलींना शाळेंत पाठविण्यांत येत असे. बऱ्या दिसणाऱ्या मुली चौथीच्या वार्षिक परिक्षेला बसण्याच्या फंदात क्वचित्च पडत असत. बहुतेक त्या घटकेला त्या उखाण्यांचीं पुस्तकें चाळून पाहाण्यांत गर्क झालेल्या असावयाच्या! अशानुळें तारुण्याच्या भरानें मुसमुसलेली अल्लड तरुणी जवळून पाहण्याचें भाग्य नुकत्याच मिसरूड फुटूं लागणाऱ्या माझ्यासारख्या तरुण मुलाच्या नशिबी येणें जवळजवळ अशक्य होतें. सहावींतला मुलगा तिसरींतल्या मुलीकडे पाहून पाहून किती पाहणार? अन् त्यांत चित्तक्षोभ व्हावा असें त्याला दुरून काय पाहायला सांपडणार?

गुलाब ही बाटून खिश्चन झालेल्या बापाची पोरगी होती. तिच्या बापाची बदली झाल्या-कारणानें हा योगायोग जमून आला होता. सुमारें माझ्याच वयाची, कदाचित् एकाद्या वर्षानें अधिकही ती असूं शकेल!

मात्र तिला ज्या दिवशीं प्रथमच वर्गांत शिरतांना मी पाहिलें त्या दिवसाची आठवण मी या जन्मांत तरी विसरणें शक्य नाहीं. गुलाबच्या रूपानें जगांतील मूर्तिमंत मांगल्य आपल्या दृष्टिपथांत येत असावें असें मला त्याच क्षणीं वाटलें. उद्यानांतील लतावेली वाऱ्याच्या लहरींशीं झिम्मा खेळण्याचें सोडून इकडे कशा आल्या याचें मला नवल वाटलें. बंद खिडकींतून एकच एक डोकावणारा रुपेरी चंद्रकिरण अंगावर खेळत असल्याचा मला क्षणभर भास झाला. चंद्राची स्निग्धता, कमळाच्या परागांतील नाजूकपणा, बटमोगऱ्याच्या फुलांतील डौल आणि उमलत्या गुलाबाच्या फुलांतील आव्हान हे सारे गुण तिच्या टपोऱ्या डोळ्यांत एकवटल्याचा मला संशय आला. तिला पाहतांक्षणींच माझें हृदय मी तिच्या पायावर वाहण्यास आतुर झालों. पंधरा वर्षांच्या मुलानें हृदयाची देवघेव इतक्या मंदीच्या भावांत करणें युक्त दिसणार नाहीं याची पुसटती शंका देखील माझ्या मनाला शिवली नाहीं. कसल्याच प्रकारचा विचार करण्याइतपत माझा मेंदू शुद्धीवर तरी कुठें होता? गुलाबच्या रूपानें मला साक्षात्कार घडवला होता. विधात्यानें गुलाबच्या रूपानें आपल्या रचनाकौशल्यांतील एक महत्त्वाचें पान मला उघडून दाखवलें होतें. गुलाबला पाहतांक्षणींच मी वेडावून गेलों. स्त्री ही केवढी अमोघ शक्ति आहे हें पाहून मी स्तंभित झालों. अर्थात् या सर्व गोष्टींचा उच्चार आज ज्या शद्बांत मी स्पष्टपणानें करीत आहे ते शब्द त्यावेळीं माझ्या गांवींही नव्हतें. गुलाबला पाहून मला त्यावेळीं काय वाटलें हें मी आज शब्दानें सांगूं शकतों—पण त्यावेळीं काय झालें तें माझें मलाच माहित.

सबंध दिवसभर वर्गांत मी भानावर नव्हतों. खोटी लज्जा बाजूस सारून मी संधि सांपडेल तेव्हां गुलाबच्या पाठीमागून दिसणाऱ्या केशरचनेकडे अतृप्त नेत्रानें सारखा पाहात होतों. कितीही वेळां पाहिलें तरी तृप्ति कशी ती लाभेचना. इतकी गोड मुलगी समोर बसली असतांना तिच्याकडे पाहण्याचें सोडून आलजिब्र्याचें रुक्ष फॅक्टर्स सोडविण्यांत मला कसा आनंद मिळाला असता? माझ्या हातून त्या दिवशीं अनेक अक्षम्य चुका झाल्या असतील—पण माझी धुंद समाधि भंग पावूं शकली नाहीं.

मी घरीं आलों. मालीशीं मी अक्षर बोललों नाहीं. आईनें पुढें केलेला चहा मी निर्विकार मुद्रेनें एका दमांत पिऊन टाकला. आई काय बोलत होती इकडे माझें लक्ष नव्हतें. मी उठून बाहेर जाऊं लागलों तोंच आईनें मला आडवलें—–

“तुझं लक्ष कुठें आहे आज? बशींत ओतून ठेवलेला चहा तसाच आहे कीं अजून-”

घाईघाईनें मी बशींतला चहा पिऊन टाकला. आईशीं बोलत बसण्याची ती वेळ नव्हती. मला एकांत पाहिजे होता. कोणीही चिटपाखरूंसुद्धां आसपास नाहीं अशा आड बाजूला जाऊन त्या देवतेची मला मानसपूजा बांधावयाची होती. तिच्या सौंदर्यांतील एकही वैशिष्ट्य स्मृतिआड होऊं नये एवढ्यासाठीं मी धडपडत होतों. तिचें तें सरळ नाक, लिवलिवित बांधा, पूर्ण चंद्राप्रमाणें

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

भासणारें केंसाचे चाकं, दातांचा रेखीवपणा, गुलाबी ओठांना मधोमध विभागणारी रेषा— या सर्व वैशिष्ट्यांचें प्रतिबिंब हृदयांत कायमचें ठसविण्यासाठीं मी आतुर झालों होतों. बाहेरच्या खोलींत बसलेल्या वडिलांच्या चष्माविभूषित डोळयांकडे ढुंकून न पाहतां मी घराबाहेर सटकलों.

मी किती दूर गेलों आणि वेळ किती झाला याचें मला मुळींच भान राहिलें नाहीं. मी मनुष्य वस्ती सोडून दूर एकटाच हिंडत होतों.

माझे सारे विचार गुलाबच्या स्मृतिभोंवतीं घुटमळत होते. जों जों विचार करावा तों तों मला तिच्या रूपामधें नवीन नवीन आकर्षकपणा वाटूं लागावा. तिच्याशीं बोलण्याची आपल्याला संधि मिळेल का या विचारानें माझें सर्वांग पुलकित झालें. ती आपल्याशीं बोलेल काय या विचारानें क्षणभर माझें हृदय भारावून आलें. मी तिच्या पायाचा दासानुदास बनलों होतों. एका दिवसानें माझ्या विचारांत एकदम क्रांती घडवून आणली होती. प्रत्येक झाड मला गुलाबच्या रूपाचें प्रतीक भासूं लागलें. झाडांचीं पानें हलूं लागली म्हणजे गुलाब हातानें खूण करून जवळ बोलावीत आहे असें वाटूं लागावें. वाऱ्यानें पानें सळसळूं लागली कीं गुलाबच्या साडीची आठवण व्हावी.

सभोंवार पसरलेला निसर्ग म्हणजेच गुलाब असली वेडी कल्पना माझ्या डोक्यांत घर करून बसली.

गुलाब मला पाहिजे होती. जन्मभर गुलाबच्या पायाशीं बसून राहावें असली खुळी कल्पना माझ्या डोक्यांत खेळत होती. गुलाबचें सान्निध्य मला पाहिजे होतें—पण कशाला—? कशाला गुलाब पाहिजे होती मला—?

या प्रश्नाचें उत्तर मला नीटसें देता आलें नसतें. मी वयांत लागलों होतों. कदाचित् त्यावेळीं माझ्या मनाच्या अजून अर्धवट सुप्तावस्थेंत असलेल्या कोपऱ्यांत कदाचित् किंयलालसेचा धागा सांपडला सुद्धां असता. मी ढोंगीपणानें तो मुद्दा डावलूं इच्छित नाहीं. पण सर्वांत महत्त्वाचा मुद्दा हा होता कीं गुलाब मला पाहिजे होती ती तिचा हात माझ्या हातांत धरून पाहण्यासाठीं. बोलतांना तिचे डोळे कसे नाचत असतील ते मला पाहावयाचे होते. तिचें अर्धस्फुट यौवन मला उपभोगण्यापेक्षांसुद्धां केवळ सान्निध्याच्या गोड सौख्यासाठीं जवळ पाहिजे होतें तिच्या पायाशीं मला बसायला पाहिजे होतें. मी तिच्यावर किती खूप आहे हें तिला निसंकोचपणें सांगण्यासाठीं ती मला फार फार पाहिजे होती. मी तिला माझ्या छातीशीं घट्ट धरून ठेवलें असतें. कधीं कधीं तिला दूर होऊं दिलें नसतें. मृत्यू आला असता तरी तिला दूर सारली नसती. तिच्या देहाला बिलगलेल्या स्थितींतच मी समाधानानें डोळे मिटून घेतले असते.

बराच उशीर करून मी घरीं परत आलों. वडिलानीं मला दटावणीच्या सुरांत कारण विचारलें. आईनें आर्जवानें चौकशी केली. मालीनें नेहमीच्या अवखळपणानें ' कुठें गेला होता हो फकीर महाराज ? ' म्हणून प्रश्न केला. परंतु मी उडवाउडवीचीं उत्तरें करून वेळ कशीतरी भागवली. जेवणांत माझें लक्ष नव्हतें. कोणाच्या बोलण्याकडेही मी लक्ष दिलें नाहीं.

" बरं का वाटत नाहीं ? डोकं दुखतं आहे का ? " आईनें मी बाहेरच्या खोलींत जातांना हलकेंच विचारलें.

" डोकं दुखायला काय झालं आहे त्याला ? अभ्यास करायला नको म्हणून हें नाटक चाललं असेल—" माली परकराला हात पुशीत म्हणाली, वडील कांहींच बोलले नाहींत. ते कांहींतरी बोलतील या भीतीनें मी तडक अंथरूण गांठलें.

आईला मी काय सांगूं शकलों असतों ? वडिलांच्याजवळ गुलाबविषयीं एक अक्षर तरी मी बोलूं शकलों असतों काय ? आई कितीही जवळची असली तरी तरुणपणीं नव्यानेंच निर्माण होणाऱ्या भावना मुलगा तिच्याजवळ कसा सांगूं शकेल ? छेः ! ह्या गोष्टीची परिस्फुटता कोणाजवळही करावयाची नाहीं हें मी पक्कें ठरवून टाकलें. मित्रांनीं तर माझी टवाळीच केली असती. मालीनें तर सबंध गांवाला आग लावून दिली असती. वडिलांनीं तर रागाच्या सपाट्यांत जानवेंच तोडून टाकलें असतें !

नाहीं. ती पवित्र भावना, ती पवित्र स्मृति मला माझ्या हृदयांतच दडपून ठेवणें भाग होतें. जुनीं नातीं कितीही पवित्र असलीं तरी प्रणयाचें नातें हें सर्वांत जास्त पवित्र आहे. त्याचें पावित्र्य राखण्यासाठीं मला स्वतःच्या आईपासूनसुद्धां ही गोष्ट दडवून ठेवणें जरूरीचें वाटूं लागलें. जग मला आचरट समजेल, समजूं दे. मला जगानें काय समजावें हा माझा प्रश्न नाहीं.

—आणि दिव्याच्या उजेडांत मी प्रथमच आरशांत त्या दृष्टीनें पाहिलें. गुलाबच्या डोळ्यांना मी कसा दिसत असेन या नवीनच कल्पनेनें मी आरशांत पाहिलें. मला जोराचा धक्का बसला !

आरशांत दिसणाऱ्या त्या कुरूप प्रतिबिंबाकडे त्या देवतेनें काय म्हणून सहृदयतेनें पहावें या विचारानें तळमळत ती रात्र मी अक्षरशः जागून काढली. आजपर्यंत माझ्या कुरूपतेबद्दल जे जे उद्गार माझ्या कानांवर आले ते ते सर्व उद्गार माझ्या हृदयाला अंगाराप्रमाणें जाळूं लागले. गुलाब सर्वांग सुंदर होती म्हणून आपण तिच्याकडे आकर्षिले गेलों—पण तिनें आपल्याविषयीं काय म्हणून स्निग्धता धारण करावी ?

उलटं सुलट विचार करतांकरतां माझें डोकें खरोखरीच दुखूं लागलें. कुरूपतेचा एकमेव विचार मला भाजून काढूं लागला—! आणि पहाटेच्या गारव्यासरशीं एक नवीनच विचार माझ्या डोक्यांत चमकून गेला. अगदीं बावळटपणाचा तो विचार होता. पण काडीसाठा धडपडणाऱ्या माझ्या तळमळणाऱ्या मनाला तो भलाभक्कम आधार त्यावेळीं वाटला. हृदयींचे बोल हृदयाला कळतात म्हणून म्हणतात तसं तर होणार नाहीं ! आपल्या हृदयांत दडलेल्या भावना सहसंवेदनेमुळें गुलाबला कळणार नाहींत काय ? कुणी सांगावें ? हृदयाची विशुद्धता म्हणून कांहींतरी अजब चमत्कार नसेल कशावरून ?

( पान ११६ वर पहा )



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

**रतन** सारखे सर्वांगसुंदर चित्र ज्यांनीं सादर केले त्यांचेच ॥

नवें मनोहर चित्र ॥ **दो दिल** ॥ जमुना प्रॉडक्शन ●




दिवाळीच्या मंगलमय दिवसांत सहर्ष जाहीर करीत आहोंत—

प्रकाशक :—**जमुना प्रॉडक्शन्स,** पुरंदरे पार्क, व्हिन्सेंट रोड-मुंबई १४




अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

★ डाक बंगलो

Dak Bungalow

इंडियन नॅशनल पिक्चर्स
लि. चे प्रथम चित्र

: कलामंडळ :
सुरैय्या, वास्ती
एम्. इस्माइल, गोप, मलक
कपूर, शहाजादी, रामप्यारी वगैरे

: कथा संवाद
पटकथा-दिग्दर्शन :
एम्. सादीक
गीते : मधोक

अधिक माहितीसाठीं लिहा :
इंडियन नॅशनल पिक्चर्स लि., सर फिरोजशहा मेथा
रोड, मुंबई नं. १

दि
प्रेसिडेन्सी इंडस्ट्रिअल
बँक लिमिटेड पुणें.

: हेड ऑफीस :
प्रेसिडेन्सी बँक बिल्डिंग, पुणें २

–मुंबई ऑफिस–
इस्माईल बि., हॉर्नबी. रोड मुंबई १

अधीकृत, विक्रीस काढलेले, व खपलेले
भांडवल.......रु. १०,००,०००
जमा झालेले भांडवल...,, ६,७७,६४५
खेळते भांडवल .......,, ५८,००,०००

– अध्यक्ष –
श्री. ग. साठे.
श्री. दा. ग. बापट,
उपाध्यक्ष–

बँकेचे सर्व व्यवहार
केले जातात

गो. धों. जोगळेकर,
बी. ए; [ऑ.] बी. कॉम्; एल्एल्. बी.;
मॅनेजर.

चिं. त्रिं. चितळे,
मॅ. डायरेक्टर.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

( पान १७ वरून चालू )

सांगितली असती आणि मग हा पुतळा क्षण-भर सुद्धां इथं राहिला नसता—तो धूम पळत सुटला असता. या विचाराचे त्याचें त्यालाच हंसूं आलें. पण गांधीजींचा पुतळा उभारण्यांत पुढाकार घेणाऱ्या शेटजींच्या खोल्या हिशेबाच्या पलीकडे पडलेल्या वह्या पाहतांच त्याचें मन पुन्हां अस्वस्थ झालें. या जगांत कुठें तरी कांहीं–तरी चुकतंय्. माणसांच्या जीवन–संगीतांत गोड सुरापेक्षां बेसूरच अधिक ऐकूं येत होते. अशी कांहींतरीच कल्पना त्यांच्या मनांत पिंगा घालूं लागली.

कोपऱ्यांतील शेटजींच्या मोटारीचें हॉर्न वाजलेले ऐकतांच रघुनाथ तंद्रींतून जागा झाला. तो लगबगीनें जिना उतरूं लागला. जिन्याच्या शेवटच्या पायरीवर तो जातो न जातो, तोंच शेटजी वर येत असलेले त्याला दिसले ते चोरून उभा राहिला. शेटजी वर गेल्यावर त्यांच्या मागून तो अदबीनें एक एक पायरी चढूं लागला.

रघुनाथ वर येतांच शेटजी हंसत म्हणाले, 'कालचा समारंभ मोठा छान झाला नाहीं? उद्यांच्या साऱ्या पेपरमध्यें असें वर्णन येईल!' रघुनाथानें मान हलविली.

'आतां दुसरी एक कामगिरी करायचीय् तुला. रोशनचा चुलतभाऊ चार दिवसांपूर्वी आलाय् ना? तो बाराच्या गाडीनें परत जाणार आहे. आंब्याची भेट पाठवावयाची आहे त्याच्या बरोबर असे फक्कड आंबे पाहून दे. की रोशन अगदीं–'शेटजींनी वळून खिशांतल्या शंभराच्या दोन नोटा जणूं कांहीं ते कागदाचे कपटे आहेत अशा ऐटीनें काढल्या नि रघुनाथाच्या हातांत ठेवल्या. रघुनाथ जमाखर्चाच्या वह्या कपाटांत परत ठेवूं लागला. शेटजी म्हणाले, 'नि हें पहा मोटारच घेऊन जा तूं! रोशनचा तो चुलतभाऊ खालीं आलाय्, आंबे घेऊन त्याचेबरोबर. तिच्या बंगल्यावर जा तूं, म्हणजे ह्यांच्या सामानाची बांधाबांधही झटपट होईल!' रघुनाथ कपाटाला कुलूप लावून खालीं जाऊं लागला. शेटजी गुरगुरले! अरे सरें ऐकल्यशिवाय कुठें चाललास तूं? नि हें पहा पाहुण्यांना बाराच्या गाडीला पोंचवायला जा तूं! दुपारीं लवकरच जेवून ये हं! हिशेब तयार करायचे आहेत. या पुतळ्यानं फार वेळ खाल्ला आपला मर्चे!

रघुनाथ पाहुण्यांना घेऊन मंडईंत गेला. पाहुण्यांची आंब्याची निवड व्हायला तब्बल दोन तास लागले. ते आंब्याचे मोठे शोकी होते असे दिसलें. हापूस, पायरी, माणकूर, यांच्या दोन दोन करंड्या तर त्यांनीं घेतल्याच पण रघुनाथाला ज्याचें नांवही ठाऊक नव्हतें असे दुसरे कलमी आंबे सुद्धां त्यांनीं खूप घेतले. हा सौदा सुरु असतांना रघुनाथाला एकदम मोहनची आठवण झाली. आज त्याच्या वाढदिवसाला जानकीनें काय केलें असेल बरें? मोहनला आंबा फार आवडतो. जानकीलाही आंबरस आवडतो. आपण पायरीची अर्धी करंडी काल संध्याकाळीं घरीं नेली असती तर बरें झालें असतें असें त्याच्या मनांत आलें. पण अर्धी करंडी म्हणजे नाहीं म्हटलें तरी आठ–नऊ रुपये. पाहुण्यांच्या आंब्याचे बागवानानें त्याच्या हातांत दिलेलें बिल त्यानें पाहिलें. एकशें सदतीस रुपये आठ आणे! रघुनाथ क्षणभर वेड्यासारखा पहातच राहिला. मग त्यानें शेटजींनीं दिलेल्या दोन नोटा बागवानाच्या हातांत ठेवल्या.

पाहुण्यांना पोचवून रघुनाथ सराफकट्ट्याकडे आला तेव्हां साडेबारा व्हावयाला आले होते. उन्हांतून घाईघाईनें चालल्यामुळें त्याच्या तोंडावर घामाच्या धारा निथळत होत्या. त्याला एकच भीति वाटत होती—आपण मोहनची माळ करायला दिलेलें दुकान बंद झालें असलें तर?

दुकान उघडें आहे असें दुरून दिसतांच त्याचा सारा शीण क्षणार्धांत नाहींसा झाला. तोंडावरचा घाम पुशीत पुशीत तो मालकाच्या पुढें जाऊन उभा राहिला, आणि हंसला. कपाळावरचा चष्मा नाकावर आणून मालकानें त्याच्याकडे पाहिलें. लगेच आपली दंतपंक्ति दाखवीत ते म्हणाले, तुमचंच काम पुरं करीत होतो!

त्यांच्या हातांत तर आठ सुंदर सोनेरी बांगड्या दिसत होत्या. रघुनाथ भीत भीत म्हणाला, 'मी मुत्याची माळ दिली होती करायला! ती झाली नाहीं?

'अहो, होणार कशी?' हें तुमचंच दुसरें काम मध्यें आलें ना? रोशनबाई परवां आपल्या चुलत भावजयीच्या नव्या फॅशनच्या बांगड्या दाखवायला आली. तिला आज दुपारचे साडेबाराचा वायदा दिलाय्! फॅशन जरा नवीन आहे त्यामुळें थोडा अधिक वेळ लागला. आतां तुमची माळ–रात्रीं आठला या–अगदीं नक्की देतो. नक्की हं!'

हिरमुसला चेहरा करून रघुनाथ घराकडे यायला निघाला. वाढदिवसाच्या दिवशीं दुपारीं माळ घेऊन घरीं जायचें, आणि जानकीला अगदीं चकित करून सोडायचें त्यानें किती किती दिवसापासून ठरविलें होतें, म्हणून तर महिन्यापूर्वी त्यानें ती माळ करायला दिली होती. पण परवां करायला दिलेल्या रोशनबाईच्या बांगड्या आज तयार होतात. आणि आपण महिन्यापूर्वी दिलेली माळ दहा वायदे होऊन अगदीं शेवटच्या दिवशीं सुद्धां त्याला मिळाली नाहीं याचें त्याला फार दुःख झालें.

जानकी दारांतच त्याची वाट पहात उभी होती. तिचा हंसरा चेहरा पाहून रघुनाथाला आश्चर्य वाटलें. या वाढदिवसांत सुद्धां आपण मोहनला कांहीं केलें नाहीं म्हणून ती आज आपल्याशीं अबोला धरल्याशिवाय रहाणार नाहीं अशी कल्पना करीत तो घरीं आला होता. पण जानकीच्या चेहऱ्यावर चमकणारें तें चांदणें पाहतांच—रघुनाथ तिच्या अंगावरून आंत जाऊं लागला. पण तिनें दार अडवून धरलें होतें लटकाच गंभीरपणा धारण करीत ती म्हणाली, 'तुमची झडती घेतल्याशिवाय आंत सोडणार नाहीं मी तुम्हाला.'

जानकी इतकी बोलकी कधीं झाली हें रघुनाथला कळेना!

'झडती?' त्यानें विचारिलें.

'हो!'

अनुक्रमणिका






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

'कुणाच्या हुकुमावरनं ?' त्या थट्टेंत सामील होत रघुनाथानें प्रश्न केला.

'युवराजांच्या ?'

'मोहननें माझी झडती घ्यायला सांगितलंय ?'

'होय—होय— होय !'

'ती कशाबद्दल ?'

'मोठी चोरी झालीय् आज घरांत.' रघुनाथ तिच्याकडे पाहतच राहिला.

उतूं येणाऱ्या दुधाप्रमाणें गालांतून बाहेर फुटणारें हास्य मोठ्या कष्टानें आवरीत जानकी म्हणाली 'मोहनची सोन्याची माळ नाहींशी झालीय्. ती तुमच्या खिशांत आहे असें एका ज्योतिषीबुवांनीं सांगितलें !'

म्हणून जानकीनें रघुनाथाच्या दोन्हीं खिशाला हात घातले. खूप वेळ तिनें शोध शोध शोधलें. पण तिच्या हाताला कांहीं केल्या माळ लागली नाहीं.

डाव आपल्यावर उलटला असें वाटून ती रुसल्या स्वरांत म्हणाली, 'म्हणे बायका लबाड असतात.मी म्हणतें पुरूष सात लबाड असतात. कुठें आहे ती माळ ? दाखवा ना. असं काय बरं ? दाखवा ना ? नाहींतर जेवायला मिळणार नाहीं !' रघुनाथनें कुतुहलानें विचारलें, "पण मी माळ घेऊन येणार आहे असें कोणीं सांगितलें तुला ?"

'तुमच्या कोटानं !'

आतां रघुनाथाच्या लक्षांत आलें—सकाळीं दिलेल्या मळक्या कोटात सराफाची चिठ्ठी होती. तिच्यांत माळ वाढदिवसाच्या दिवशीं दुपारीं देतों असें त्यानें लिहिलें होतें.

जानकीची निराशा करायचें रघुनाथाच्या जिवावर आलें. पण—आंबट दहीं खाण्याकरितां त्यांत थोडी साखर घातली पाहिजे असा विचार करून कृत्रिम हास्य करीत म्हणाला, "माळ रात्रीं आठला मिळणार आहे ग ! आपली जुनीं म्हणच आहे बघ ! सोनार, शिंपी, कुलकर्णी अप्पा यांची संगत,"—

'घर रे बाप्पा' जानकीनें त्याचे शब्द पुरे केले.

लगबगीनें आंत जात जात ती म्हणाली, 'किती उशीर झाला हें ठाऊक आहे कां तुम्हांला ? मोहन निजला सुद्धां.' तुमच्या पोटांत कावळे ओरडत होते. तें मला ऐकूं आलं आणि तुमचं मात्र काव्यगायन चाललं होतं—सोनार, शिंपी, कुलकर्णी अप्पा—आतां जानकीबाई कुलकर्ण्यांनीं कुलकर्ण्यांची संगत कशी सोडायची तें जेवून सांगा मला !'

× × ×

मिनिट कांटा जसजसा आठाकडे जाऊं लागला तसतसें रघुनाथाचें लक्ष हिशेबाच्या वह्यावरून उडुं लागलें. समोरच्या वह्यांतल्या आंकड्याच्या जागीं त्याला एका सुंदर माळेचे नाजूक दुवे दिसूं लागेल. बसल्या जागीं त्यानें खुप चुळबूळ करून पाहिली पण समोर हिशेब चाळीत बसलेले शेटजी अगदीं तपश्चर्येला बसलेल्या विश्वामित्राप्रमाणें भासत होतें. आतांच्या त्यांच्या बोलण्यावरून आणखी दोन तास तरी ते उठणार नाहींत असा रंग दिसत होता.

काय करावें ते रघुनाथाला कळेना, सराफानें आठ वाजतां बोलावलेले, घरीं जानकी एकसारखी मोहनला म्हणत असेल, 'त्यांना आल्याबरोबर गोड गोड पापा दे हां; तुझ्या गळ्यांत घालायला छान छान माळ घेऊन येणार आहेत ते !' सराफाचें दुकान बंद झाल्यावर शेटजी उठले तर,—छे ! दुपारीं जानकीचा एकदां विरस झालाच आहे. आतां तो पुन्हां करावयाचा ? तिचा पहिला वहिला हट्ट आहे हा ! आज मोहनचा वाढदिवस ! आज माळ मिळाली तर तिला जो आनंद होईल तो कांहीं उद्यां तो मिळून—वराती मागून येणाऱ्या घोड्याचें कधीं कोणाला कौतुक वाटलें आहे कां ?

थोड वेळ बाहेर जाऊन यावयाची परवानगी शेटजीपाशीं मागावयची असा रघुनाथानें मनांत निश्चय केला. पण शेटजींच्या कपळावरच्या आंठ्या पहातांच तोंडातून एक शब्दही बाहेर पडला नाहीं. इतक्यांत जिन्याच्या दारांत कोणाची तरी सावली पडली. रघुनाथानें निरखून पाहिलें. रोशनबाईच्या घरचा गडी होता तो !

तो पुढें येऊन शेटजींना म्हणाला 'बाईसाहेबांनीं बिगिबिगी बोलावलंयू अपनास्नी !'

'डोकंबिकं दुखतंय कां रे ?' शेटजींनीं चिंताक्रांत स्वरानें प्रश्न केला.

तो हंसत म्हणाला, 'नव्या बांगड्यी दाखविणार आहेत त्या साहेबास्नी! नि कुठला नवा शिनेमा लागलाय् त्याच्या धाच्या खेळाला-

शेटजींनी तत्काल वह्या दूर सारल्या. ते कवि नव्हते. कनक आणि कामिनी यांत कामिनीच्या मात्रा आहेत असें त्यांना कुणीं सांगितलें असतें तर त्यांना त्याचा अर्थ सुद्धां कळला नसता. पण कामिनीची मात्रा कनकावर चालते याचा अनुभव मात्र ते अलिकडे नित्य घेत होते.

शेटजी निघून जातांच आपल्या छातीवरला भला मोठा दगड कुणी तरी दयाळू माणसानें दूर केला असें रघुनाथाला वाटलें. लहानपणीं त्याचें वडील देवळांत पुराण सांगतांना गजेंद्रमोक्षाची कथा मोठी रंगवून सोडीत असत. रघुनाथाला ती फार आवडे. पण त्या गोष्टींतल्या गजेंद्राच्या साहाय्याला विष्णु धांवून आल्यावर तो किती आनंदित झाला असेल याची खरीखुरी कल्पना त्याला आजच आली. त्यानें रोशनबाईचें मनांत पुनः पुन्हां आभार मानलें.

शेटजी दुकानांतून बाहेर पडतात न पडतात तोंच रघुनाथही जाऊं लागलेला पाहून म्हाताऱ्या कारकुनांनीं चष्मा दोन तीन वेळां खालीं वर करीत विचारलें 'काय राव ? इतक्यांत घरीं चाललांत ?'

'थोडं जरूरीच काम आहे पंत. पांच मिनिटात परत येतों.'

श्रावणांतल्या आभाळाप्रमाणें दैव लहरी असतें हें रघुनाथाला आतां पटलें. सकाळीं साऱ्याच गोष्टी त्याच्या मनाविरुद्ध घडत गेल्या. पण आतां—आतां दैव त्याला अनुकूल झालें होतें. विश्वामित्राप्रमाणें तपश्चर्येची बैठक घालून बसलेल्या शेटजींना त्यांच्या मेनकेनें कसें वेळेवर पळविलें ! सराफाच्या घड्याळाला पुरोगामी होण्याचा हुक्की आली नाहीं. आणि सर्वांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे सराफांनीं पुढचा वायदा केला नाहीं ! दहा पंधरा मिनिटेंच काय ती त्याची तिथें खोटी झाली.

विजेच्या प्रकाशांत चकचकणारी ती नाजुक माळ हातांत घेतांना रघुनाथाचें हृदय

अनुक्रमणिका






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




आनंदानें कंपित झालें. माळेच्या पाठोपाठ बिल त्याच्या हातांत पडलें. त्यानें खालच्या आंकड्याकडे पाहिलें–एकशें सदतीस रुपये आठ आणे!

तो चमकला–लगेच त्याला हसूं आलें. सकाळीं शेटजींनीं रोशनबाईच्या भावाला भेट म्हणून दिलेल्या आंब्यांच्या करंड्यांची किंमत बरोबर एवढीच होती. या योगायोगाचें त्याला क्षणभर नवल वाटलें. लगेच बिलाची रकम चुकती करून तो आपल्या दुकानाकडे जायला निघाला.

त्याचा उजवा हात एकसारखा लाल पातळ कागदांत गुंडाळलेल्या खिशांतला त्या माळेशीं चाळा करीत होता. एखादें नवें खेळणें मिळालेल्या लहान मुलासारखी त्याची स्थिती झाली. नऊ वाजतां दुकान बंद होणार, मग आपण घरीं जाणार! छे, छे, छें! आणखी तब्बल एक तास जानकीपासून हा आनंद लपवून ठेवायचा! हेंच का आपलें तिच्यावरचें प्रेम! कुठें कुणाच्या बारशाचा एखादा पेढा मिळाला तर त्याचा अर्धा भाग ती आपल्यासाठीं किती आठवणीनें जपून ठेवते! आणि आपण मात्र?

रघुनाथ लगबगीनें दुकानांत शिरला आणि म्हातारे बुवांना म्हणाला 'पंत, मी जरा घरीं जातों. नऊ वाजतां दुकान बंद करून तुम्हीं चला!'

पंतांनीं डोळे विस्फारून त्याच्याकडे पाहिलें. 'आज कांहींतरी विशेष दिसतंय!' असेंच त्यांची ती विचित्र दृष्टी म्हणत होती. पण त्यांच्याकडे लक्ष द्यायला रघुनाथाला फुरसत होती कुठें!

रस्त्यावर येतांच त्याला वाटलें, आपण धांवत सुटलों तर घरीं लवकर पोचूं. लगेच आपण किती वेडे आहोंत हा विचार त्याच्या मनांत आला. रात्रीच्या वेळीं आपण रस्त्यानें धांवत सुटलों तर आपल्याला चोर समजून पोलीस मात्र मागें लागायचे आणि—

लगबगीनें चालतां चालतां तो एकदम थांबला. आपल्या मागून कुणीतरी धांवत येत आहे असें त्याला वाटलें. खिशांतली माळ खिशांतच हातानें घट्ट धरून तो झपझप पुढें आला. गांधींच्या पुतळ्यावरचा उघडझाप करणारा विद्युद्दीप त्याला स्पष्ट दिसूं लागला. त्याचा जीव खालीं पडला. अगदीं पुतळ्यापुढें येऊन त्यानें मागें वळून पाहिलें. आपल्या मागून धांवत येणारी व्यक्ति पाहून तो स्तंभितच झाला. सीताराम होता तो! एवढ्या अपरात्रीं—

किंचित् पुढें होऊन जवळ आलेल्या सीतारामला त्यानें विचारलें, 'काय रे सीताराम?' सीतारामाच्या तोंडून शब्दाऐवजीं एक अस्फुट हुंदका बाहेर पडला. लगेच त्याच्या डोळ्यांत पाणी उभें राहिलें.

काल या ठिकाणीं ज्या सीतारामाच्या गळ्यांत देशभक्त पाहुण्यांनीं आपल्या गळ्यांतला हार घातला होता, त्याच्यावर आज तिथेंच अश्रु गाळण्याची पाळी यावी!• रघुनाथाला कांहीं केल्या हें कोडें उलगडेना. सीतारामाच्या पाठीवरून हात फिरवीत तो म्हणाला, 'सांग




# NATIONAL LEADERS

## ARTISTIC PICTURES OF NATIONAL LEADERS

Exclusive and ideal designs–suitable & favourite subjects–CHARMING COLOURS-Printed on superior & Thick Chromo Paper in Multi-Colours
Size : 15" x 12"

: SUBJECTS :

1, Quit India. 2, Our heroes 1942–Subhas Bose, Jai Prakash, Aruna Asafali, Achyut Patwardhan, Ram Manohar Lohiya. 3. 13 Top National Leaders with Gandhiji 4, Netaij Subhash Ch. Bose with his I. N. A. Commanders 5. Provincial Premiers with Mahatmaji & Rashtrapati Jawaharlal Nehru 6. Capt. Lakshmi Saluting National Flag. 7. All India Congress Committee Members.

NATIONAL ART GALLERY

*Selling Agents* : Calendar Manufacturing Co. 62/66 Medows St. Post Box 478, Bombay.

## THE INDIAN
READERS' DIGEST

The only Journal of its kind in India.
Pt. Jawaharlal Nehru says:– "I Like it".
Shri SUBHAS CHANDRA BOSE Says:–
"Such a publication is badly needed in the country."
ARTICLES OF LASTING INTEREST
Annual Subscription Rs. 5/–Per Year Post Paid.







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

काय झालंय तें सांग ? खेड्यावर असलेली तुझी आई आजारी आहे ? सीतारामानें नकारार्थी मान हलविली.

'तुझ्या धाकट्या भावंडांपैकीं कुणी—'

'अं हं !'

'मग—'

दुःखाचा आवेग आंवरून सीतारामानें अडखळत अडखळत आपली कहाणी रघुनाथाला सांगितली. त्याचा बाप गतवर्षीच वारला होता. त्यानें काढलेल्या कर्जाचें व्याजसुद्धां पोंचतें न झाल्यामुळें सावकारानें घरावर जप्ती आणण्याचा हुकूम मिळविला होता. चार कच्चींबच्चीं घेऊन रस्त्यावर बसायची पाळी आलेल्या त्याच्या आईनें थोरल्या मुलाला ही सारी हकीकत कळविली होती.

सीताराम दीनवाण्या मुद्रेनें म्हणाला, 'भाऊ या संकटांत तुमच्या शिवाय—'

रघुनाथानें समोरच्या पुतळयाकडे पाहिलें. दिव्याच्या प्रकाशांत गांधी हंसत असलेले दिसत होते. त्यानें सीतारामाला विचारलें, 'देणं किती आहे ?' 'एकशें सदतीस रुपये आठ आणे' एवढें शब्द उच्चारून सीताराम आशाळभूत मुद्रेनें रघुनाथाकडे पाहूं लागला.

रघुनाथ दचकला. पुन्हां तोच आंकडा ! त्यानें समोरच्या पुतळयाकडे पाहिलें.: दिवा मिटला होता. गांधीचा चेहरा अगदीं निस्तेज दिसत होता.

एकशें सदतीस रुपये आठ आणे ! आपल्या खिशांतली माळ सीतारामाला देऊन टाकली तर लगेच माळेची वाट बघत दारांत उभ्या असलेल्या जानकीची मूर्ति त्याच्या डोळ्यापुढें उभी राहिली. त्यानें आपल्या मनाची समजूत घातली ही माळ मोहनची आहे, ती सीतारामाला देण्याचा आपल्याला काय हक्क आहे ? एक प्रकारची चोरीच होईल. ती !

विद्युद्दीपांच्या पापण्यांची उघडझांप एकसारखी सुरू होती. दिव्याचा प्रकाश पडला कीं चौकांत दोन माणसें आणि एक पुतळा उभा आहे असें वाटें. तो मिटला कीं त्या चौकांत तीन पुतळेच उभे आहेत असा भास होई.

घड्याळें चारच मिनिटें पुढें गेलीं असतील. पण हा काळ त्या दोघांना चार युगांसारखा वाटला. शेवटीं कांहींतरी बोललें पाहिजे म्हणून रघुनाथ म्हणाला, 'काय करायचं ठरवले आहेस तूं ?'

घोगऱ्या आवाजानें सिताराम उत्तरला, काय करणार ? दरमहा एक रुपयाची हिंमत मुखानं मदत करणारा देव या गावांत नव्हा एकच भेटला. मोठे मोठे लोक तोंडावर रुपया फेकतात तो कपाळाला आंठ्या घालून, रस्त्यांतल्या कुत्र्याच्या अंगावर शिळया भाकरीचा तुकडा टाकावा ना—' लगेच आपण फार बोलतोय् असें वाटून तो म्हणाला 'शाळा सोडून देहू रोडला नोकरी धरायची नी हें कर्ज फेडायचं असं ठरविलं आहे मी !'

सीतारामानें हे शेवटचे शब्द शांतपणानें उच्चारले. आपल्यावर प्रेम करणाऱ्या या सज्जन मनुष्याला आपल्या हृदयाची जखम दाखवून विनाकारण दुःख कां द्या असा विचार आतां त्याच्या मनांत प्रबळ झाला होता. पण जखमेचें दुःख कुणी तोंडानें सांगितलें नाहीं म्हणून तिच्यांतून वाहणारें रक्त दुसऱ्याला दिसत नाहीं असें थोडेंच आहे. या वेळींही तसेंच झालें. सीतारामाच्या डोळयांतून टपटप अश्रुबिंदू गळूं लागले. तो घुसमटलेल्या स्वरानें म्हणाला, 'माझं मॅट्रिकचं वर्ष आहे हें भाऊ, चांगला अभ्यास करावा म्हणून सुट्टींत आईकडे सुद्धां गेलों नाहीं मी !' त्याच्यानें पुढें बोलवेना, तोंड फिरवून तो आपले अश्रु पुसूं लागला.

'माझं मॅट्रिकचं वर्ष आहे हें भाऊ !' या त्याच्या शब्दांनीं रघुनाथाच्या मनांत प्रचंड वादळ निर्माण केलें. त्या वादळांतल्या लाटांवर वाहत वाहत तो दहा वर्षें मागे गेला. मॅट्रिकच्या वर्गांत असलेला एक गरीब पुराणिकाचा मुलगा त्याला दिसूं लागला. फार हुषार होता तो ! त्याचं संस्कृत तर अप्रतिम होतें ! काव्याची केवढी आवड होती त्याला. पुढें हा संस्कृतचा प्रोफेसर होणार असें त्याचे सारे शिक्षक नि सोबती म्हणत असत. पण त्याच वर्षी त्याचे वडील अथानें अंथरुणाला खिळले. नाइलाजानें त्याला शाळा सोडावी लागली. पुढें दोन वर्षांनीं वडील वारले. पण पुन्हां कांहीं केल्या त्याला मॅट्रिकचा अभ्यास करतां आला नाहीं. संस्कृतचा प्रोफेसर होणारा तो विद्यार्थी एका कापड दुकानांतला कारकून होऊन—–




"एक लाखांत किती शून्यं असतात हो ?"

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

रघुनाथानें निरखून पाहिलें. त्याच्यासमोर हरिजन सिताराम उभा नव्हता. दहा वर्षांपूर्वीचा ब्राह्मण रघुनाथ त्याला तिथें दिसत होता. त्याला त्या रघुनाथाचे शब्द ऐकूं आले. 'रात्रींच्या बाराच्या गाडीनं देहू रोडला जातों मी भाऊ! तुमचे उपकार—'

रघुनाथ निश्चल दृष्टीनें समोरच्या पुतळ्याकडे पाहात होता. कालचें सारें परिणामकारक दृश्य त्याच्यापुढें उभें राहिलें. शेटजींनीं सीतारामाला आपल्याजवळ जेथें बसवून घेतलें होतें त्या जागेवर त्याचे डोळे खिळले. अंधारांत चंद्रोदय व्हावा तसें त्याला वाटलें तो उल्लसित स्वरानें सीतारामाला म्हणाला, 'सीताराम, देव गरिबांचा पाठीराखा असतो. तो कुणाच्याही मनीं मुखीं उभा राहील. शाळा सोडायचा प्रसंग तो तुझ्यावर येऊं देणार नाहीं. तूं तासाभरानं माझ्या घरीं ये. तोपर्यंत—

दिव्याची काजळी कुणीतरी झाडावी तशी सितारामाच्या चेहऱ्यावरची काळजी नाहीशी झाली. रघुनाथानें पुतळयाकडे पाहिलें. विद्युद्दीपाच्या प्रकाशांत गांधीजी हंसत होते.

●

रोशनच्या बंगल्यांत रघुनाथाच्या तात्काळ प्रवेश मिळाला. पण 'मला शेटजींना भेटायचंय्' असें जेव्हां त्यानें सांगितलें तेव्हां मात्र सारे नोकर बुचकळ्यांत पडले. शेटजी आणि रोशनबाई यांच्या एकांताचा भंग करण्याची छाती त्यांच्यापैकीं कुणालाही नव्हती. बोलल्याशिवाय गती नाहीं असें पाहून रघुनाथ म्हणाला, 'दुकानाचं अगदीं जरुरीचं काम आहे. शेटजींची नि माझी गांठ पडली नाहीं तर मोठं नुकसान होईल, नि मग शेटजी तुम्हांला—

रघुनाथाचें हें बोलणं ऐकतांच एका नोकरानें पुढें जाण्याचा धीर केला. थोड्याच वेळांत रघुनाथाला शेटजींकडून बोलावणें आलें.

शेटजी आपल्या रंगमहालांत नक्षीदार पलंगावर बसले होते. रघुनाथानें खोलींत पाऊल टाकतांच त्याच्या दृष्टीला पलंगाची सुंदर मच्छरदाणी पडली. सत्रा ठिगळें जोडलेली आपली मच्छरदाणी आठवून त्याला कसेसेंच झालें. रोशन शेटजींना विडा करून देण्यांत दंग होऊन गेली होती. तिच्या अंगावरलें ते गोल फिक्कट गुलाबी जरीचें पातळ —जानकीला साधें गुलाबी पातळ घेण्याकरतां रघुनाथ गेलीं दोन वर्षें धडपडला होता! पण —नवऱ्याचें बायकोबरोबर कितीहि प्रेम असलें तरी त्याला बाजारांत हवीं तीं पातळें मिळतात असें थोडेंच आहे.

रोशननें शेटजींच्या तोंडांत विडा घातला. आणि ती रघुनाथाकडे वळली. तिच्या डाव्या हातांतल्या त्या नव्या बांगड्या—आठ नर्तकीच होत्या त्या! खुर्चीकडे बोट दाखवित रोशन रघुनाथाला म्हणाली 'बसा ना!'

शेटजींच्या रागीट मुद्रेकडे नजर जातांच रघुनाथाला कांहीं केल्या बसण्याचें धैर्य होईना. पिकदाणींत पिक टाकून शेटजींनीं विचारलें 'काय रे? दुकानाचं कसलं काम निघालंय् आतां? हिशेबाच्या वह्यांतल्या कांहीं बेपत्ता—' शेवटचे शब्द उच्चारतांना शेटजींच्या स्वरांत थोडी कातरता उत्पन्न झाली होती.

'मी—मी—' रघुनाथ चांचरत बोलूं लागला. शेटजी खेंकसले 'नीट बोल ना!'

तपश्चर्येचा भंग झालेला ऋषि जसा संतप्त होतो त्याप्रमाणें कामुक पुरुषाच्या एकांताचा भंग झाला म्हणजे त्याचें डोकें फिरतें—हें आतां कुठें रघुनाथाच्या लक्षांत आलें. पण—आतां त्याला थोडेंच पळून जातां येत होतें?

मोठा धीर करून तो म्हणाला 'कालचा तो हरिजन मुलगा—' 'तो गेला खड्ड्यांत' शेटजींनीं गर्जना केली, 'दुकानाचं काय काम असेल तें सांग नि चालता हो इथून!'

'तसं दुकानाचं कांहीं काम नाहीं शेट! पण—'

'मग—मग—तूं आलास कशाला इथं!' बोलतां बोलतां संतापून शेटजी उभे राहिले 'चोर—लबाड—'

'कालचा तो हरिजन मुलगा मोठ्या संकटांत आहे शेट. त्याला पैसे हवे आहेत. फार नाहीं, फक्त एकशें सदतीस रुपये आठ आणे. तेवढे मिळाले तर त्याच्या जन्माचं कल्याण होईल. नाहीं तर—'

शेटजी चार पावलें पुढें येऊन म्हणाले 'पैसे काय झाडाला लागतात होय?' म्हणे

(पान ७३ वर पाहा)

केश टॉनिक
पांढरे केस काळे होतात, टक्कलावर केस उगवतात, शांत झोप येते, केस वाढतात, दृष्टीही सुधारते, डोके दुखी थांबते, सर्व ऋतूंत लहान थोरांस उत्तम.
मोठी बाटली रु. ३-८-० लहान बाटली रु. २-०-०
रामतीर्थ ब्राह्मी
रजिस्टर्ड.
तेल स्पेशल नं. १
रामतीर्थ योगाश्रम मुंबई नं. ४
सर्वत्र मिळते

: लेखक :

## पु. भा. भावे

स्वतःला काय होत आहे तें बबनला नीटसें कळेना. त्याला झोपावेंसेंहि वाटेना आणि वाचावेंसेंहि वाटेना. मॅट्रिकच्या विद्यार्थ्यांसाठीं नेमलेल्या Prisoner of Zenda कादंबरीच्या संक्षिप्त आवृत्तीतलं पहिलं प्रकरण त्यानं पुन्हा उघडलं आणि "My dear Rose, for a man of spirit opportunities are duties" ह्या वाक्यापाशीं तो जेमतेम येऊन थांबला. लेले मास्तरांनीं वर्गांत ललकारून सांगितलं होतं कीं हें वाक्य महत्त्वाचं आहे.

टेबलावर डस्टर आपटून पेंगणाऱ्या, बेपर्वा आणि आळशी मुलांना शक्त्यनुसार ही गोष्ट पटवून देण्याचा त्यांनीं प्रयत्न केला होता. बबन पेंगणारा आळशी किंवा बेपर्वा नव्हता. यंदा तो पहिल्या श्रेणींत येईल अशी सर्वांची अपेक्षा होती. लेले मास्तरांनीं डस्टर आपटून खडूनें भरलेले हात फुंकण्यापूर्वीच त्यानें त्या वाक्याखालीं लालभडक रेघ मारली आणि बाजूच्या कोऱ्या जागेंत निळ्या अक्षरांनीं द्वाही फिरवली, 'Imp.'! तरीहि आतां त्या वाक्याखालून तो उगाच लाल निळी पेन्सिल फिरवीत होता व 'Imp' हीं धोका सुचविणारीं अक्षरें घोटून काढीत होता. कळ दाबल्यावर कारंजें उडूं लागावें तशी कसली तरी हुरहूर त्याच्या शरीरभर उडत होती. ती हुरहूर दुःख देणारी नव्हती. पण अस्वस्थ करणारी होती. मोराचं पीस हलकेच गालावरून फिरवलं तर माणसाला दुःख होत नाहीं उलट थोडं बहुत शरीर सुखावतं, थोडंसं शरीर शहारतं आणि अस्वस्थ होतं. तसंच काहींसं बबनला वाटत होतं. सहामाही परीक्षा डोक्यावर आली असूनहि त्याचं आज वाचनांत लक्ष लागत नव्हतं. क्रीडांगणावर हुंदडणं झालं असूनहि त्याला आतां निजावसं वाटत नव्हतं आपल्याला कांहींतरी हवं आहे, आपल्याला कांहींतरी मिळत आहे, आपल्याला कांहींतरी मिळणार आहे असं त्याला वाटत होतं. ज्याचा सोळावा वाढदिवस नुकताच झाला आहे आणि जो त्याच सुमारास मॅट्रिकच्या वर्गांत गेला आहे अशा मुलानं ज्याची अपेक्षा करावी तें सर्व वास्तविक नानांनीं बबनला दिलं होतं. अलार्मच्या घड्याळाच्या जोडीला मनगटी घड्याळ, सायकल, बुक ऑफ कॉलेजचें सचित्र भाग, अभ्यासाला पहिल्या मजल्यावर छोटीशी स्वतंत्र खोली, मेज, खुर्ची, कपाट, केंस वाढवून त्यांचा भांग पाडायला आणि कधींकधीं एकटं सिनेमाला जायला परवानगी--सर्व कांहीं!

आणि तरीहि बबनला कसली तरी हुरहूर लागली होती. त्याला कांहींतरी हवंसं वाटत होतं. खूपसा अज्ञात आनंद मिसळलेल्या अस्पष्ट अकारण बेचैनीनें त्याला ग्रासून टाकलं होतं आणि My dear Rose for a man of spirit, opportunities are duties ह्या संदर्भ व स्पष्टीकरणासाठीं येऊं शकणाऱ्या रंगीत वाक्यापाशीं त्याच्या निशाचर वाचनाची गती कुंठित झाली होती. हें असं आजकाल त्याला मधून मधून पुष्कळदां होत असे. हें विचारांचं भरकटणं, ही हुरहूर, हें ज्याचं नांव सांगतां येत नाहीं असं कांहींतरी हवं हें वाटणं!

कदाचित् असं असेल! सिनेमाच्या पहिल्या खेळाला जाऊन आल्यावर मग वाचायला बसल्यामुळें आतां अभ्यासांत आपलं मन लागत नसेल! आणि तो इंग्रजी सिनेमा तरी कसला होता! बापरे! इतके हे इंग्रजी सिनेमे फाजील असतात एकूण! पाश्चिमात्य संस्कृतीच्या चावटपणाविषयीं शाळेंत व्याख्यान देतांना त्या स्वामी ब्रह्मचर्यानंदांनीं जें सांगितलं तें सर्व खरें एकूण! आणि उद्यां नानांनीं सिनेमाविषयीं विचारलं तर त्यांना काय सांगायचं? Prisoner of Zenda हा खेळ आहे असें समजून मी आग्रहानं अभ्यासाच्या मदतीसाठीं सिनेमाला गेलो; पण तिकिट काढल्यावर कालच तो खेळ बदलल्याचं कळलं. आणखी मग Gold diggers of Newyork हें चित्र पाहून मला निरुपायानं परत यावं लागलं, असं नानांना सांगायचं? आणि त्यांनीं सिनेमाची गोष्ट विचारली तर? काय सांगायचं? 'तुकाराम' किंवा 'रामराज्य' सारखाच तो सिनेमा चांगला होता म्हणून सांगायचं? कीं त्या सिनेमात नुसत्या चड्ड्या घातलेल्या बायकांचे नाच, गाणीं आणि चांगले कपडे घातलेल्या मोठ्या मोठ्या पुरुषांनीं बायकांशीं केलेला फाजीलपणा होता असें त्यांना सांगायचं? उद्यां फडके वकिलां-बरोबर स्वतः नानांनींच तो सिनेमा पाहिला तर? आपल्याला ते काय म्हणतील? बापरे! काय त्या बिनकपड्यांनीं नाचणाऱ्या बायकांच्या मांड्या! काय तें त्यांचें डोक्यापर्यंत पाय उचलून खिदळणें! आणखी नेकटाय कॉलरचा सभ्य पोशाख घालणाऱ्यांनीं का कुठें असें त्यांच्या

**१० वें वर्ष!**

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



• • बबनला अगदीं जवळ घेऊन आज वहिनी झोके घेत होती. फुलपांखरानें गुलाबाला बिलगावें तसा बबन वहिनीला बिलगून बसला होता.

कमरेभोंवती हात घालायचे असतात, एवढ्या मोठ्या पुरुषांनीं एवढ्या 'मोठ्या बायकांचे मुके घ्यायचे--फाजीलपणा करायचा! —हॅट्!

'फाजीलपणा' ह्या सर्वमान्य व मर्यादशील शब्दाऐवजीं 'मुके' हा वाईट शब्द मनांतल्या मनांत तरी उच्चारल्यामुळें बबन दचकला आणि पुस्तकाच्या मलपृष्ठावर स्वतःला नकळत त्यानें आतां जें कांहीं काढून ठेवलें होतें तें पाहून तो आणखीनच दचकला. वाक्याखालीं रेघा मारण्याचें निरुपद्रवी काम सोडून तो मधेच केव्हांतरी मलपृष्ठावर येऊन ठेपला होता, आणि तिथं एका मडमेची अर्धाकृति (Bust) काढून त्या आकृतीखालीं त्यानें ढोबळ अक्षरांत लिहिलं होतं. My dear Rose, for a man of spirit, opportunities are duties. अभ्यासाच्या पुस्तकावर त्यानें काल्पनिक रोझचें चित्र काढलें होतें एवढेंच नव्हे, तर त्या चित्रांत बायकांच्या शरीरांत जे कांहीं फाजील भाग असतात त्यापैकीं कांहींचें उठावानें दिग्दर्शन केलें होते.

अनवधनाच्या गुंगींत आपण जें कांहीं केलें, तें पाहून बबन स्तंभित झाला व डोळे विस्फारुन स्वतःच्या कलाकृतीकडे पाहूं लागला!—छीः! —"ब्रह्मचर्य हेंच जीवन व वीर्यनाश हाच मृत्यु" हें पुस्तक वाचून हाच फायदा आपण घेतला का? न चुकतां प्रत्येक परीक्षेंत पहिला क्रमांक ठेवणाऱ्या व सद्वर्तनाविषयीं पारितोषिक मिळविणाऱ्या मुलाला शोभेल असें हें कृत्य झालें काय? चांगल्या मुलाला समजेल असें हें काम नव्हे! छीः—छीः! भय्या टोणगेला शोभेल अशी ही गोष्ट आहे. आपल्या गलेलठ्ठ देहानें आणि दाढीमिशांनीं नवाशिक्या मास्तरांना दिपवावें, प्रत्येक वर्गांत नापास व्हावें, अभ्यासाच्या पुस्तकावर मुलींचीं

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

चित्रें काढून विद्यादेवीचा अपमान करावा, बिनदाढी मिशांच्या कोंवळया मुलांना "पोरगी–पोरगी" म्हणून खिजवावें, हेडमास्तरांच्या मोठ्या मुलीविषयीं फिदीफिदी करून बोलावें व भिंती रंगवाव्यात, हीं त्याला शोभणारी कामें झालीं; आपल्याला नव्हत. नाना किंवा आईनीं आपण पुस्तकावर काढलेले हें मडमेचें चित्र पाहिले तर !

नुसत्या कल्पनेनें बबन संकोचला, बावरला व खुर्ची बाजूस सारून भराभर मेजाचे खण शोधूं लागला ! कंपास, रंगाची पेटी, गुंड्या, रामेश्वरचा सुंदर शंख ! छे ! कांहीं केल्या त्याला रबर सांपडेना. चॉकोलेट, पाकवलेले बदाम–पण रबराचें नांव नाहीं. त्या घाईंतहि थोड्या अनिश्चितीनंतर त्यानें पाकवलेला बदाम तोंडांत टाकला, बाकीचे खिशांत कोंबले, विजेचा पांढरा दिवा मालवून निळा लावला, व नाना आणि आई खरंच निजली की जागी आहेत तें पाहण्यासाठीं चोर-पावलांनीं खालच्या मजल्याची एक चक्कर मारली. परमेश्वराला धन्य-वाद ! नाना आणि आई तर निजलेली होती, पण पाहुण्यांच्या खोलींतहि अंधार होता. आज सकाळीं आलेले ते तरुण पाहुणे आणि त्यांची पोरसवदा बायकोहि झोंपी गेली होती.

रबरासाठीं पुन: बबननें मेजाचे खण उलथेपालथे केले. शिवाजीचें चित्र, कंगवा, सोळाव्या वाढदिवसानिमित्त मामांनीं दिलेली झरणी, पण रबर मात्र नाहीं ! हताश होऊन बबननें 'Prisoner of Zenda'च्या मलपृष्ठाकडे पाहिलें. त्यानेंच लाल निळया पेन्सिलीनें उत्पन्न केलेलें त्या मडमेचें भूत त्याला वेडावत होतें. काय करावें ? समजा, आपल्याला झोंप लागली आणि आपण झोंपेंत असतांच सकाळीं नाना "अरे बबऽन" म्हणून आपल्या दणाणणाऱ्या आवाजानें आरोळी देत खोलींत शिरलें तर–? "नव्या रिस्टला अलार्म नाहीं म्हणून उठला नाहींस होय ?" असें खो खो हंसून म्हणत त्यांनीं आपलें हें पुस्तक आणि त्यांत रंगविलेलें चित्र पाहिलें तर ? नानांना आपल्याविषयीं कौतुक आहे. आपल्यावरील शिस्तीचीं बंधनें त्यांनीं हळुहळु सैल करीत आणलीं आहेत. त्यांना ही मडम दिसली तर ? पाल अंगावर पडल्याप्रमाणें ह्या विचारानें बबन बावरला; व तें पान सबंधच्या सबंध टरकावून तो गच्चीवर गेला. आपल्या पुस्तकांना शिकाऊ चित्रकलेचा मोफत आखाडा बनविणाऱ्या टोणग्याच्या जातीचा बबन नव्हता. नव्या पुस्तकांना वेष्टनें घालण्याचें काम तो प्रथम करीत असे. पण त्याला कांहीं उपाय नव्हता. ती मडम कुणालाच दिसून उपयोगाचें नव्हतें. त्या कागदाच्या चिंध्या गच्चीवरून बागेंत फेंकणें एवढाच आतां मार्ग उरला होता.

●

नागपूर शहराचा तो सुखवस्तू विभाग केव्हांच शांत झाला होता. परस्परांना काटकोण करणाऱ्या त्या धंतोलीच्या सारीपाटासारख्या छोट्या छोट्या रस्त्यावर उजेड टाकीत विजेचे दिवे आतां एकुटेच उभे होते. "रोटी खाना बाई ऽ ऽ" म्हणून विव्हळत आरोळी मारणारा अखेरचा भिकारी आपली चक्कर संपवून मार्गस्थ झाला होता. निःस्तब्धतेची त्या वस्तीवर केव्हांपासून पडलेली दुशाल दुरून गेलेल्या टांगेवाल्याच्या "हाईक्–हाईक्" ह्या शब्दानें व कांहीं पादचाऱ्यांच्या बोलण्यानें मध्यें थोडीशी हलली व पुनः सर्वत्र शांत झालें. सिनेमाच्या दुसऱ्या खेळाला गेलेले लोक घरीं परतूनहि आतां थोडा वेळ झाला होता. आधींच ओल्याचिंब झालेल्या भुईवर पावसाची एक धांवती सर पडून गेल्यामुळें रस्त्यावर ताबडतोब पाण्याची थारोळीं जमली व त्यांत दिव्यांची प्रतिबिंबें हलूं लागलीं. बागेंतल्या पानांवर व फुलांवर पाण्याचे थेंब जमले. जाईजुईच्या मांडवांवरून ओल्या सुवासाचा झोत आला. मधून मधून चेहरा दाखवीत रस्त्यानें झपझप जाणाऱ्या अवगुंठनातल्या सुंदर स्त्रीप्रमाणें, विरळ ढगांतून वारंवार तोंड काढीत बावरलेला चंद्र घाईघाईनें आकाशाचा मार्ग आक्रमूं लागला. जणुं पुनः मिट्ट अंधार पडून वर्षाव सुरू होण्यापूर्वीच त्याला घरीं पोंचायचं होतं.

ह्या सर्व देखाव्याचा व वातावरणाचा बबनच्या बुद्धीला जाणता बोध कुठपर्यंत झाला कोण जाणें. पण त्याच्या शारीरिक व मानसिक वृत्तीवर अवश्य परिणाम झाला. झोंप नावाची वस्तूहि जगांत असेल असे त्याला वाटेना. त्याची हुरहूर अधिकच वाढली आणि हलक्या हातांनीं केलेल्या गुदगुल्याइतपत दुखविणाऱ्या आणि सुखविणाऱ्या आनंदाच्या अपेक्षेनें तो अधिकच बेचैन झाला. अंगांतून वेगानें वाहणाऱ्या चेतनेला वाट करून देण्यासाठीं त्यानें हातांतला कागद जोरजोरानें फाडून त्याच्या चिंध्या चिंध्या केल्या व सुरूं असलेल्या वाऱ्याच्या प्रवाहांत त्या तळहातावरून झोकून दिल्या. सावरीचें बोंड फुटून चहुंकडे म्हाताऱ्या पसराव्यात किंवा फुलपांखरांच्या थव्यानें अकस्मात् पंख पसरून वाऱ्यावर झुलावें, तसे ते कागदाचे कपटे हेलकावे घेत हवेवर उडूं लागले. कांहीं खालीं बागेंत पडले, कांहीं जाईच्या मांडवावर गेले, कांहींनीं रस्त्यावरील विजेच्या दिव्याभोंवतीं शेकड्यांनीं घोंगावणाऱ्या कीटकांना क्षणभर घाबरवून सोडले, व कांहींनीं बबनच्या बंगलीची बाग, मधला छोटा रस्ता व समोरच्या बंगलीची बाग पार करून वहिनींच्या माडीची दिशा धरली. त्या अस्वस्थ अवस्थेंतहि बबन खिशांतले पाकवलेले बदाम विसरलेला नव्हता. दोनचार बदाम एकदम तोंडांत टाकून रवंथ करीत तो वहिनींच्या गच्चीजवळ डुलणाऱ्या कागदाच्या अखेरच्या भाग्यवान् कपट्यांकडे सॉक्रोटिसाच्या प्रश्नार्थक तंद्रीनें पाहात असतांच पायापासून डोक्यापर्यंत गरम वाफेचे लोट उसळल्याचा अनुभव त्याला आला.

—वहीनींच्या माडींतले दिवे एकाएकी लागले व तेथील दारांच्या आणि खिडकीच्या कोळपलेल्या अपारदर्शक कांचा (Ground glass) अकस्मात् सतेज झाल्या.

—विजेच्या हालचाली करीत वहिनींच्या भरीव व डौलदार शरीराची रेखीव छायाकृती दारावरून व खिडकीवरून सरकत गेली.

—मागोमागच वहिनींच्या खांद्यावर हात देण्याचा प्रयत्न करणारी दादा रानड्यांची उघडी लठ्ठ व ओबडधोबड आकृती होती.

—वहिनींनीं दादांना हात झटक्यानें हिसडला व परत सर्वत्र अंधार झाला. सतेज कांचीचे अनेक चौकोनी डोळे एकदम मिटले.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

बबन "आ" वासून पाहातच राहिला. तिकडे तो सांवळ्यांचा सिनेमा आणि इकडे हा सावळ्यांचा सिनेमा! एकूण हें असें आहे तर! इतके कुरूप, लठ्ठ आणि गंधाचा आडवा फरपाटा ओढणारे दादा गनडे वहिनींशीं गुपचुप असा फाजीलपणा करतात एकूण! आणि मुलांना मात्र उपदेश की, लवकर निजावें! आणि ह्यांचे जागे राहून हे धंदे! उगीच नाहीं इतक्या सुंदर असणाऱ्या वहिनी दादांना नेहमीं झणकाऱ्यानें फटकारत! आणि उगीच नाहीं वहिनी आपल्याशीं इतक्या चांगल्या वागत!

वहिनीवरून बबनला टोणगेची आठवण झाली. टोणगे म्हणजे ज्ञानी पुरुष. अभ्यासाच्या पुस्तकाव्यतिरिक्त इतर प्रत्येक विषयांत त्याची गति होती. चित्रकलेला व अक्षरज्ञानाला त्यानें आपल्या परीनें भरपूर राबविलेलें होतें. धंतोलीच्या व शाळेच्या भिंतीवर अर्ध्यापेक्षां अधिक अक्षर-वाङ्मयाचा टोणगे हा जनक होता. टोणगेचें खरें नांव पेंडसे. एकतीसाव्या वर्षींहि मॅट्रिकमध्येंच गोते खाणाऱ्या पेंडसेला पूर्वींच कोणत्या तरी भविष्यवादी व गुणग्राही मास्तरानें टोणगे हे नामाभिधान बहाल केलें होतें. तेव्हांपासून टोणगेचें पेंडसे हें अस्सल उपनांव केवळ कागदोपत्री व उपस्थिती-पुस्तकावरच राहिलें. भय्या टोणगे ह्या उपाधीनेंच नंतर तो गांवभर प्रख्यात झाला. टोणगेच्या कैलासवासी बापाचा बंगला चार घरें टाकून जवळच होता. आईला बिलकुल न जुमानणारा टोणगे हाच तेथें आतां सर्वाधिकारी होता. बबनच्या कांहीं वर्ग पुढें असतांना बबनला अनेक विषयांचें सामान्य ज्ञान देण्यासाठीं टोणगे कधींमधीं बबनकडे येत असे. टोणगेच्या बबनपाशीं कांहीं मागण्याहि असत. टोणगे बबनला फारसा आवडत नसे. पण तो शाळेंतला गुंड होता. शिवाय त्याच्या गोष्टी ऐकण्यांत बबनला पुष्कळदां एकप्रकारचें चोरटें कुतुहल वाटे. प्रथम प्रथम टोणगे जें सांगे तें बबनला बिलकुल खरें वाटत नसे. पण आजकाल त्याच्या बोलण्यांत बरेंच तथ्य असावें, असें बबनला वाटूं लागलें होतें. म्हणजे बबनला कशातलेंच अगदीं कांहीं माहीत नव्हतें अशांतला भाग नाहीं. पण त्या गोष्टी त्याला अस्पष्ट वाटत, दूरच्या वाटत, अविश्वसनीय वाटत, घाणेरड्या वाटत. पण आजकाल त्याचें मत जरासें बदलूं लागलें होतें. आतां हें वहिनींचेंच पहाना! टोणगेनें बबनला कोंदरानें ढोसून पूर्वीं एकदा खासगी स्वरांत सांगितलें होतें, "अरे लेका बबन्या! तो दादा गनड्या कसा लठ्ठ गणपति आहे तें पाहिलंस ना? आणखी ही तुझी वहिनी किती गिरेबाज आहे? कसा आवडणार सांग बघूं तो तिला? उगीच कां ती तुला जवळ घेऊन झोके घेते? पण तूं हा असा विनदाढीमिशांचा पोऱ्या! आमची दे ना लेका तिच्याशीं ओळख करून!"


# धी अमृत ऑईल मिल्स लिमिटेड.

**मिल् ऑफिस**

हे बंदर रोड, शिवरी, मुंबई नं. १५

**टेलिफोन नं. ४०४४५** **तारेचा पत्ता: व्ही पी मिल**

स्वच्छ व शुद्ध तेलें, वनस्पतीजन्य तूप

व धुण्याचे साबण तयार करतात.

**मॅनेजिंग एजन्टस्**

## डहाणूकर ॲण्ड सन्स लिमिटेड

**हेड ऑफिस**

## इंडस्ट्रिअल ॲशुअरन्स बिल्डिंग

चर्चगेट स्ट्रीट, फोर्ट, मुंबई नं. १

**टेलिफोन नं. २०८२५-२६** **तारेचा पत्ता: डिझाईन**







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट







वहिनींविषयीं बबनची कांहींतरी कोमल, शब्दातीत भावना होती. ताई किंवा अक्का ह्यांच्याविषयीं त्याला जें कांहीं वाटत असें, त्यापेक्षां कांहींतरी अगदीं वेगळें आणि चांगलें त्याला वहिनींविषयीं वाटत असे. वहिनींचें आणि बबनच्या आईचें खूप रहस्य होतें. बबनच्या आईनें कधीं मोठा स्वयंपाक करायला घेतला, किंवा त्या पापड, लोणचीं घालायला निघाल्या, कीं सावित्री वहिनी नेहमीं त्यांच्या मदतीला येत. दादा गानडे खांद्यावर छत्री टाकून हपीसांत गेले कीं, वहिनी घरोब्यानें दररोज बबनच्या आईकडे बसायला यायच्या. अक्काताई लग्न होऊन आपापल्या सासरीं गेल्या तेव्हांपासून त्यांच्याच वयाच्या सावित्री वहिनीला बबनच्या आईनें आणखीनच जवळ केलें. त्याच्या वयाच्या बाराव्या वर्षापासून वहिनी बबनला पाहात होत्या आणि त्याचं कौतुक करीत होत्या. "का बबन ?" म्हणून त्यांनीं बबनच्या गालावर टिचकी मारली नाहीं किंवा त्याचा लाडानें गालगुच्चा घेतला नाहीं, असा कधीं एक दिवस गेला नाहीं. आणि त्याच वहिनींविषयीं हा लेकाचा बदमाष टोणग्या डोळे मिचकावून म्हणत होता—" लेका बबन्या ! वहिनी काय अन् टाहिनी काय ! सान्या सारख्याच ! चांगला गोरा भुरका पोरगा पाहिला आणि लागली त्याचे गालगुच्चे घ्यायला ! तूं नुसतां पुस्तकंच वाचत बैस ! पण जरा आमची दे कीं तिच्याशीं ओळख करून ! आमचीहि आई पापड, लोणचीं घालते म्हटलं ! "

बबनला हीं भाषणें ऐकून भयंकर संताप आला. त्यानें आवेशाच्या भरांत टोणगेवर लाथा बुक्यांचा वर्षाव केला. फिदीफिदी हंसत त्या टोणगेनें वरचेवर झेलल्या आणि अर्धवट दटावणीच्या स्वरांत तो म्हणाला, " तुझ्या खोलीवर आलों म्हणून अंगांत आणतोस होय ? बाकी तुझ्या लाथा काय आणि एखाद्या पोरीच्या लाथा काय, सारख्याच ! आत्तां कुठं लेका तुझा कंठ फुटला आहे आणि ओठांवर माणुसकीची झाक उमटूं लागली आहे ! आवर, आवर आपल्या लाथा ! शाळेंत भेटशीलच ना ? याद राख. तुझी चीड 'वहिनी' आहे, हें अशानं सांगून टाकीन सगळ्यांना ! "

ह्या धमकीला बबन घाबरला. आपल्या वहिनींचें पवित्र नांव हा टोणग्या खरोखरच पोरासारांची मालमत्ता करून त्याच्या चिंध्या उडवील ह्या कल्पनेनें त्याचा थरकांप झाला. आणि " बरं, पण मला आमच्या वहिनींविषयीं तूं असं फाजील बोललेलं पुन: चालणार नाहीं. सांगून ठेवतो ! " असें रडकुंडीला आलेल्या स्वरांत म्हणत त्यानें आपल्या लाथा आवरत्या घेतल्या. त्या दिवसापासून वहिनींबरोबर झोंपाळ्यावर बसतांना टोणग तर कुठें आसपास नाहीं ना, हें पाहण्याची बबन काळजी घेई. टोणगेच्या धास्तीमुळेंसुद्धां वहिनींबरोबर झोंपाळ्यावर बसण्याचा आनंद सोडायला मात्र तो मुळींच राजी नव्हता !

बबनच्या बाराव्या वर्षी जेव्हां अठरा वीस वर्षांच्या वहिनी आपल्या थोड्याशा वयस्क नवऱ्याबरोबर समोरच्या बंगलींत राहायला आल्या, तेव्हां त्यांना स्वतःचे गालगुच्चे घेऊं देणें बबनला कमीपणाचें वाटे. एका पुरुषाचे एका बाईनें गालगुच्चे घ्यावेत म्हणजे काय गोष्ट आहे ! पण वहिनींनीं गालगुच्चा घेतल्यामुळें तो जसजसा लाल होई,

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

—दि—

सोशल सर्व्हिस प्रॉव्हिडंट

इन्शुअरन्स कं. लिमिटेड

—: हेड ऑफिस :—

१५१४, मारुती गल्ली, बेळगांव.

कंपनीचीं वैशिष्ट्यें

प्रसिद्ध व वजनदार डायरेक्टर्स

नमुनेदार व काटकसरीची व्यवस्था

हप्त्याचे योग्य दर व पॉलिसी-बाबत योग्य नियम

विमानिधी रु. २३,००० चे वर

एकूण मालमत्ता रु. ३०,००० चे वर

पॉलिसीची उपयुक्तता

(१) प्रिमियर उत्पन्न रु. १७,००० चे वर
(२) नवीन काम रु. १००,००० चे वर
(३) एकूण काम रु. ५००,००० चे वर

गरीब व मध्यमवर्गीयांना प्रॉव्हिडंट विमा हा एकच उपाय आहे. सोशल सर्व्हिस कंपनीची पॉलिसी घेऊन आपणही संकटकाळची तरतूद करा व त्याचप्रमाणें आपल्या मुलांची पॉलिसी घेऊन त्यांच्या उच्च शिक्षणाकडे लक्ष घाला.

Fom & Bay, Poona.



: कवि :

राजा बढे

कटीवरती कळशी–डोईवरती चुंबळ
निघाली ही पाणियाला–चांदण्यांत चंद्रावळ
गोकुळांतलें चांदणें–आले काय भेटायासी
खेळायाला रासलीला–वाळूतल्या चांदण्याशीं
सासुरवाशीण कशी–फसली ग मोहपाशी
तोडिती तरंग असे–यमुनेच्या जलराशी
यावरी नजर तुझी–न्याहाळीत भोवताली
पैलतिरावरी दूर–दिसे कुणाची सावली !
थबकली का धिटाई–वाजे पाचोळा पावलीं
बाई भारीच बोलकी–पायी पैंजणें बांधली
नाहीं गावाला ठावका–ओळखितो वनमाली
सखे नव्या नवतीच्या–पैंजणाच्या चोरचाली
खुणा ठेविल्या फुलांच्या–ठायी ठायी तुझ्यासाठीं
उमटली वाळवंटीं–पाउलें हीं नदीकाठीं !
नीट नेईल सुजात–वाट वाकडी फुलांची
पहा पडे उजळण–अंगीं बांधल्या वीजेची
आंत वीज गुंडाळता–पांघरोनी निळा शेला
ओसंडते तरी तेज–गौरवीत वननीळा
कुंजवनांत एकटी–कटि सोडोनिया–तटी
तरंगते जळावर–तुझी रिकामी घागर
भोतीं धरोनिया फेर–चाले कलयाची केली
तिला पुसती हासून-कुठे चंद्रावळ गेली ?





अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"ARON."

HOUSESERVICE
METERS



: SOLE AGENTS :

Electric Cable &
Machinery Co. Ltd.

45,47 Forbes Street
Fort – Bombay

: Gram :
STARTER

: Phone :
22739

तसतशा त्या त्यांचे अधिकच गालगुच्चे घेत. पण बबन स्वतः जसा जसा मोठा होत गेला, तशा तशा वहिनी लहान होत आहेत, असें त्याला वाटत गेलें. वहिनींनीं जातां येतां गालगुच्चा घेतला, तर धडपडून पळून जाण्याचा प्रयत्न आतां तो करीत नसे. वहिनींबरोबर बसून दररोज कांहीं वेळ जोरजोरानें झोके घ्यायची तर त्याला आतां संवय लागली होती. वहिनींच्या शारीरिक लगटीविषयीं पूर्वी त्याला जो एकप्रकारचा राग व त्रास वाटे, तो आतां त्याला वाटेनासा झाला. गोऱ्यापान, नाकांत चमकी घातलेल्या, डौलदार बांध्याच्या आणि इरकली लुगडें नेसणाऱ्या वहिनी आतां त्याला फार आवडत होत्या. कांहीं वर्षांपूर्वी एकाद्या परीची गोष्ट वाचीत असतां त्या परीचा चेहरा वहिनींसारखाच आहे असें त्याला वाटत असे. आजहि एकाद्या राजकन्येची गोष्ट वाचतांना पहातां पहातां वहिनींचाच चेहरा त्याच्या दृष्टीसमोर उभा होई. चार दिवस ताई माई घरीं माहेरवासासाठीं आल्या तरी आतां त्यांचें तो फारसें ऐकत नसे. अगदीं लहानपणीं त्याला वहिनीविषयीं वाटणारा लळा कुठें गेला होता कोण जाणे ! पण आज तो वहिणींचें जेव्हां मुलींच ऐकत नसे, तेव्हां वहिनींचें अगदीं सहज ऐके. आणि ह्या गोष्टीमुळें त्याच्या आईला वहिनीविषयीं अधिकच आपुलकी वाटत असे.

एकदां बबन जाईच्या मांडवावर बसलेल्या चिमण्यांना गच्चीवरून खडे मारत होता. बबनचे दोनचार खडे चिमण्यांना लागण्याऐवजीं मांडवाखालीं फुलें वेचीत असलेल्या वहिनींना लागूं नयेत तिथें लागले. पलीकडे नळाखालीं भांडी विसळणारी काशीबाई मोलकरीण हा प्रकार पाहून तोंडाशीं पदर लावत हंसली. वहिनी लप्लप् करीत आपल्या विजेच्या नागमोडी गतीनें वर आल्या आणि बबनचे दोन्ही गाल कुस्करत म्हणाल्या,

"बबऽऽन !"

"काय वहिनी ?"

"तुझे खडे मला लागले ना !"

"पण मी तुम्हांला नव्हते खडे मारले !"

"आणखी मला खडे मारावे असं तुला वाटलं, तर ते कधीं काशीबाईसमोर नाहीतर आणखी कुणासमोर नको मारत जाऊं ! लोक अशांनीं फाजील म्हणतात."

बबनला हा एक आतां नवाच खेळ सांपडला. केवळ वहिनींना आणि त्याला माहीत असलेलें तें रहस्य होतें. आईला सुद्धां हें माहीत नव्हतें. कुणी आसपास नसलें, कीं वहिनीला बबन खडे मारी, आणि वहिनी ते त्याचे खडे परत करून अखेर त्याचे खूप गालगुच्चे घेत. अलिकडे एक दोनदां त्यानेंहि वहिनींचे गालगुच्चे घेतले होते; आणि तेव्हां फुलून आल्यासारख्या वहिनी लालीलाल झाल्या होत्या. वहिनींच्या आठवणीनें बबनचें हृदय उडूं लागलं. त्याला वाटलें, आडवा रस्ता पार करून आतां वहिनींच्या माडीवर धांवत जावें आणि त्यांना सांगावें, "वहिनी, वहिनी,—मी आलों !"

गच्चीच्या कठड्यावरचें कोपर उचलून खालीं जाण्यासाठीं बबनने जवळपास हालचाल केली. तेवढ्यांत समोरच्या माडींत दिव्याची गुंडी

(पान १२१ वर पहा)






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# ही दिवाळी आणि येतें वर्ष

आमच्या असंख्य आश्रयदात्यांना
सुखसमृद्धीचें जावो !



- शालोपयोगी
- कॉलेजला लागणारीं
- नाटकें
- कादंबऱ्या
- ललित वाङ्मय
- आरोग्य विषयक
- शेतकी विषयक
- व्यापारविषयक
- धार्मिक ग्रंथ इ० इ० साठीं

आमचेकडे आधीं चौकशी करा

## लाखाणी बुक डेपो

रामचंद्र बिल्डिंग,
गिरगांव, मुंबई ४



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# मृत्यूचें दार

: लेखक :

**ना. ग. गोरे**

**तें कसेंहि असो माझें मन आंतल्याआंत रडत होतें. आणि रडतां रडतां असेंहि म्हणत होतें कीं "मृत्यु वाटतो तितका कांहीं भयंकर नाहीं. जीवन व मरण यांच्यांतील सीमारेषा किती सूक्ष्म आहे!"**

येरवडा तुरुंगाचें आंतलें फाटक ओलांडून तुम्ही डाव्या हाताला वळलांत की अंधेरी वार्ड लागतें. त्याच्या समोरच मुख्य तटाच्या भिंतीमध्यें एक लोखंडी फाटकाचें दार आहे. तें कधीं फारसें उघडत नाहीं. गूढ स्वभावी मनुष्याच्या ओठाप्रमाणें त्या दाराचीं कवाडें जवळ जवळ सदैव बंदच असतात. बरोबरच्या वार्डराला तुम्ही जर विचारलेंत की हें फाटक कशाचें तर तो नुसताच अर्थपूर्ण हंसेल किंवा एका शब्दांत उत्तर देईल 'फांशीचें'. जरा पुढें गेले, सुमारे शेदोनशें पावलें म्हणजे एक चारपांच खोल्यांचें अगदीं छोटेसें आवार लागतं. त्याला म्हणतात फाशी गेट. फाशीची शिक्षा झालेले कैदी येथें बंद करण्यांत येतात. फाशी गेट आवारापासून त्या गूढ लोखंडी दारापर्यंतचा प्रवास हाच फाशीची शिक्षा झालेल्या कैद्याचा या जगांतील शेवटचा प्रवास!

१९३० सालीं जुलै महिन्यांत येरवड्यांत प्रथम पाऊल टाकलें तेव्हां त्या मृत्युद्वाराचें प्रथम दर्शन घडलें. संभोग, जन्म व मृत्यु या तिन्हींबद्दल मनुष्याला नेहमींच कुतुहल वाटत असतें. कां तें कोणास ठाऊक. मृत्यूच्या या बंद दारासंबंधीं मला त्यावेळपासून कौतुक वाटत होतें तें परवां परवां पर्यंत. या वर्षाच्या डिसेंबरांत तीं दारें जरा किलकिलीं झालीं. नचिकेताप्रमाणें मृत्युसन्मुख उभा आहे आणि मी त्याच्याशीं संभाषण करीत आहे असा योग आला नाहीं. पण ज्या गूढ आवरणानें मृत्यूचें मुख सदैव अवगुंठित असतें तें अभेद्य आवरण जगूं एक क्षणच दूर सरकलें, आणि मृत्यूचें ओझरतें दर्शन घडण्याचा योग जमून आला. त्याचें असें झालें—

ऑर्थर रोडहून माझी बदली १९४५ च्या शेवटीं शेवटीं येरवडा तुरुंगांत झाली. अंधेरींतल्या सार्‍या पुढच्या खोल्या भरलेल्या होत्या. त्यामुळें मागच्या बराकींत २० नंबरच्या खोलींत मी माझें बिऱ्हाड थाटलें. माझ्या खोलीसमोरच्या अंगणांतून फाशी गेटमध्यें ठेवलेल्या कैद्यांशीं त्यांच्या खोल्यांच्या मागील खिडक्यांतून बोलतां येतें. आम्ही रात्रंदिवस मोकळेच असूं. त्यामुळें जेवणेंखाणें उरकलीं कीं कोणी अंगणांत फेऱ्या मारीत कोणी ग्रह–नक्षत्रें पाहात, कलाशास्त्र–विनोद चाले तर कोणी फांशीवाल्या कैद्याबरोबर बातचीत करीत. गुन्हा कसा केला, गुन्ह्याचीं कारणें काय, अपील केलें कीं नाहीं वगैरे चौकशा चालत. कांहीं उघडच 'चांभार' चौकशा असत, तर कांहीं शिक्षावाल्यांना दिलासा देण्याच्या हेतूनें केलेल्या असत. पण बहुतेक वेळीं असें आढळून येई कीं शेवट पर्यंत फाशीवाले कैदी आशा सोडीत नसत. शेवटच्या घटके पावेतों कोणी ना कोणी तरी येईल आणि मार्कंडेयाच्या गळ्यांतले पाश भगवान् शंकरांनीं जसे प्रत्यक्ष यमराजाला काढून घेण्यास लावले तसा प्रकार आपल्याहि बाबतींत होईल! असेंच बहुतेकांना वाटत असे.

मी येरवड्यास गेलों तेव्हा तेथें तो एक फाशीवाला होता. त्याची फांशींतून वाचण्याची सारी आशा संपलेली होती. ×× संस्थानांत फाशीची व्यवस्था नाहीं म्हणून त्याला येरवड्यास पाठवण्यांत आलें होतें. तेथील राजेसाहेबांनीं दयेचा अर्ज फेटाळून लावला होता. राजान ज्याला मारावयाचें ठरवलें त्याला तारील कोण? फाशीची तारीख ठरली व तुरुंगाधिकाऱ्यानें ती कैद्याला कळवून ठेवली.

फाशीचा दिवस जवळ जवळ येऊं लागला. फाशीवाल्या कैद्याच्या मनांत काय तरंग असतील ते असोत, आमच्या मध्यें मात्र त्या विषयाची चर्चा वारंवार होऊं लागली. रात्रीं दिवेलावणी होऊन तुरुंग बंद झाला आणि आमच्याकडील अधिकारी वर्गाची व शिपायांची रहदारी कमी झाली की एकाच्या खांद्यावर दुसऱ्यानें चढावें आणि फांशीवाल्याची विचारपूस करावी असा शिरस्ताच पडून गेला.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

मी मात्र त्याच्या खोलींत डोकावून पाहिलें नाहीं. कुतुहल नव्हतें असें नव्हे. पण मनाला धीर वाटत नव्हता. मृत्यूच्या पंजांत गवसलेल्याकडे कसें पाहावें, त्याला आपण धीर द्यावा असे विचार मनांत येत. पण माझ्यापेक्षां जे अधिक चौकस होते त्यांच्याकडून माहिती मिळाल्यास मला ती नको होती असेंहि नव्हते. माझ्या मित्रांच्याकडून मला समजलें तें असें कीं—

कैदी एक म्हातारा ब्राह्मण होता. कीर्तनकार होता. कीर्तनकार आणि खुनी! होय. तसा आरोप त्याच्यावर शाबीत झाला होता खरा. कीर्तनकार व त्याचा एक भाऊ कोठल्या तरी गांवीं कीर्तनासाठीं गेले होते. कीर्तन झालें. यजमानाच्याकडे येवून जेवण खाण उरकून मंडळी झोंपी गेली. रात्रीं यजमानाच्या घरांत कोणाचा तरी खून झाला. कीर्तनकार व त्याचा भाऊ हेच गांवामध्यें परके. साहजिकच वहिम त्यांच्यावद्दल आला, अटक झाली. खटला चालला. कीर्तनकार बंधु गरीब. वशोल्यानें गरीब, प्रतिष्ठेनें गरीब. तेच गुन्हेगार ठरले, एका भावाला फांशीची शिक्षा झाली, दुसऱ्याला झाली, अठ्ठावीस वर्षें सक्त मजुरी. सक्त मजुरीची शिक्षा झालेला भाऊ जरा कच्च्या दिलाचा असावा. शिक्षा ऐकतांच त्याची कंबर खचली. त्यानें तेथेंच प्राण सोडला. आणि हा भाऊ ? हा तें मृत्यूचें दार केव्हां उघडतें त्याची वाट पहात होता!

हकीकत ऐकून मला कसेसेंच वाटलें. भीति म्हणा, आत्यंतिक निराशा म्हणा कशाची तरी एक चमक माझ्या सगळ्या अंगांतून निघून गेली. मला वाटलें त्या म्हाताऱ्याच्या मनाची कशी अवस्था झाली असेल. पण माझे मित्र म्हणत की म्हातारा मुळींच घावरलेला नाहीं. देवाच्या तसविरीसमोर हात जोडून बसतो. गीता, श्लोक वगैरे म्हणत असतो. सांगतो कीं 'मी निरपराधी आहे मग मला देवाच्या दरबारांत जाण्याची डर काय म्हणून!' त्याची हिंमत खरेंच मोठी असली पाहिजे, अशा माणसाला पाहावा असें मनांत येई. पण कोणाच्या खांद्यावर उभें राहून पाहाण्याची तयारी होईना.

कैद्याला अखेरीस आपल्या ताब्यांत घेण्यापूर्वी मृत्यूलाहि त्याच्या स्वागताची तयारी करावी लागत असावी. ठरलेल्या तारखेच्या आधीं दोन दिवस सकाळींच ठाकठोकीचे तुतारी आवाज त्या बंद दरवाज्याच्या आंतून कानावर येऊं लागले. उत्सुक मनाला अधिकच चेतना मिळाली. शिपायांच्या पाशीं चौकशा सुरू झाल्या. फाशीच्या तक्त्याच्या फळ्या, चौकट ठाकठीक आहे की नाहीं पाहात आहेत असें कळलें. मग डॉक्टर आले. त्यांच्यापाशीं तोंच बोलणी निघाली. डॉक्टर म्हणाले, मी देखील फाशी गेटालाच गेलों होतों. कैद्याचें वजन, उंची गळ्याचें माप सारें घेऊन आलों.' ही सारी तयारी कशाला ? हे विधि कशासाठीं ? कैद्याला फाशी सुखाची व्हावी म्हणून! ही चेष्टा नव्हे. खरोखरच तकलीफ न होतां कैदी मरावा म्हणून अधिकारी आपल्याकडून सारी खटपट करीत असतात! फासाचा दोर बळकट रहावा म्हणून चौकट व चौकटीचा हूक नीट आहे की नाहीं तें पाहावयाचें, फासाचा दोर तुटूं नये म्हणून तो मनगटासारखा जाड ठेवावयाचा, फासाची सरक गाठ मानेभोवतीं ढिली बसूं नये, श्वासनळ्या बंद व्हाव्या म्हणून मानेचें माप घ्यावयाचें, फास झकटन् बसावा म्हणून दोरीला आदल्या दिवशी लोणी साबण वगैरेंचा प्रसाद चारावयाचा, फळीवरून कैदी सुटला कीं किती हिसका बसेल याचा अंदाज येण्यासाठीं कैद्याची उंची व त्याचें वजन पाहावयाचें, कैद्याच्या मनांत कोणाला शेवटचें भेटावयाचें आपल्या दौलताची निरवा निरव करावयाची असल्यास त्याच्या इच्छेप्रमाणें करण्याची व्यवस्था करावयाची, अशीं अनेक कामें अधिकारी व शिपाई जातीनें करतात का तर कैद्याला स्वस्थता लाभावी म्हणूनच. पण या साऱ्या तयारीवर एक प्रकारची भेसूर छाया पसरलेली असते. फटक्यांची शिक्षा अमलांत आणावयास मिळणार म्हणून आनंदित झालेले जसें कांहीं अधिकारी मी पाहिले आहेत: तसें उद्यां एक जण फाशी जाणार, गंमत पाहावयास मिळणार म्हणून खुशींत आलेले अधिकारीहि पाहिलेले आहेत. पण असे विकृत मनोवृत्तीचे लोक


स्त्रियांच्या औद्योगिक उन्नतीस वाहिलेलें

# कला संग्रह

## दिवाळी पुष्प

- सर्व जातीय स्त्री समाजांत आवडीनें वाचलें जाऊन त्यांत वेगवेगळीं नाविन्ययुक्त डिझाईन असल्यामुळें संग्रहीं ठेवलें जातें.
- मराठी व गुजराथी दोन्हीं भाषेंतून माहिती दिली असून स्त्रियांची औद्योगिक उन्नती करणारें हें एकमेव पुष्प आहे.

आजच मागणी करा.

**महिला कला मंदिर**

–: व्यवस्थापक :–

**कला संग्रह**

लक्ष्मी सदन.
गिरगांव ब्याकरोड.







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

एकंदरींत विरळाच. फाशीच्या शिक्षेची अमलबजावणी अधिकारी करतात ती केवळ यांत्रिक कर्तव्यबुद्धीनेंच. कैद्याला जेवढी सहानुभुति दाखविणें त्यांच्या अधिकरांत शक्य असतें तेवढी सहानुभूति दाखवण्यांत ते कसूर करीत नाहींत.

ही नेहमीची परिस्थिति, या कैद्याच्या बाब-तींत तर त्यांच्या सहानुभूतिविषयीं प्रश्नच नव्हता. म्हातारा निरपराध आहे, न्याय-देवतेच्या आंधळेपणामुळे फासावर जातो आहे अशी सर्वांची ठाम समजूत झालेली. मग सहानुभूतीच्या ओलाव्याला काय कमी! तुरुंगांतला असा एक अलिखित नियम आहे कीं फाशीची शिक्षा पक्की झाल्यानंतर देखील जर आपण निरपराधी आहोंत असेंच कैदी म्हणत असेल तर तें खरें मानावयाचें. मृत्यु निश्चित झाल्यानंतर कोणी खोटें बोलत नसतो असें तेथें मानून चालतात. फाशीच्या क्षणापर्यंत तोंडावरची शांतता चळूं न देणारा विषयीं तर अधिकाऱ्यांना व शिपायांना खासच आदर वाटतो. आणि अगदीं बारीक पाहिलें तर असेंहि दिसून येते की ब्राह्मणा-विषयींचा जो आदरभाव पिढ्यान् पिढ्या अंगीं मुरलेला आहे तो तुरुंगांतील शिपायी प्यांद्यांच्या मनांतून अद्यापिहि पूर्ण नाहींसा झालेला नाहीं. आमचा फाशीवाला वयानें वृद्ध, मनानें शांत, जातीने ब्राह्मण आणि तुरुं-गांतील सामान्य संकेतानुसार निरपराधी. मग सर्वांनाच त्याच्याबद्दल सहानुभूति वाटावी यांत काय आश्चर्य,




त्या दिवशी जरा लवकरच मला जाग आली. माझे बहुतेक सहकारी केव्हांच उठलेले होते. फाशीला आतां तास सव्वा तासाचाच काय तो अवधि होता. हवेंत गारठा नसतांहि मला किंचित् गारठा वाटूं लागला. विनायक ओकानें विचारलें 'पाहाणार का तिकडे डोकावून?' त्याला पाहाण्याची जबरदस्त इच्छा मनांत होती. पण मी तोंडानें मात्र म्हटलें 'नको. काय पाह्यचं त्यांत? तो फाशी-कडे जाईल तेव्हां दिसेलच.' पण एवढें बोलल्यावर देखील 'पण आज त्याची मनःस्थिती कशी काय आहे रे?' असा प्रश्न विनायकला केल्यावांचून मात्र मला राहवलें नाहीं! विनायक म्हणाला, 'मघाशींच आम्ही खिडकींतून त्याच्याशीं बोललों. आंघोळ उरकून घेऊन गीतेच्या पोथीसमोर शांतपणें तो बसला होता. आम्हाला पाहून म्हणाला "मला भीति वाटत नाहीं. मी अपराधी नाहीं. गेली चाळीस पन्नास वर्षें कीर्तन केलें. वेदान्त सांगितला. मरण म्हणजे जुनें वस्त्र फेकून देण्याप्रमाणें आहे असें बोललों. मग आतां भीति कसली?"

मला हें ऐकून आणखीच थिजून गेल्या-प्रमाणें झालें. न्यायासनाहून निराळें असें कांहीं मानवी कृत्याची व मनाची परीक्षा करण्याचें साधन माणसापाशीं असूं नये ही केवढी नामुष्कीची गोष्ट आहे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

मी प्रातर्विधी उरकून आंगणांत जरा येरझाऱ्या घातल्या: इतक्यांत खूपशा बुटांचे वाळूवर फरक् फरक् असे तालबद्ध आवाज ऐकूं आले. आणि आम्ही चार पांच मित्र जागच्या जागीं थबकलों. आमच्या तोंडाचे वरील स्नायु घट्ट झाले व ओठावरील लाली फिकी पडली. न बोलतां आम्ही समजलों. अगदीं खोल एका मनानें दुसऱ्या मनाला म्हटलें 'हें सासरचें मूळ आलं बरं!'

आणि आम्ही भराभरा पावलें उचलीत अंधारीच्या ठेंगण्या तटबंदीकडे धांव घेतली. पायऱ्यावर, कॉटेच्या चौकटीवर, मिळेल त्या आधारावर चढून आम्ही त्या इहलोकापासून मृत्युलोकापर्यंच्या शंभर दोनशें वावांच्या मार्गाची टेहळणी करीत बसलों. मी मृत्यूच्या दरवाज्याच्या अगदीं समोरच उभा होतों. दारासमोर एक हत्यारी शिपाई उभा होता. दोन चार मिनिटें गेलीं. शिपायानें फाशीगेट बराकीच्या दारांकडे लक्ष दिलें आणि चटकन् 'हुश्शार' मध्यें खडा होऊन तो पुटपुटला. 'आले!'

तक्षणीं आमच्या माना पुढे झुकल्या. दहापंधरा शिपाई, सुपरिटेंडंट, जेलर, डॉक्टर व मॅजिस्ट्रेट अशा अधिकाऱ्यांच्या घोळक्यांतून तो म्हातारा येत होता. त्याचे हात मागे बांधलेले होते. डोक्यावर सैलशी एक काळी टोपी होती. संथपणें तो येत होता. त्याच्या दोन्ही बाह्यांना दोन शिपायांनीं धरलें होतें. पण तें केवळ उपचार म्हणून. कारण त्याचे पाय ठाम पडत होते, लडथडत नव्हते. आणि—

पण येथून पुढचें चार दोन क्षणाचें सारें चित्र माझ्या मनावर खोलवर उमटलेलें असलें तरी तें मला स्मरत आहे असें म्हणवत नाही. मनोव्यापार एका अखंड वाहणाऱ्या प्रवाहाप्रमाणें असतात अशी माझी समजूत आहे. प्रवाह त्या चार दोन क्षणांत अजिबात थांबला, गोठला होता की काय असें मला वाटलें असो.

मृत्यूच्या दारापासून पांच दहा पावलावर गेतांच किंचित थांबल्यासारखें करून त्या म्हाताऱ्यानें आमच्याकडे पाहिलें आणि अगदीं खणखणीत आवाजांत तो म्हणाला,

'नमस्कार हो मंडळी! मी चाललों. पण मी निरपराधी आहे बरें! नमस्कार!'

तापलेल्या लाडसाप्रमाणें माझें काळीज भाजीत, जाळीत ते शब्द माझ्या अंतःकरणांत घुसले. एका प्रचंड अपराधांत तें न्यायासन, फाशी देणारे हे अधिकारी, सारा समाज व मी सामील झालों आहोंत व या म्हाताऱ्याची मान कापीत आहोंत अशा भावना माझ्या मनांत भरून राहिली.

माझ्या मनांत ही खळबळ उठते न उठते तों पुन्हां तिकडे म्हाताऱ्यानें एकदां वर पाहिलें न पाहिलेंसें केलें आणि तो दारापर्यंत जाऊन पोचला. एका शिपायाने झटकन् पुढे होऊन डोक्यावरची सैलशी काळी टोपी ओढून गळ्यापर्यंत आणली. तोपर्यंत इतके दिवस घट्ट बसलेलीं त्या दरवाज्याचीं दारें खोलण्यांत आलीं होतीं. उंबरा ओलांडून तीन पायऱ्या चढल्या की मृत्यूच्या मंचकावरच कैदी आला म्हणायचा. लागोलग दोन्ही पाय जुळून राहावे म्हणून दोन्ही पायांत घोट्यापाशी बंद टाकण्यांत आले. तोंवरी डोक्यावर लोंबत असलेला फास गळ्याभोवती सैलसा आणून ठेवण्यांत आलेलाच होता.

आता शेवटचा क्षण. जेलरच्या इशाऱ्याबरोबर पायाखालच्या तक्तापोशीची कवाडें धाड्कन दुभंगून खालच्या खड्यांत कैदी

आजची अभिनयतारका मुमताज शांती म्हणते—

" कॅस्ट्रोलक्स "
हें उत्कृष्ट हेअर टॉनीक असून त्या योगें केंसाची वाढ झपाट्यानें होऊन ते सुंदर दिसतात. शालीमार फेस पावडर नामांकित असून ही दोन्हीं सौंदर्यसाधनें मी नेहमीं वापरते.
मुमताझ शांती

Shalimar FACE POWDER
PERFUMED CASTROLUX
WITH VITAMIN 'F'
FORMULA BY CHEMIST RAMAN
Shalimar PRODUCTS
RB.NO.1398, BOMBAY.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

झोकला गेला. हिसक्या सरसा फास गच्च आवळून मानेचा कणा मोडला व श्वासनालिका चिंबून बंद झाल्या. झालें, संवेदना संपल्या व जीवहि संपलें. हुका पासून ताठ लोंबत असलेला तो सोल एकदा दोनदा किंचित् हालला. निष्प्राण शरीराची ती अखेरची धडपड होती.

ठण् ठण् असें दोन टोले झाले. एक इसम फाशी गेल्याचा तो इषारा आहे. सर्व अधिकारी बाहेर आले. आणि मृत्यूचीं तीं लोखंडी दारें धाडकन् पुन्हा बंद झाली. पण आता तीं किंचित् गूढसें हंसत होतीं की काय असा भास झाला. तें कसेंहि असो माझें मन आंतल्या आंत रडत होतें. आणि रडतां रडतां असेंहि म्हणत होतें की " मृत्यु वाटतो तितका कांही भयंकर नाही. जीवन व मरण यांच्यातील सीमा रेषा किती सूक्ष्म आहे ? "





दिपवालीच्या आनंदांत खरी भर कशाने पडेल?

पवालीच्या आनंदांत खरी भर कशाने पडेल?

अल्पावधींत सर्व हिंदुस्थानभर आपल्या कार्यक्षमतेमुळें लोकप्रिय झालेल्या सुप्रीम म्युच्युअल विमा कंपनीची पॉलिसी अगर एजन्सी घेऊन आपल्या कौटुंबियांना आर्थिक सुस्थिरता व संपन्नता प्राप्त करून दिल्यानेंच तुमच्या आनंदांत खरी भर पडेल !

## दि सुप्रीम म्युच्युअल ॲशुअरन्स कंपनी लिमिटेड, पुणें

**शाखा**

कराची—मॅनेजर मि. प्रीतमदास भगवानदास
नागपूर—मॅनेजर मि. के. एन. सगदेव
हुबळी—मॅनेजर मि. एम. पी. चितळे
खानदेश—मॅनेजर मि. आर. एच. तांबे

**स्पेशल एजन्टस**

पुणें—मे. इंटर नॅशनल कमर्शियल कॉर्पोरेशन
श्री. जी. आर. देशपांडे, श्री. जी. जी. केतकर,
मेसर्स पंडित ॲन्ड को., मि. डी. के. शिकनिस
सोलापूर—सौ. नंदिनीबाई भागवत
बेळगांव—श्री. बा. रा. मोहिरे
अहमदनगर—श्री. एम. आर. बेदारे
लातूर—श्री. टी. एन. फटाले

**चीफ एजन्टस**

मुंबई, ठाणें, रत्नागिरी—मे. वसंत प्रभा आणि कंपनी
बेळगांव व विजापूर—मे. प्रतिभा एजन्सी
सातारा— मे. प्रभा एजन्सी
इंदूर— मे. सुभाष एजन्सी
हैदराबाद-दक्षिण— मे. मंगल एजन्सी
अहमदनगर— मे. अरुणोदय आणि कंपनी
कोल्हापूर— मे. स्वस्तिक एजन्सी

**ऑर्गनायझिंग मॅनेजर**

श्री. एस. आर. केतकर, बी. ए. (ऑनर्स) चिपळूण

मॅनेजर

श्री. व. न. म्हैसूर, एम. ए., एलएल. बी.

हेड ऑफिसः— ८६६, सदाशिव पेठ, पुणें शहर.




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



: कवि :

—ग. दि. माडगूळकर

# कृष्णाकांठीं

मनमुराद खेळुन मुलतानी मातींत
थकव्यास कोंडुनी श्वासासह छातींत
कुणि मल्ल बसावा प्राणायाम करीत
तें संध्याकालिन खेडें त्यासम शांत.

जलपृष्ठीं होतें तरळत बुडतें बिंब
त्या वांकुन बघतीं नदीकांठचे निंब
मळईतून होतीं उतरत करडें चार
अन् एक शिळेवर धुणें धुवकती नार.

ती नार हालली लटकन् कां निमिषांत ?
कावळे उडाले कलकलुनी झाडांत
डोंगऱ्यामागल्या दरींत लपला देव
अन् सळसळले कडुनिंब भरुनियां हींव !

हा, हाय ! गांवच्या निष्पापी हृदयांत
शिरलेच इंग्रजी-साम्राज्याचे दूत !
काढुनी वार हे चार चावडीपाशीं
ते दरडावुनियां पुसती काय कुणाशीं ?

त्या पुसणारांवर डोळे रोखुन शांत
वांकला वृद्धसा, मध्यें उभा खेडूत
सांवळा चेहरा, वरी शिरांचें जाळें
तें शेतकऱ्याचें वृद्ध रूपडें भोळें !

जरबेंत तयाला पुसे कुणी अधिकारी,
" खेड्यांत कुठें या लपले सांग फरारी ?"
त्या मंद प्रकाशीं फुललें इंगळ दोन
चरकल्या संगिनी दृष्टी ती पाहून !

खेडूत वृद्ध तो हंसला मिस्किल शांत
बोलला परंतु किंचित् क्षीण स्वरांत,
" सरकार दिसेना तुमच्या शत डोळ्यांना
तें कसे दिसावे आम्हां म्हाताऱ्यांना !"

सणसणुन उडाली नळकांड्यांतुन गोळी
गगनांस भेदुनी गेली आर्त अरोळी
लोळला क्षणीं तो वृद्ध गडी मातींत
ती वेडर छाती थबथबली रक्तांत !

सत्तांध म्हणे त्या शवास मारुन लाथ,
" होईल स्वच्छ तव दृष्टी, जा स्वर्गांत !"
ते शब्द ऐकूनी लाल जाहली माती
घडविली तियेनें पुढें युगंधर क्रांति !

❀

क्रांतींत पेटुनी उठे चिमुकला गांव
घातले तयानें साम्राज्यावर घाव !
तें कृष्णाकांठीं अजुन 'दुशेरें' बसलें
अन् साम्राज्याची उडत चाललीं छकलें !!


पुरुषोत्तम आणि कंपनी

कोटकरवाडी, मुगभाट लेन, मुंबई ४

मोती टिकाऊ, पाणीदार व खरें कल्चर मोती

मनमोहक सोन्याचे दागिने सौंदर्यासाठीं

सर्व प्रकारचीं मन प्रसन्न करणारीं चांदीचीं भांडीं वगैरे

मालासाठीं विश्वसनीय ठिकाण :—

जुने सोने व चांदीचे दागिनें योग्य भावानें घेऊं.


अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# फॅशन !

सिनेमासृष्टींतून दररोज निरनिराळ्या फॅशनची आयात होते—
सिनेमासृष्टींतील सर्व लोकांचे कपडे विकत घेण्याचें व शिवण्याचें
अगदीं मनपसंत ठिकाणः—



उत्कृष्ट शिलाई—

मनपसंत काम—

पुरुषांसाठीं आकर्षक कोटिंग, शर्टिंग
व सूटिंग—

शिलाई खातें चालू आहे.

**बाबूभाई जगजीवनदास**

**हरकिसनदास हॉस्पीटल समोर, न्यू चर्नीरोड मुंबई.**


अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




'नवयुग' तारका

**स्नेहप्रभा प्रधान**



बी. पी. एस्. प्रोडक्शन्सची नवतारका

**वीना पाल**




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

( पान ५२ वरून )

फार नाहीं, एकशें सदतीस रुपये आठ आणे. फार नाहींत तर तूं जा कीं!'

'हें गांधींचंच काम आहे शेठ. एवढा पुतळा आपण उभारलांत--गांवाला शोभा आणलीत--त्याखर्चांत ही रक्कम कांहीं-' शेटजी संतापून ओरडले 'जीभ लांब करून मला शिकवतोस? कालच्या समारंभासाठीं माझे किती पैसे खर्च झालेत हें तुला ठाऊक आहे? ते काय तुझा बाप भरून देणार आहे? गद्धा कुठला! भलत्या वेळीं कशाला आलास इथं? असला फाजीलपणा पुन्हां केलास तर नोकरी जाईल. लक्षांत ठेव!'

'पण शेटजी तो हरिजन मुलगा—'

शेटजींच्या डोळ्यासमोर एखाद्या अप्सरे-प्रमाणें नटून सजून बसलेल्या रोशन बरोबर करायच्या विषयक्रीडेचीं चित्रें तरळत होतीं. त्या चित्रांशीं रघुनाथाचे हे शब्द इतके विसंगत होते कीं—

बेभान होउन ते रघुनाथाच्या अंगावर धांवले. रोशननें त्यांचा हात धरून त्यांना अडविलें आणि डोळ्यांनीं रघुनाथाला निघून जाण्याची खूण केली.

●

किती तरी वेळ आपण कुठें चाललोंय् हेंच रघुनाथाला कळत नव्हतें. त्याच्या मेंदूंत जणुं कांहीं धुकें पसरलें होतें.

तो थोडासा भानावर आला तेव्हां आपण चौकांतल्या गांधींच्या पुतळ्यासमोर उभे आहों असें त्याला आढळून आलें. नऊ केव्हांच वाजून गेले होते. पुतळ्यावरला विद्युद्दीप विश्रांति घेत होता. अंधारांत गांधीजींचें स्मित मुळींच दिसत नव्हतें.

· रघुनाथ जड पावलांनीं घराकडे वळला. रस्ताभर त्याच्या मनांत एकच विचार घोळत होता-आज अमावास्या आहे. अवसेचा हा अंधार रात्रभर धिंगाणा घालणार. आकाशांत लुकलुकणाऱ्या हजारों नक्षत्रांनीं तो कधीं तरी उजळला आहे का? हा काळाकुट्ट काळोख नाहींसा करायला चंद्रकोरच उगवायला हवी!

जानकी दारांत त्याची वाट बघत उभी होती. तो दिसतांच ती म्हणाली 'आतां माझा जीव भांड्यांत पडला. नाहीं नाहीं त्या कल्पना माझ्या मनांत येऊं लागल्या होत्या बाई, म्हटलं अंधारांत कुणी चोरानं खिशांतली माळ—'

एखाद्या यंत्राप्रमाणें रघुनाथाचा हात खिशांत गेला. त्यानें माळेची पुडी काढली आणि निर्विकार मुद्रेनें ती जानकीच्या हातांत ठेवली. जानकी धांवतच घरांत गेली. रघुनाथ आंत जातो न जातो तों झोंपलेला मोहनच्या गळ्यांत माळ घालून त्याला दाखवायला सुद्धां ती घेऊन आली. आतां रघुनाथ आपली कांहीं तरी गोड थट्टा करील अशी तिची कल्पना होती. पण तो एक अक्षरसुद्धां बोलला नाहीं. तिला मोठें नवल वाटलें.

जेवतांनाही तसेंच. तिनें मुद्दाम त्याला आवडणारी वाटलेली डाळ केली होती. पण कसेबसे चार घांस खाऊन पानावरून उठत तो म्हणाला 'आज भूकच नाहीं बघ.' आज एवढी मोठी मेजवानी कुठें होती हा जानकीचा प्रश्न टाळण्याकरतां तो लगेच बोलून गेला 'काल तो पुतळ्याचा समारंभ झाला ना? त्याची पार्टी होती आज!'

रघुनाथ हात धुतो न धुतो तोंच दारावर कुणीतरी टकटक करीत आहे असें वाटलें. जानकी दार उघडायला जाऊं लागली. पण तो तिला म्हणाला 'तूं जेवायला बैस. मी पाहतों कोण आलंय तें!'

दार उघडायला जातांना कुणीतरी आप-ल्याला फांशी द्यायला नेत आहे असें रघु-नाथाला वाटलें. त्यानें मोठ्या कष्टानें दाराची कडी काढली. त्याच्यापुढें सीताराम उभा होता.

रघुनाथ मान खालीं घालून त्याला म्हणाला 'क्षमा कर मला सीताराम! गांधींनीं तीन जगांचं एक जग केलं आहे असें वाटून मी मघाशीं तुला धीर दिला. पण—पण करूं? सीताराम, हातांत बेड्या असणाऱ्या गुलामाला दुसऱ्या गुलामाच्या पायांतल्या बेड्या तोडतां येत नाहींत रे!'

सीताराम सद्गदित स्वरानें म्हणाला 'भाऊ असं कांहींतरी बोलूं नका. मी बाराच्या गाडीनं देहू रोडला जातो. मला तुमचा आशीर्वाद द्या.' हें बोलतां बोलतां रघुनाथाचे पाय धरण्याकरतां सीताराम वांकला.

रघुनाथ झटकन् मागें झाला आणि जिव्हारीं घांव बसल्याप्रमाणें विव्हळ होऊन म्हणाला 'मी कसला आशीर्वाद देणार तुला? तूंच शाप दे मला!'




—तेंच तें सांगायचें टाळण्यासाठीं!



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# 'राजकमल'च्या आगामी अभिनव कलाकृति

दिग्दर्शक : विनायक
पटकथा–संवाद–गीतें :
दिवाण शरार
–: भूमिका :–
नयनतारा, याकूब, बाबूराव
पेंढारकर, दिक्षित, शांतारीन,
चंद्रकांत, मृणालिनी,
प्रतिमादेवी, जानकीदास,
दामुअण्णा
मालवणकर

दिग्दर्शक : केशवराव दाते
–: भूमिका :–
लीला चिटणीस
( Golden Voiced ),
मनमोहन

( हिंदी–मराठी )
: : दिग्दर्शक :
बाबूराव पेंटर
–: भूमिका :–
हंसा वाडकर
जयराम
शिलेदार
मनमोहन

दिग्दर्शक :–
चंद्रशेखर

अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

सीतारामानें मुकाट्यानें त्याच्या पायावर डोकें ठेवलें आणि मानेनें त्याचा निरोप घेऊन तो अंधारांत अदृश्य झाला.

●

जानकी झोंपायला आली तेव्हां रघुनाथ अगदीं शांत झोंपला आहे असें तिला वाटलें. दिवसभराच्या श्रमानें तीही दमून गेली होती. अंथरुणावर पाठ लागतांच तिला झोंप लागली.

पण मध्यरात्रीं ती एकदम जागी झाली. मोहन असा कां रडतोय् हें तिला कळेना. तिनें डोळे उघडून पाहिलें. मोहन शांतपणें तिच्या कुशींत झोंपला होता. छोट्या दिव्याच्या मंद प्रकाशांत सुद्धां त्याच्या गळ्यांतली माळ किती सुंदर दिसत होती!

ती पुन्हां डोळे मिटणार तोंच तिला एक हुंदका ऐकूं आला. ती चकित झाली. रघुनाथ रडत होता हें उघड होतें. त्याचें रडणें—ज्याच्या खांद्यावर मान ठेवली असतांना आपले अश्रु आपोआप थांबतात त्या आपल्या जीवितेश्वराचा तो हुंदका—ती साधी भोळी पोरगी गडबडून गेली.

रडणाऱ्या आईची समजूत घालण्याकरतां लहान बालकानें हळूच तिच्या गळ्याला मिठी मारली त्याप्रमाणें पाऊल न वाजवितां ती रघुनाथापाशीं गेली आणि आपला गाल तिनें त्याच्या गालाला लावला. त्याच्या गालावरचे ते उष्ण अश्रु—

जानकी जागी झाली आहे याची रघुनाथाला कल्पनाच नव्हती! तिनें त्याचें मस्तक आपल्या मांडीवर घेतलें आणि त्याच्या केसांवरून लाडकेपणानें हात फिरवीत ती म्हणाली 'असं काय बरं करावं लहान मुलासारखं?' रघुनाथ उद्गारला 'मी लहान असतों तर किती किती बरं झालं असतं. मग हें दुःख कळलंच नसतं मला!'

इनमीन तीन माणसांच्या जगांत वावरणारी जानकी! दुःख मुख्यतः शरीराचेंच असतें अशी तिची प्रामाणिक कल्पना! तिनें प्रेमार्द्र स्वरांत विचारलें 'डोकं दुखतंय् का?'

रघुनाथ हंसला. पण अश्रूंच्या पार्श्वभूमीवरचें त्याचें तें हास्य जानकीला भीषण वाटलें. तिला आतां दुसरीच शंका आली. मोहनच्या गळ्यांतल्या माळेकडे निश्चल दृष्टीनें पाहत ती म्हणाली—'या माळेसाठीं कर्जबिर्ज तर काढलं नाहींना आपण? तसं असेल तर ही माळ आतांच्या आतां परत करून या. बापाच्या गळ्याला फांस लावून मुलाच्या गळ्यांत माळ घालायला मला कांहीं वेड लागलेलें नाहीं!'

'वेडी कुठली!' रघुनाथ नकळेच म्हणाला.

'मग एवढं कसलं दुःख होतंय् तुम्हाला?'

'कसलं? कसं सांगूं तें तुला जानकी? माझं माझं दुःख–शरीराची जखम कुणालाही दाखवितां येते, हृदयाची जखम प्रेम करणाऱ्या माणसाला दिसूं शकते, पण–माणसाचा रक्तबंबाळ झालेला आत्मा–नाहीं, जानकी, तुला कळायचं नाहीं ग तें! सारीं माणसं सारखीं, सारं जग एक असें मी लहानपणापासून शिकत आलों–घोकत आलों–ऐकत आलों! पण जग एक राहिलेलं नाहीं. त्याचे तुकडे तुकडे केले आहेत माणसानीं!'

एकदम बाराच्या गाडीची स्टेशनमधून सुटतांनाची कर्णकर्कश शीट शांत वातावरणांतून ऐकूं आली. रघुनाथ उद्गारला 'एक, एक जानकी ही आगगाडीसुद्धां तेंच ओरडून सांगतेय्!'

जानकी वेड्यासारखी त्याच्याकडे पाहत राहिली. त्याच्या डोळ्यांत पुन्हां अश्रु उभे राहिलेले पाहतांच त्याला घट्ट मिठी मारून तीही रडूं लागली.

यावेळीं चिकपट पाडून मोटारींतून रेशनच्या बंगल्यावर जायला निघालेले शेटजी पुढें ड्रायव्हर आहे याची पर्वा न करतां तिच्याशीं कामुक चेष्टा करण्यांत गुंग होऊन गेले होते. आणि देहू रोडकडे जायला निघालेला सीताराम अश्रुपूर्ण नेत्रांनीं हळुहळु मागें पडणाऱ्या गांवाकडे पाहत होता. आपल्या भाऊचें आपल्याला पुन्हां केव्हां दर्शन होईल म्हणून मनांत हुरहुरत होता.

"मुंबईत कलापुर–कोल्हापूर"

आमचे ग्राहकांसही दिवाळी व नूतनवर्ष सुखाचे व भरभराटीचें जावो.

कोल्हापूरचे विष्णु पेडणेकर, (सुप्रसिद्ध कारखानदार) यांच्या सोने–चांदीच्या सर्व तऱ्हेच्या सुंदर व कलापूर्ण जिनसांचे —: मुंबईचे सोल डिस्ट्रिब्यूटर: —

गजानन पुरुषोत्तम गुहागरकर.

मिळण्याचें ठिकाणः—दगडी वाडी, पोर्तुगीज-चर्च स्ट्रीट, दादर.

येथें सर्व तऱ्हेचे दागदागिने तयार व गिऱ्हाईकांचे मनपसंत डिझाईनप्रमाणें तयार करून दिले जातील. दागदागिन्यांतील सोनें, चांदी चोख वापरले जाते. वजनमापाची पूर्ण दक्षता.

एकवेळ आश्रय द्यावा–व कायम गिऱ्हाईक व्हावें.






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

ही दिवाळी आमच्या आश्रयदात्यांस समृद्धीची जावो !

# हिंदुस्थानच्या अग्रेसर फिल्म संस्था

फेमस पिक्चर्स (१९४६) लि.
प्रभात फिल्म कं.
नवयुग चित्रपट लि.
लक्ष्मी प्रॉडक्शन
न्यू थिएटर्स लि.
रमणीक प्रॉडक्शन
मेहबुब प्रॉडक्शन
फिल्मिस्तान लि.
हिंद पिक्चर्स
प्रफुल्ल पिक्चर्स
जयंत देसाई प्रॉडक्शन
अमर पिक्चर्स
पांचोली आर्ट
न्यू हंस
प्रभाकर पिक्चर्स वगैरे.
—तसेंच
फेमस पिक्चर्स लि.-पिअरलेस पिक्चर्स-इंडिया फिल्म सर्किट-सुप्रीम फिल्म्स-ॲडव्हान्स फिल्म एक्श्चेंज-डायमंड पिक्चर्स-वगैरे डिस्ट्रीब्यूशन संस्था.



ह्या सर्वांचे पोस्टर्स प्रिंटिंगचें काम-होर्डिंग्जचें काम-बॅनर्स वगैरे कामें अत्यंत चोख रीतीनें आणि मनपसंत करून देणारी लोकप्रिय संस्था—



## रामनाथकर

## सिनेपेंटिंग वर्क्स

आणि

## ओरिअेंटल लिथो वर्क्स

सुपर सिनेमाजवळ,
ग्रँटरोड-मुंबई.






अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




: लेखक :

—— केशवराव भोळे

● निव्वळ चार गोड गाण्यावर लोकप्रिय झालेला अपवादात्मक चित्रपट पाहून त्याची नक्कल करून काढलेला चित्रपट नेमका पडत असतो. अपवादावरून नक्कल करून नियम ठरवितां येत नाहीं. प्रेक्षकांविषयीं हमखास सांगणाऱ्यांना माझा असा सवाल आहे कीं—

दहा वर्षांपूर्वीची गोष्ट. प्रभात टॉकीजमध्यें प्रभातचा सुप्रसिद्ध 'तुकाराम' हा बोलका चित्रपट चालू झाला. परंतु नेहमीच्या अपेक्षेला डावलूनच हा चित्रपट पहिले पांच आठवडे कसाबसा चालत होता. प्रभातच्या कोणत्याहि नवीन चित्रपटाला अत्यंत गर्दी असायची, चार आणे आठ आणेवाल्यामध्यें तिकिटांकरतां धुमश्चक्री, मारामारी व्हायची, मवाली जास्त दरानें तींच तिकिटें विकायचे, ह्या गोष्टी अगदीं ठरलेल्या! पण तुकारामाचा पहिलाच खेळ वजा केला तर वरील नियम प्रेक्षकांनीं मोडला. अजिबात गर्दी नाहीं असे पांच आठवडे गेले. असें कां व्हावें याचा शोध घेतां ध्यानांत आलें कीं पुण्यांत चित्रपट तयार होत असतांना पुढील अवाई उठली होती. "बाबाजीराव राण्यांच्यापेक्षां प्रभात तुकारामांत जास्त काय दाखविणार? त्यांत आणखी परवां म्हणे विमान कोसळले—अपशकुनच झाला एकंदरीत!" सबंध पुण्याभर कांहीं शिष्टांनीं, रिकामटेकड्यांनीं, निष्कारण झालेल्या प्रभातच्या शत्रूंनीं ही अवाई पसरवून ठेवली होती. आणि त्याचें प्रत्यंतर पहिले पांच आठवड्यांत आलेंच. परंतु यांतहि कांहीं गणंग किंवा स्वतंत्र बुद्धीचे प्रेक्षक असतातच. ते अशा अवाईला न जुमानतां स्वतः आपल्या बुद्धीनें बरें वाईट ठरविणारे असतात. त्यांतलेंच कांहीं तुकाराम बघून आले आणि आपापल्या मित्रमंडळींत बोलूं लागले. "छेः छेः तुकाराम फार चांगला काढला आहे. उगाच कोणाच्या बोलण्यावर जाऊं नका. तुम्ही स्वतः बघा—एकदां नाहीं, तर पुनः पुनः पहाण्यासारखा तुकाराम निघाला आहे." आणि याचेंही प्रत्यंतर पुढें मिळालें. सहाव्या आठवड्यापासून गर्दी वाढतां वाढतां दहाव्या आठवड्याला तिकिटें मिळेनाशीं झाली, आणि पुढें चाळीस आठवडे हा चित्रपट चालला. मुंबईला तर अठ्ठावन आठवडे चालला. बंगलोर, मद्रास, लाहोर, दिल्ली, केंब्रिज विश्वविद्यालय येथून या चित्रपटाकरतां मागण्या येऊन प्रत्येक ठिकाणीं चार चार आठवडे मराठी तुकाराम हिंदुस्थानांतल्या सर्व भाषा बोलणाऱ्या लोकांनीं व सर्व धर्मीयांनीं पाहिला. इतकी असामान्य लोकप्रियता या पूर्वी, नंतर व अजूनहि दुसऱ्या कोणत्याहि चित्रपटानें मिळविली नाहीं.

●

मुंबईच्या श्रीकृष्ण सिनेमांत प्रभातचा हिंदी चित्रपट 'अमरज्योति' लागायचा होता. तो जुलै महिन्यांत लावावा कीं पुढें येणाऱ्या श्रावण महिन्यांतील एखादा मोठा सण गांठून लावावा याबद्दल मालक मंडळींत चर्चा चालू होती. परंतु जुलैमध्यें हें चित्र लावण्याबद्दल कोणाचें फारसें अनुकूल मत दिसत नव्हतें. इतक्यांत एका व्यक्तीला उद्देशून शांताराम बापू म्हणाले, "काय तुम्हाला काय वाटतें—आतां जुलैंत चार तारखेला थिएटर मिळतें आहे, तेव्हां पिक्चर लावावें काय?" ती व्यक्ति हंसून म्हणाली, "तुम्हांला जर या पिक्चरची खात्री वाटत असेल तर खुशाल लावा. चांगलें पिक्चर असलें, चांगलें नाटक असलें म्हणजे लोक वाटेल त्या दिवशीं, वाटेल त्या महिन्यांत, वाटेल त्या थिएटरमध्यें धडपडत येतात, असा अनुभव आहे. सत्तेचे गुलाम नाटक असेंच जुलैमध्यें प्रथम लागलें. त्यावेळी कितीहि पाऊस असला तरी नाटकाला चिकार गर्दी असे. आयत्या वेळीं तिकिट मिळत नसे. 'थीफ ऑफ बगदाद' ला अशीच गर्दी मिनर्व्हा थिएटरमध्यें प्रत्येक खेळाला होत असे. भावड्याचें सुभद्रेचें काम पहावयाला गोरगरीबसुद्धां आपलें खिडुक मिडुक गहाण

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

ठेवून• थिएटरवर गर्दी करीत. तुमचा माल चांगला असला की गिऱ्हाईक भरपूर मिळालेंच पाहिजे. माल मात्र खात्रीपूर्वक चांगला काढावा व आत्मविश्वासानें बाजारांत मांडावा." चित्रपट जुळेतच चार तारखेला कृष्ण सिनेमांत लागला. नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें प्रभातच्या तुतारीला प्रेक्षकांची टाळी पडली. पण 'व्ही. शांताराम' ही दिग्दर्शकाची पाटी पडद्यावर दिसतांच प्रेक्षकांनीं जोरानें दिलेल्या टाळ्या शांताराम बापूंनाहि, वर प्रत्यक्षच पहिल्यानें ऐकावयास मिळाल्या.

●

अमृतमंथन व धर्मात्मा या वैशिष्ट्यपूर्ण चित्रपटापासून प्रेक्षक शांतारामांना उत्तम दिग्दर्शक म्हणून ओळखूं लागले होते. चंद्रमोहन, दुर्गा खोटे, शांताबाई आपटे यांचेंहि प्रेक्षकांनीं उत्तम स्वागत केलें. 'सुनो सुनो' हें गाणें प्रेक्षकांच्या तोंडी बसलें व 'अब मैने जाना है हाय! प्रेम क्या है' या गाण्याला तटस्थ राहून प्रेक्षक मूकाश्रू ढाळीत. तर चंद्रमोहन व दुर्गा खोटे यांच्यांतील वाग्युद्धाचे प्रसंग प्रेक्षकांना थरारून सोडीत पण—अंत पडद्याकडे टक लावून विस्फारीत नजरेनें बसलेले प्रेक्षक बाहेर पडल्यावर चित्रपटांतील गोष्टीवर पुढील टीका करीत, "स्टोरी तो कुछ समझमें नहीं आती–और वह लंगडा–न मालूम पोशीदा जगहसे अकेलाहि अकेला शहरमें कैसे आ पोंहोंचता है. वह भेडीयें चरानेवाला लडकाभी वहाँ कैसे आया." एक नाहीं दोन अशा अनेक शंका कथानकासंबंधीं काढीत, टीका करीत. पण चित्रपटाची गर्दी कांहीं कमी होत नव्हती. प्रेक्षकांना विचार करायला वेळ न देतां एकावर एक विस्मयपूर्ण प्रसंग दाखवून त्यांना बांधून ठेवण्याचें दिग्दर्शकाचें कौशल्य या चित्रपटांत प्रामुख्यानें दिसून आलें, त्याप्रमाणें विषयाचें नाविन्य, नेपथ्यांतील, दिग्दर्शनांतील नाविन्यहि प्रेक्षकांनीं वाखाणलें. परंतु वरच्या वर्गानें मात्र या कथानकावर खूपच टीका केली. ती खालच्या निरक्षर प्रेक्षकांपर्यंत न पोचल्यामुळें खालच्या वर्गानें गर्दी कायम ठेवली. दिग्दर्शक कथानकामध्यें किती ढवळाढवळ करतो ही माहिती टीकाकारांना माहित नसल्यामुळें कथालेखकावर ते तुटून पडतात, व दिग्दर्शक यांतून सहीसलामत सुटून उलट उत्तम दिग्दर्शनाबद्दल स्तुतीस पात्र ठरतो. 'माणूस' ची हीच स्थिती झाली. परंतु यावेळीं दिग्दर्शक मात्र टीकेच्या माऱ्यांतून सुटला नाहीं. प्रेक्षकांनीं 'वॉटर्लु ब्रिज' शीं दिग्दर्शनसाम्य हुडकून त्यावर चौर्याचा आरोपहि केला!

●

तुकाराम चालू असतांनाच 'ज्ञानेश्वर' काढावा असें मीं शांताराम बापूंना वारंवार म्हणत असें. ज्ञानेश्वराचें चरित्र व त्याचें कार्य यावरील माझें वाचन त्यावेळीं चालू असल्यामुळें मराठी भाषेत प्रथमच गीतेंतील भागवत धर्म सांगणारा पहिला संत ज्ञानेश्वर–वारकरी पंथाचा पुरस्कर्ता–पडद्यावर परिणामकारक होईल ही मला खात्री होती. याबाबतींत विष्णुपंत पागनीस (व माझे स्नेही बाबुराव देवभक्तहि खाजगी संभाषणांत) मला नेहमीं दुजोरा देत. त्याशिवाय ट्रिक, फोटोग्राफीला यांत पुष्कळ वाव आहे हेंहि मी शांताराम बापूंना सांगितलें होतें. परंतु एक


# दि बृहन्महाराष्ट्र शुगर सिंडिकेट, लि०.

९८० सदाशिव पेठ, पुणें २.

——:०:——

—: संचालक मंडळ :—

श्रीमंत जगन्नाथ महाराज पंडित,
फर्स्ट क्लास सरदार, इनामदार, पुणें २. (चेअरमन)

डॉ. वि. दा. फाटक,
L. R. C. P., M. R. C. S., L. M. (Rotunda)
लोणंद.

दि. ब. नि. चिं. लिमये,
B. A., LL. B., C. B. E. सोलापूर.

डॉ. र. ग. ठकार, L. M. & S. Retired State Surgeon पुणें २

श्री. अण्णाजी पांडुरंग कोंडे देशमुख,
जमीनदार, पुणें २.

श्री. म. रा. तांबे, B. A., L. C. E. दादर.

श्री. रा. बा. भट, पुणें ४

रा. ब. मा. ल. मोडक,
M. C. E. M. (Inst. C. E., I. S. E. (Retired).
पुणें ४.

श्रीमंत ग. वि. साळवेकर, B. A. मुंबई २.

डॉ. रा. ह. भडकमकर, M. A., M. D. पुणें ४.

श्री. चंद्रशेखर गोविंद आगाशे,
B. A., LL. B. पुणें २.

[अधिकारपरत्वें]

**युद्धोत्तर कालांत सिंडिकेटच्या सर्वांगीण वाढीच्या योजना आंखल्या जात आहेत.**

**ही दिवाळी सिंडिकेटच्या भागीदारांस ठेवीदारांस आनंदाची व भरभराटीची जावो.**

**सी. जी. आगाशे आणि कं.,**
**मॅनेजिंग एजंटस्**


अनुक्रमणिका


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

दिवस या बंडखोर ज्ञानेश्वराच्या ज्ञानेश्वरीमधील पुढील ओव्या मी शांताराम बापूंना म्हणून दाखविल्या, तेव्हां मात्र महाराष्ट्राभिमानी शांताराम बापू खुलले व ‘ लोकांना कसें कळेल, आवडेल ’ ही शंकाखोर वृत्ति सोडून देऊन ‘ हें पिक्चर काढायाचें, ’ असें म्हणाले. त्या ओव्या म्हणजे ‘ ये मराठियेचे नगरी ब्रह्मविद्येचा सुकाळ करी ’, ‘ माझा मराठाचि बोलु कौतुकें । परि अमृतातें हि पैजा जिंके । ऐशी अक्षरें रसिके मेळविन. ’ या महान् चित्रपटाचें प्रेक्षकांनींहि—अगदीं सर्व दर्जाच्या व थरांतील—भरपूर स्वागत व कौतुक केलें. हिंदुस्थानभर प्रेक्षक ज्ञानेश्वरापासून ‘ माणुस धर्म ’ शिकलेच पण न्यूयॉर्क, सोव्हिएट रशिया व चीनमधील प्रेक्षकहि शिकले. ‘ समता वर्तावि ’ ही निवृत्तिनाथानें तेराव्या शतकांत हिंदुस्थानांत केलेली समतेची घोषणा ऐकून विसाव्या शतकांतील रशियांतील साम्यवादी प्रेक्षक चकित झाले असल्यास नवल कसलें !

●

‘ कुंकु व दुनिया न माने ’ या चित्रपटानें तर प्रेक्षकाकडून स्तुतिपर पत्रें इतकीं आलीं कीं त्यापूर्वीं किंवा नंतर केव्हांहि आलीं नसावींत. स्त्रियांमध्यें सामाजिक अन्यायाविरुद्ध झगडण्याची एवढी प्रतिकार शक्ति असूं शकते याची आम्हाला तुम्ही पहिल्यानें जाणीव दिलीत असें एका पडदानशीन मुसलमान स्त्रीचें पत्र शांताराम बापूंना आलें. तर कित्येक होणारे जरठकुमारीविवाह या चित्रपटामुळें रद्द झाले अशी हिंदुस्तानांतील चारही दिशांतून प्रेक्षकांचीं पत्रें आलीं. या सामाजिक अन्यायाविरुद्ध एवढी खळबळ देवलांच्या शारदा नाटकानंतर हिंदुस्थानभर या चित्रपटामुळें झाली. एवढेच नव्हे तर एकंदर अन्यायाविरुद्ध माणसानें झगडले पाहिजे हा धडाहि प्रेक्षकांना मिळाला. मुंबईंत ‘ मन साफ तेरा है या नहीं ’ हें गाणें मुसलमानांच्या तोंडीं झालें व ‘ मन-सुद्ध तुझं ’ हें गाणें हिंदू गुणगुणू लागले-आणि नंतर अशा जोरदार गाण्यांचीं ‘ चल्चल्रेनवजान् ’ पासून जी परवड सुरू झाली ती अगदीं किस्मतमधील अनावश्यक असलेल्या ‘ दूर हटो ’ या गाण्यापर्यंत अखंड राहिली. प्रेक्षकांना असलीं गाणीं हवीं असतात म्हणून तीं चित्रपटांत संबंध नसला, प्रसंग नसला तरी घुसडावींत अशी प्रेक्षकांविषयींची चुकीची समजूत निर्मात्यांनीं करून घेतली; आणि ती पुढील काळांत दोघांनाहि विशेषतःसमंजस प्रेक्षकांना—फारच भोवली.

●

ठराविक प्रकारच्या घटना, ठराविक सांचाचे प्रसंग, निरर्थक गाणीं, एखादें सणसणीत देशभक्तिपर गाणें अशा प्रकारचा ‘ फॉर्म्युला’ चित्रपटसृष्टींत सुरूं झाला. प्रेक्षकांची नुसती सवंग करमणूक करून पैसे मिळविण्याकरतां प्रतिष्ठित कंपन्यांना चित्रपट काढले व त्यांवर त्यांनीं आपला एक खास प्रेक्षक वर्ग तयार केला: या वर्गात


नूतन वर्ष आमचे ग्राहकांस सुखाचें जावो !

**मागोरा केमिकल कंपनी लि.**

★ हिरा बाग, पुणें २ ★

आमचें कारखान्यांतः—

१) टिंक्चर्स, सायरप्स लिनिमेंट्स् इ.
२) इंजेक्शनस् व्हिटॅमिन्ससह
३) टॉयलेट्स्—हेअर ऑईल, स्नो, ब्रिलियंटाईन, फेस पावडर इ.
४) कीटकनाशकें—लायलॉफ्, ए. बी. सी. पावडर व कॉईल्स इ.
५) पेटंटस्—मागोरा पिल्स, (मलेरियावर) दम्याच्या सिगारेट्स् मागो—प्राईम इ.—

इ. इ. माल तयार होतो.

अधिक माहितीसाठीं लिहा अगर भेटा.



सतत ७५ वर्षे नांवाजलेला

सातारचा जगप्रसिद्ध

**गोडबोले**

**जर्दा**

वापरा. सर्वत्र मिळतो.

बाहेरगांवीं माल व्ही. पी. नें पाठविला जातो.

व्यापाऱ्यांस भरपूर सवलत.

**के. अेस्. गोडबोले,** सातारा.

जगप्रसिद्ध सातारी जर्द्याचे व अत्तरें, तेलें आणि अुदबत्तीचे कारखानदार

प्रोप्रायटर : व्ही. जी. गोडबोले


अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

दिवसभर दुकानांत किंवा बाजारांत धंदा करून कंटाळलेले, संध्याकाळीं निव्वळ करमणूक करून घेणारे बोहरी, कच्छी, मेमन, खोजे, पारशी असत, हें दृश्य मुंबईत कोणाहि उघड्या डोळ्यानें पहाणाऱ्याला सतत पहावयाला मिळत असें. या फॉर्म्युल्यानें मी मी म्हणणाऱ्या ' ध्येयवादी व कलापूर्ण चित्रपट काढणाऱ्या अव्वल दर्जाच्या कंपनीच्या चालकांना ' देखील भुरळ पडली, आणि त्याचें पर्यवसान म्हणजे मुद्दाम या फॉम्युल्यावर हुकूम काढण्यांत आलेले आणि पडलेले चित्रपट होत! चित्रपटाचा दिग्दर्शक पंजाबी असल्यामुळें प्रेक्षकांचा ' कलिजा '- झालेल्या गुलाम: हैदर परंपरेतील पंजाबी संगीत दिग्दर्शक त्यानें आणल्यास नवल कसलें? त्याच्याबरोबर तसेच कांहीं ' बाजेवाले ' आर्केस्ट्रांत दाखल झालें. इकडचा गहू व इकडचें तूप या महान् कलाकरांना मानवेना म्हणून तेहि महत्त्वाचे पदार्थ त्यांना जगविण्याकरतां पंजाबहून आणाविण्यांत येऊं लागले कारण प्रेक्षकांच्याकरतां या फॉर्म्युलाचा महान् प्रयोग हे करणार होते ना! पंजाबची हवा आणणें शक्य नव्हते नाहींतर तीहि आणली असती! शेवटीं खूप जाहिरात करूनहि अशा चित्रपटाचा बोऱ्या वाजायचा तो वाजतोच! आपण आपल्या ध्येयाशीं प्रतारणा करूं लागलों कीं प्रेक्षक आपल्याशीं प्रतारणा करूं लागतात हें कटु सत्य निर्मात्यांच्या अनुभवास आल्यावाचून रहात नाहीं.

●

खोल व शास्त्रीय निरीक्षणाच्या अभावीं ' प्रेक्षकांना अमूक आवडते, तमूक आवडत नाहीं ' असे हें सिनेमा निर्माते प्रेक्षकांच्या वतीनें बेछूट बडबडत असतात. बिचाऱ्या प्रेक्षकांना हें माहित नसते म्हणून बरें आहे. वास्तविक स्वतःच्या बदलत्या लहरीला बळी पडूनच निर्माते चित्रपट काढीत असतात, आणि त्याबद्दलची स्वतःची आवड निवड प्रेक्षकांच्या माथी मारीत असतात. निर्माते असतात बॉक्समध्यें, आणि बिचारे प्रेक्षक असतात खालीं. त्यांच्यांत बसून, त्यांची मतें, त्यांच्यावर होणारें चित्रपटाचे आघात प्रत्याघात, परिणाम जर निर्माते प्रत्यक्ष पहातील, तपासतील तरच त्यांना प्रेक्षकांना काय हवें याचें खरें ज्ञान होईल. प्रेक्षकांपासून अलिप्त राहून, गैर शुद्धीत हें ज्ञान खास होणार नाहीं. एखादा रतनसारखा निव्वळ चार गोड गाण्यावर लोकप्रिय झालेला अपवादात्मक चित्रपट पाहून त्याची नक्कल करून काढलेला चित्रपट नेमका पडत असतो. अपवादावरून नक्कल करून नियम ठरवितां येत नाहीं. प्रेक्षकांविषयीं हमखास सांगणाऱ्यांना माझा असा सवाल आहे कीं तुकाराम, माणूस, ज्ञानेश्वर, कुंकू, शेजारी, देवदास, चंडीदास, विद्यापती या चित्रपटाची पत्रें पाठवून प्रेक्षकांनीं मागणी केली होती काय? हें चित्रपट कुठेंहि केव्हांहि पुनः लागले तर प्रेक्षक गर्दी कां करतात? याचा त्यांनीं प्रथम शोध घेऊन प्रेक्षकांच्या मनोवृत्तीचा अभ्यास करावा. आणि मगच त्यांना काय हवें नको, आवडते नावडते याबद्दल छातीठोकपणें बोलावे, उगीच घरबसल्या भरमसाट बेअंदाज विधानें करूं नयेत.

---

" वेडेकर " मसाले



लोणचीं पापड वापरा

व्ही. पी. वेडेकर आणि सन्स लि.
मुख्य दुकान : मुगभाट-मुंबई ४.
फोन : ३४०५३
शाखा : ठाकुरद्वार, दादर, कोट व परळ.

श्रमामुळें होणारी शारीरिक झीज भरून येऊन,
टिकाऊ उत्साह देणारे-
रक्तवृद्धी—शारीरिक जोम
याकरितां व




पी. के. लेले फार्मसी, पेण-कुलाबा.
हेड ऑफिसः- पनवेल-कुलाबा.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

★ मनपसंत शिलाई आणि

वक्तशीर काम—

यासाठीं

गेलीं अनेक वर्षें सुप्रसिद्ध !

**पी. शांताराम**

**आणि**

**कं प नी**

टेलर्स व क्लॉथ मर्चंटस्

शिंगणे बिल्डिंग, पोर्तुगीज चर्चजवळ,

गि र गां व—मुं ब ई ४.

नाग छाप **सुगंधी अर्क**

अगरबत्ती, अत्तरें, तेलें, पोमेड,
ब्रिलियंटाईन, स्नो, साबण, कोलन
व लव्हेंडर वॉटर, इ. सौंदर्य साधनांत
वापरण्यासाठीं. किंमत योग्य, माल
टिकाऊ. कॅटलाग मागवा.

**एस्. एच्. केळकर आणि कं.** मंगळदास रोड, मुंबई २

ता. पत्ता:—SACHE WORKS. टे. नं. २१७३०

नूतन वर्ष व ही दिवाळी आमच्या
सर्व ग्राहकांस आनंदाची जावो.

**लक्ष्मण आत्माराम**
**पालशेतकर आणि ब्रदर्स**

चांदी सोन्याच्या व मोत्यांच्या
दागिन्यांचे व्यापारी

: मुख्य दुकान :

९६–९८ जितेकर चाळ, ठाकूरद्वार रोड,
मुंबई २

: ब्रँच नं. २ :

मुकुंद मॅन्शन, लेडी जमशेटजी रोड,
दादर.

**जगाचे आवाज**

घरीं बसून ऐकण्यासाठीं, आपला रेडिओ
आमच्या तज्ञाच्या देखरेखीखालीं
दुरुस्त करून घ्या.

**युनायटेड लाऊड स्पीकर्स**

जो मंडपांतील महत्वदायक अलंकार ठरतो.

**युनायटेड एन्जिनियरींग कार्पोरेशन**
५, क्वीन्स रोड, मुंबई.

शाखा:-पुणें, लखनौ, कलकत्ता.
टेलिफोन नं. २५५०६

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



: कवि :
श्रीकृष्ण पोवळे

## म धु गौ र व

निशेंत जाई निशा कधी न कळे; ती
रक्तरंग ये कसला पूर्वेवरती ?
भरे वारुणी पूर्वेच्या प्याल्यांत
हाय आमुचे हात न तेथें रिघती !

धर्मरक्षणासाठीं नच आलास
आलास न तूं साधुपरित्राणास
प्रभो, कुठें तव असेल जर अस्तित्व
निमंत्रितो, ये निदान मधुपानास ?

मधु ही—यौवन प्रमदांचें रसरसले
कालकूट या यौवनांत विरघळले
अश्रु मिळाले बुद्धाचे याच्यांत
अन् ख्रिस्ताचें रक्तहि यांत उडाले !

या मद्याची वर्णूं काय बहार
पावे अंतर्धान यांत अंगार
जिंकियली जी सुधा वैनतेयानें,
सर्प चुंबिता सुधाच ती—विषधार !

मधुप्याला जर मिळता प्रत्येकास
हिमगौरी जर मिळती सहशय्येस
आणि मृत्युचे भय नसते जीवांना
ईशकल्पना तर सुचती न कुणास !

आज ऐकिले कुणी बाल ख्रिस्ताला
वधिलें मारुन वक्षावरती नाला
रे ख्रिस्ता, तूं किती जन्म घेणार ?
हृद्रक्तानें भिजविणार क्षिति भूला ?

धुंद सदा, मस्तींत दंग, रंगेल
मधुसह रमतो—ती तर पोर छटेल
मज जगताची पर्वा कुठुन असावी ?
पृथ्वी म्हणजे धूलीरजच विशाल !

निशा सर्व भूतांना तेव्हां जागूं
प्रमदे संगे ही मधु आम्ही भोगूं
निद्राधिन ज्यावेळीं हे जग जागे
योग्यांची आम्हांस लक्षणें लागू—!

---



पुन्हां उल्हासित होण्यासाठीं-




व्यवस्थापक
अरुरकर बंधु

भारत संतोष भुवन
नवें वर्ष आपणांस सुखाचे जावो
भारत संतोष भुवन






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



: कवि० :

ज्यूलियस्—

## उणीव

हो श्वान गादीवर बैसलें हें !
शोभे शिराला पगडी तुऱ्याचीं
पायांत चारीं वलयें रुपेरी
कंठांत माळा झळके हिऱ्याची !

वेषांतही न्यून उरें न कांहीं
अंगांत बंदी नि तुमान लाल
मुद्रेवरी राजविभाव दावी
तो बैठकीचा भलताच डौल !

भुंके दिमाखांत, कशी टळावी
उच्चासनाची पहिली उपाधी ?
विस्तारुनी नाक मिटून डोळे
लावून केव्हां बसतो समाधी !

हा हन्त, ही एक परी उणीव
वेषांत सामावत पुच्छ ना तें
दावी पुढें कौतुक बादशाही
मागे परी हालत तें रहातें !


दिवाळीची सर्वांग सुंदर भेट !

तयार आहे !

"किशोर-कुंज"

संपादकः-पंडित अनंत कुळकर्णी.

- मराठींतील नामवंत लेखकांनीं खास मुलांसाठीं लिहिलेल्या उत्कृष्ट गोष्टींचा संग्रह !
- मुखपृष्ठावरील तीन रंगी सुंदर चित्र–चित्रकार दीनानाथ दलाल.
- प्रत्येक गोष्टीला चित्रकार रघुवीर मुळगांवकर यांचे सुंदर प्रासंगिक चित्र !
- प्रत्येक लेखकाचें नवीन छायाचित्र !
- उत्कृष्ट छपाई आणि आकर्षक सजावट !

इष्टमित्रांस नजर करा आणि संग्रहीं ठेवा !

आजच लिहाः--

श्री. व्यवस्थापक : कुळकर्णी–ग्रंथागार.
४४० शनवार, पुणें २.

१९४६ मधील आठ उत्कृष्ट प्रकाशनें

| | | |
|---|---|---|
| १ अडेलतट्टू | शं. बा. शास्त्री | रु. ३। |
| २ पुन्हां एकदां | शरश्चंद्र टोंगो | ३। |
| ३ म्हणे लढाई संपली | वी. रघुनाथ | १॥ |
| ४ लांब लांब सावल्या | वाय्. वी. शास्त्री | २ |
| ५ तेरी चूप मेरी चूप आणि गोष्टी | सौ. कमला फडके | २ |
| ६ मृगाचा पाऊस | पद्माकर निमदेव | २ |
| ७ दोन प्रख्यात युद्धतंत्र्यें | ह. वा. देशपांडे | २ |
| ८ १८५७ चें स्वातंत्र्य युद्ध | ह. वा. देशपांडे | -॥- |

आगामी ] या वर्ष अखेर प्रसिद्ध होणारी [ प्रकाशनें

| | | |
|---|---|---|
| ९ नवीं मूल्यें | पु. य. देशपांडे | (लेखसंग्रह) |
| १० सखी | वि. वि. बोकिल | (कादंबरी) |
| ११ सावलीच्या उन्हांत | श्रीरमि अत्तरदे | ,, |
| १२ जीवन प्रवाह | द. ग. प्रधान. | ,, |

नागपूर प्रकाशन, सिताबर्डी नागपूर



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट


अनुक्रमणिका



Beauty in Marble
and
Beauty in Zinc

हीं दिवाळी व नूतन वर्ष
आमच्या असंख्य
ग्राहकांस
सुखाचें आणि
भरभराटीचें जावो !

हाफटोन–दोन रंगी–तीन रंगी
ब्लॉकसाठीं सुप्रसिद्ध
**प्रभात प्रोसेस स्टुडिओ**

लाईन ब्लॉक्स व स्टिरीओज्‌साठीं
**शंकर आणि कंपनी**
घोबीवाडी; ठाकुरद्वार, मुंबई.
टे. नं. २७४६७



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# फॅसिस्टशाही, सोव्हिअटशाही आणि चालकशाही

: लेखक :

पां. वा. गाडगीळ

**★ मालकशाहीच्या म्हणजे भांडवलशाहीच्या व साम्राज्यशाहीच्या जुलुमांतून सुटूं पाहणाऱ्या मानव जातीस यापुढें चालकशाहीची गुलामगिरी पत्करावी लागणार काय ?**

नाझी जर्मनीचा पराभव झाला तरी हिटलर जिवंत आहे व तो रशियांत आहे असें सांगितलें जात आहे. याचा अर्थ हिटलर रशियांत पळून गेला व तेथें लपून बसला असा नव्हे. खुद्द स्टालिन हा हिटलरचाच अवतार अथवा अतिहिटलर आहे असें अनेक 'तत्त्वज्ञ ' म्हणतात. फॅसिझम ऊर्फ नाझिझम हे सोव्हिअट पद्धतीहून भिन्न नाहींत व दोन्हींत सारखाच जुलूम आहे असे अनेक लोक मानतात. दोन्ही समाजघटनांत प्रचंड धनोत्पादनपद्धति अमलांत येत असून कारखान्याचे चालक म्हणजे मॅनेजर यांचेवर सर्व व्यवहार अवलंबून असतो, त्यांची एक विशिष्ट आणि मर्यादित जातच बनते व मग सर्व समाज त्यांचे लगामीं जाऊन जिकडे तिकडे 'चालकशाही ' निर्माण होते असें मत हल्लीं मांडण्यांत येत आहे. पूर्वी सरंजामशाहीच्या गुलामगिरींतून मानवजात भांडवलशाहीच्या गुलामगिरींत आली, आतां कोठें फॅसिझम असो अथवा सोव्हिअट पद्धति असो, एकंदरीनें सर्वत्र सर्व समाज ' चालकशाही 'च्या गुलामगिरींत जाणार असें भविष्य मानवजातीसंबंधानें करण्यांत येत आहे. भांडवलशाही माणसाला राजकीय स्वातंत्र्य अथवा वैयक्तिक स्वातंत्र्य देत नाहींच, पण ज्याला समाजवाद ऊर्फ सोव्हिअट पद्धति म्हणतात तीही चालकांची जुलमी व अनियंत्रित सत्ताच समाजावर स्थापन करणार असें दुर्दैवी भविष्य मानव जातीचें केलें जात आहे. रशियांत आज काय चाललें आहे हें बाहेरच्यांना कळत नाहीं. जें बाहेर ऐकूं येतें त्यावरून रशिया साम्राज्य वाढ करूं पाहतों असें अनेकजण बोलतात. यांवरून मालकशाहीच्या म्हणजे भांडवलशाहीच्या व साम्राज्यशाहीच्या जुलुमांतून सुटूं पाहणाऱ्या मानव जातीस यापुढें मालकशाहीची नव्हे पण चालकशाहीची गुलामगिरी पत्करावी लागणार असें अनेक विद्वान म्हणत आहेत.

या एकंदर प्रश्नाची संक्षिप्त चर्चा येथें मी करणार आहे.

●

**भांडवलशाही** म्हणजे भांडवलदारांची सत्ता. इंग्लंडांत जेव्हां भांडवलशाही सुरू झाली तेव्हां काय घडले ? कांहीं थोड्या धनिकांनीं धनोत्पादनाचीं सुधारलेलीं साधनें आपल्या हातीं घेऊन व मजूर कामाला लावून उत्पादन करण्यास सुरुवात केली. सुधारलेलीं उत्पादन साधनें व उत्पादनपद्धति गरीब हस्तव्यवसायिकाला परवडणें शक्य नव्हतें. भांडवलदार व हस्तव्यवसायिक या दोघांचाही माल जेंव्हां बाजारांत विक्रीस आला तेव्हां भांडवलदाराचा अधिक सुधारलेल्या पद्धतीनें निर्मिलेला माल अधिक स्वस्त व सुबक असल्यानें तो बाजारांत खपला जाऊन हस्तव्यवसायिकांचा माल खपेनासा झाला व ते बेकार झाले, रोजगारी मिळविण्यासाठीं वाढत्या प्रमाणांत भांडवलदारावर अवलंबून राहूं लागले. अशाप्रकारें बहुसंख्य समाजाचे आर्थिक जीवन भांडवलदारांचे हातीं जाऊन हळूंहळूं राज्यसत्तेवरही त्यांचेंच नियंत्रण स्थापन झालें. या परिस्थितीचें नांव भांडवलशाही. व्यक्तिस्वातंत्र्य हा या भांडवलशाहीचा त्यावेळीं आत्मा होता. म्हणजे कोणासही कोण-

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

ताही धंदा करण्याचें पूर्ण स्वातंत्र्य होतें. पण लहान, गरीब व एकेकट्यानें धनोत्पादन करणाऱ्या हस्तव्यवसायिकांचा मोठ्या प्रमाणावर अनेक मजूर नेमून धनोत्पादन धनिक भांडवलदाराच्या मालापुढें, बाजारात टिकाव लागत नसे. यामुळें हे हस्तव्यवसायिक बेकार होत आणि त्यांना भांडवलदाराकडे मजूरीवर नोकरी करण्याची पाळी येई. याप्रमाणें बेकारांची संख्या वाढत जाई; पण भांडवलदारांच्या उत्पादनाचा वेग वाढलेला असल्यानें त्याला जितक्या प्रमाणांत नवीन लोक नोकरीवर येऊं पहात तितक्या प्रमाणात नवीन मजूरांची गरज लागत नसे. यामुळें रोजगारी मिळविण्यासाठीं मजूरांत चढाओढ लागे व त्यांची रोजगारी कमी होऊन शिवाय सर्वांना नोकरी न मिळाल्यानें अनेकांच्या कपाळीं बेकारी येईच. अशाप्रकारें बहुसंख्य समाजास शक्तीची चढाओढ आणि रोजगारीची अनिश्चिती प्राप्त होऊन त्याच्या व्यक्तिस्वातंत्र्याचा लोपच होत असे.

●

**भांडवलदारांनाही** हळूं हळूं व्यक्तिस्वातंत्र्य कमीकमीच मिळूं लागलें. कारण ज्याप्रमाणें मजूरामजूरांत चढाओढ चालू असे त्याप्रमाणें भांडवलदार–भांडवलदारांतही चढाओढ चाले. आणि ज्याप्रमाणें लहान मासा मोठ्या माशास खाऊन टाकतो त्याप्रमाणें मोटा भांडवलदार लहान भांडवलदारास खाऊन टाकी व या मोठ्या भांडवलदारास त्याचेपेक्षां मोठा दुसरा भांडवलदार खाऊन टाकी यामुळें फक्त फार मोठ्या भांडवलदारांचे हातीं प्रचंड धनोत्पादन साधनांची मक्तेदारी आली. इंग्लंड, फ्रान्स इत्यादि भांडवलदारी राष्ट्रांचा माल विदेशी बाजारांत गेला. तेथें तो त्या त्या देशांतील हस्तव्यवसायिकांशीं चढाओढ करून त्यांचा पराभव करूं लागला. यामुळें ब्रिटिश भांडवलदारांचें वर्चस्व परकी देशाच्या बाजारांत वाढू लागलें. जर्मनींत प्रथम या ब्रिटिश आक्रमणाविरूद्ध प्रतिक्रिया सुरू झाली. भांडवलशाहीनें बहुसंख्य समाज भांडवलदारांचा गुलाम होत जातो, पण एकंदरीनें उत्पादनाची वाढ होते व त्या त्या राष्ट्रांतील धनिकांचें राज्यसत्तेवरही वर्चस्व स्थापन होतें. म्हणून जर्मन धनिकांना हा भांडवलशाही उत्पादन प्रकार आवडूं लागला. पण ब्रिटिश भांडवलवाल्यांच्या मालाचें आक्रमण जर्मनीवर येईल तर जर्मन भांडवलशाही वाढणें अशक्य होईल म्हणून परदेशी मालाला जकातीनें बंदी करण्याचा उपक्रम जर्मनींत सुरू झाला. इंग्लंडांत भांडवलशाही सुरू झाली ती व्यक्तिस्वातंत्र्याच्या भूमिकेवर सुरू झाली. खुला बाजार हा या व्यक्तिस्वातंत्र्याचाच एक उपसिद्धांत होता. प्रथम वर सांगितल्याप्रमाणें चढाओढीमुळें आधीं मजूर व नंतर भांडवलदार या दोघांचीही कोंडी झाली आणि बहुसंख्य समाजाचें जीवन मूठभर मक्तेदार भांडवलदारांच्या स्वाधीन होऊन बहुसंख्यांचें व्यक्तिस्वातंत्र्य नष्ट झालें. पुढें जर्मनींत विदेशी मालाच्या आयातीस बंदी होऊन हळूहळू बहुतेक साऱ्या राष्ट्रांनीं खुल्या व्यापाराचें धोरण सोडलें आणि सर्व जगात खुल्या व्यापाराऐवजीं आंतरराष्ट्रीय नाकेबंदीच सुरू झाली.

**पहिल्या** महायुद्धानंतर इटाली हें राष्ट्र इतर राष्ट्रांशीं चढाओढींत पुढें येण्यास धडपडूं लागलें. यासाठीं भांडवलशाही पद्धतींत 'सुधारणा' सुचविण्यांत आल्या. ब्रिटिशांच्या भांडवलशाही पद्धतींत भांडवलदारांची आपसांत व मजूरांचीहि आपसांत चढाओढ झाली. ही चढाओढ म्हणजे एक प्रकारचें युद्धच असून साहाजिकच त्यांत विध्वंस व नासाडी होतच असे. इटालीसारख्या मागासलेल्या राष्ट्रास आंतरराष्ट्रीय चढाओढींत पुढें यायचें तर असा विध्वंस व अशी नासाडी परवडणें शक्य नव्हतें. म्हणून इटालीचा पुढारी व पंतप्रधान मुसोलिनी यानें भांडवलदारांना आपसांत चढाओढीस हळूं हळूं बंदी घालून त्यांना नफ्याचा एक ठराविक दर वेळोवेळीं ठरवून दिला. आणि उत्पादन एकजुटीनें वाढविण्याची योजना आखली. त्याचबरोबर त्यानें मजुरांची आपसांत चढाओढही बंद केली. इतकेंच नव्हे तर इंग्लंडांतील मजूर आपसांत संघटना करून मजूरी वाढवून घेत तसें करण्यासही इटालिअन मजूरांना मुसोलिनीनें मनाई केली. कारण मजूरांची मजूरी वाढली म्हणजे मालाच्या उत्पादनाचा खर्च वाढेल आणि आंतरराष्ट्रीय बाजारांत इटालीचा माल मागें पडेल असें मुसोलिनीचें म्हणणें होतें. म्हणून मजूरीचे दर त्यानें कमींत कमी प्रमाणात ठरवून दिले. अशारीतीनें आंतरराष्ट्रीय बाजारांत इटालिअन माल चढाओढीनें खपेल तरी पण इंग्लंड, अमेरिका इत्यादि राष्ट्रांनीं आधींच पुष्कळसें जग व्यापलें असून बाजारांची कोंडी केली असल्यानें इटालीचा माल त्या बाजारास पोचणेंच अशक्य होतें. म्हणून ही कोंडी फोडून हक्काच्या बाजारासाठीं नवीन मुलूख जिंकून घेणें व त्यासाठीं आंतरराष्ट्रीय युद्धें खेळणें हें देशभक्तांचें कर्तव्य आहे असे तो मानी. व्यक्तिस्वातंत्र्य हें खोटें असून राज्यसंस्थेची सेवा हेंच व्यक्तिमात्राचें कर्तव्य असें तो म्हणतो.

●

**मुसोलिनीनें** प्रतिपादिलेलें हें समाजतत्त्व म्हणजेच फॅसिझम् होय. अँग्लो–अमेरिकन भांडवलशाही ही व्यक्तिस्वातंत्र्यावर आधारलेली भांडवलशाही होय. तींत अखेर थोड्या भांडवलदारांची मक्तेदारीच स्थापन होई. तरी पण मजूरांना संघटना–स्वातंत्र्य असल्यानें ते एकजूट करून भांडवलदाराशीं आर्थिक लढा देत व आपली मजूरी वाढवून घेऊन राहणीही सुधारून घेत. मुसोलिनीच्या अमलांत सगळ्यांच्याच व्यक्तिस्वातंत्र्याचा संपूर्ण लोप झाला. मजूरांना मजूरी कमींत कमी मिळे आणि भांडवलदारांना मात्र आपसांत चढाओढ करतां येत नसे तरी एकूण सर्वांचा नफा वाढे. त्यामुळें त्यांना विदेशी बाजार जिंकण्याची हाव होऊं लागली आणि आंतरराष्ट्रीय-युद्ध हें फॅसीझमूचें एक महत्त्वाचें अंग बनलें. या व्यवस्थेंत चढाओढीपेक्षां एकजुटीला महत्त्व आलें. व्यक्तिस्वातंत्र्याचा पार लोप झाला आणि कामगारांनीं संप करणें अथवा कारखानदारांनीं सरकारच्या परवानगीविना कारखाना बंद ठेवणें हा गुन्हा मानला गेला. अशा प्रकारें अनेक व्यक्तींचें बनलेलें राज्य अथवा राष्ट्र हेंच एक महापुरुष

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

बनलें. ह्याचें हित तेंच सर्वांचें हित मानलें जाऊं लागलें. पण हा महापुरुष बाहेरून राष्ट्रस्वरूप असला तरी देशांतील भांडवलदारांची संघटना ही त्यांचा प्राण होती. तिचा नफा हें त्या राष्ट्रांतील व्यवहाराचें ध्येय होतें. सारें राष्ट्र त्या संघटनेचें गुलाम झालें होतें. अखेर या भांडवलदारांनीं साम्राज्यलोभानें मुसोलिनीसारख्या मायेफिरूच्या हातीं सर्व सत्ता एकवटूं दिली आणि त्या मायेफिरूनें स्वतांबरोबर साऱ्या इटालीचा नाश करून घेतला. हिटलरनेंही याच तत्त्वाचा आश्रय करून स्वतांबरोबर सारा जर्मनी व युरोप यांची होळी पेटविली.

●

**अँग्लो-अमेरिकन** भांडवलशाहींत भांडवलदारांच्या दृष्टीनें जे दोष होते ते नष्ट करून–म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्य, चढाओढ व कामगार संघटना नष्ट करून मुसोलिनीनें भांडवलशाही संघटित केली. या दोन भांडवलशाहींत फरक असेल तर पहिली व्यक्तिनिष्ठ भांडवलशाही व दुसरी संघटित भांडवलशाही या शब्दांनीं तो दाखवितां येईल. दोहोंतही बहुसंख्य समाजाची गुलामगिरी ही सामान्य बाब असून युद्ध हीच त्याची परिणति होती. मुसोलिनीनें भांडवलशाहींतले दोष भांडवलदारांच्या दृष्टीनें काढून टाकले व भांडवलशाही अधिक मजबूत व प्रभावी केली. उलट कार्ल मार्क्स या तत्त्वज्ञानें बहुसंख्य समाजाची गुलामगिरी नष्ट करण्यासाठीं भांडवलशाही पद्धति म्हणजे धनोत्पादन साधनांची खाजगी मालकी हीच नष्ट करण्याचा प्रचार केला. भांडवलशाहीनें उत्पादन साधनें सुधारलीं व उत्पादन साधन वाढविलें. यामुळें बहुसंख्य समाजास आतां उपभोग्य वस्तु, सुख व हित अधिक मिळविणें शक्य झालें. पण भांडवलदारास नफा मिळावा यासाठींच भांडवलदार उत्पादन करीत, मजुरांस मजुरी कमींत कमी मिळे, नवे बाजार भांडवलदारास न मिळाल्यास कामगारांस बेकारी येई आणि भांडवलदारास नवे बाजार हवे म्हणून मजुरांस रणांगणांत मरावें लागे, हे भांडवलशाहीचे ठळक परिणाम होते. म्हणून खाजगी मालकशाही म्हणजे धनोत्पादन–साधनें खाजगी मालकीत असणें हा प्रकार बंद करून धनसाधनें सार्वजनिक मालकींत आणावीं आणि त्यांचा वापर समाजहितार्थ करावा असें मत मार्क्सनें प्रतिपादिलें. मार्क्सच्या रशियन अनुयायांनीं या प्रकारची समाजघटना रशियांत निर्माण केली. एकुणतीस वर्षें तेथें ती वाढत्या क्रमानें अमलांत आहे.

●

**रशियांतील** या समाजव्यवस्थेस सोव्हिअट समाजवादी रचना म्हणतात. येथें धनोत्पादनाचीं साधनें समाजाच्या मालकीचीं असून समाजाच्या प्रतिनिधींकडून समाजासाठीं त्यांचा वापर होतो, हें समाजवादाचें तेथें ठळक लक्षण आहे. खेड्यांतील व शहरांतील प्रातिनिधिक ग्रामपंचायत उर्फ 'सोव्हिअट' हा या समाजरचनेचा पाया आहे. या समाजरचनेचें समग्र वर्णन आणि त्याची चर्चा मी येथें करणार नाहीं. फक्त फॅसीझमशीं त्याचे साम्य व विरोध काय आहेत हें पाहून 'सोव्हिअट पद्धति ही एक नवी गुलामगिरी आहे कीं काय' एवढें मला ठरवावयाचें आहे. फॅसीझम् व सोव्हिअट पद्धति या दोन्हीही सारख्या आहेत असा प्रचार केला जातो व तो खरा वाटतो; याचें कारण त्या दोहोंत कांहीं बाबी सारख्या आहेत. कामगार संघटना फॅसिस्ट राज्यांत मुळींच राहूं देण्यांत येत नाहींत. उलट सोव्हिअट राज्यांत कामगार संघटना देशव्यापी असून त्यांचे प्रतिनिधि राज्यकारभाराच्या क्षेत्रांतही घेतले जातात. मजुरांचे मजुरीचे दर ठरवून घेणें, कामगारांना सर्व प्रकारच्या शिक्षणाच्या सोई मिळवून घेणें, त्यांची राहणी अधिकाधिक उच्चतर करणें, हीं कामें कामगार संघटना करूं शकतात. फॅसिस्ट राज्यांत व सोव्हिअट राज्यांत संप करणें हें बेकायदेशीर असून श्रम करण्याची दोहींकडेही सक्ती आहे. पण फॅसिस्ट राज्यांत समाजानें श्रम हे राज्यकर्त्या भांडवलदारवर्गाच्या साम्राज्य लोभासाठीं केले जात असतात तर सोव्हिअट राज्यांत समाजानें श्रम समाजाच्या हितासाठींच असतात. फॅसिस्ट राज्यांत भांडवलदारांना परकी बाजार जिंकता यावे यासाठीं धनोत्पादन होतें. सोव्हिअट राज्यांत लोकांच्या गरजा भागवून त्यांचें राहणीचें मान वाढविणें हें उत्पादनाचें ध्येय व धोरण असतें. व्यक्तिस्वातंत्र्य हें अगदीं जुन्या अर्थानें आज कोठेंच नाहीं. उत्पादन व युद्ध या दोहोंचीं साधनें प्रचंड झालीं आणि त्यामुळें जीवन सामुदायिक झालें. यामुळें मोकाट व्यक्तिस्वातंत्र्य हें जगभर अशक्यच झालें आहे. भांडवलशाहीनें प्रचंड उत्पादन–साधनें निर्माण केलीं. पण त्यांचा वापर चढाओढीच्या व खाजगी नफ्याच्या ओढीनें केल्यामुळें जगभर आर्थिक क्षेत्रांत बेबंदशाही व अव्यवस्था माजली. अनवस्थेच्या राशीशेजारीं उपाशी व उघडी जनता तडफडून मरूं लागली. फॅसिस्टांनीं व समाजवाद्यांनीं चढाओढ आणि व्यक्तिस्वातंत्र्य नष्ट करून आणि उत्पादनाची पूर्व योजना आंखून ही बेबंदशाही थांबविली. पण फॅसिस्टांनीं मूठभर भांडवलदारांसाठीं व सत्ताधाऱ्यांसाठीं सर्व समाजास गुलामाप्रमाणें राबविलें तर सोव्हिअट राज्यांतली राबणुकीची सक्ती समाजावर समाजासाठींच लादण्यांत आली होती. आज रशियांत नेमकें काय चाललें आहे व काल जर्मनींत काय चाललें होतें हें मलाच काय पण कुणालाच नीटसें माहित नाहीं. तथापि फॅसिस्ट पद्धति व सोव्हिअट पद्धति यांतील तात्त्विक फरक जो वर सांगितला तो महत्त्वाचा असून व्यवहारांत तो कायम ठेवण्याची दक्षता घेतल्यास सोव्हिअट पद्धतीनें सर्व समाजाचें सुख, हित व संस्कृति खास वाढत जाईल असें माझें म्हणणें आहे.

●

**फॅसिस्ट** सत्ता व सोव्हिअट सत्ता या दोहोंत जें प्रचंड उत्पादन होतें त्यामुळें प्रचंड कारखान्यांचे व्यवस्थापक म्हणजे चालक यांचें वर्चस्व समाजांत फार माजलें. जर्मनी व रशिया या दोन्ही देशांत हा चालक वर्ग मोठा प्रतिष्ठावान असून त्याचे पगार समाजांतील इतर कोणाहीपेक्षां बरेच वरचढ असत. समाजाच्या केन्द्रस्थानीं हा वर्ग सत्ताधीश राहून समाजाला असलेल्या लगामीं ठेवण्याचा प्रयत्न करील हें अगदीं स्वाभाविक आहे. हा चालकवर्ग आपली वर्गीय सत्ता व लक्ष

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

मिळकत कायम टिकविण्यासाठीं इतरांना सत्तापदापासून दूर ठेवील व म्हणून फॅसिस्ट व सोव्हिअट हे दोन्ही समाजप्रकार चालकशाहीचें रूप धारण करतील असें कांहीं लोकांचें म्हणणें आहे. फॅसिस्ट समाजरचनेबाबत हा आरोप खरा ठरेल, कारण मूठभर संघटित भांडवलदारांचें धनोत्पादनकार्य या भांवडलदारांचे हातून काढून तज्ज्ञ चालक वर्गाकडे देण्यांत येते. यामुळें भांडवलदार वर्गाचें कर्तृत्व दिवसानुदिवस खालावत जातें. आणि बहुसंख्य समाजास घाण्याच्या बैलाप्रमाणें भांडवलदारी उत्पादनासाठीं एका चाकोरींत चालविण्यांत येते. अशा समाजांत चालकशाही वाढूं लागेल हें स्वाभाविक आहे पण सोव्हिअट समाजांत चालकशाही टाळतां येईल. कामगारांची प्रातिनिधिक संघटना हें सोव्हिअट राज्यांत कामगारांचें म्हणजेच जनतेचें मोठें सामर्थ्य आहे. त्यामार्फत निदान दोन गोष्टी साधतातच. चालकवर्गाला जें विशिष्ट शिक्षण देण्यांत येतें तें समाजांतील कोणासही मिळण्याची सोव्हिअट राज्यांत सोय असून चालकत्वाच्या दर्जास योग्य असे तज्ज्ञ कामगार वाढत्या संख्येनें निर्माण करणें हें कामगार संघटनेचें ध्येय राहतें आणि चालकत्वाच्या दर्जाची माणसें गरजेपेक्षा अधिक झालीं कीं त्यांचे पगार खालच्या पातळीवर आणणें शक्य होतें. चालकांचा वर्गही कप्पाटबंद रहात नाहीं, कारण शिक्षण व अनुभव यांच्या वाढत्या सोईमुळें सर्व समाजांतून चालकत्वाच्या पदासाठीं माणसें पुढें आणलीं जातात. तसेंच समाजाची संपत्ति वाढेल त्या प्रमाणांत सर्वांचीच मिळकत व फुरसत वाढविण्याचा प्रयत्न समाजवादी पद्धतींत होत असल्यानें अमुक एका वर्गास अवास्तव मिळकत असा प्रकार फार काळ टिकणार नाहीं. फॅसिस्ट समाज व सोव्हिअट समाज या दोहोंत अनुक्रमें धनोत्पादनाचीं साधनें भांडवलदाराच्या मालकीचीं असून भांडवलदारासाठीं त्यांचा वापर होणें आणि तीं समाजाच्या मालकीचीं असून समाजासाठीं त्यांचा वापर होणें असा महत्त्वाचा फरक आहे. पहिल्यांत चालकशाही निर्माण होणें शक्य आहे. पण दुसऱ्यांत समाजाचें राज्य, समाजाकडून, समाजासाठीं चालविलें जाणार असल्यानें चालकशाही टाळणें मुळींच अशक्य नाहीं. जागृत अशा जनतेनें समाजवादी घडी टिकविण्याचा प्रयत्न मात्र केला पाहिजे.

---

सतत ३०-३२ वर्षें अनुभवून हजारों लोकांस रोगमुक्त केलला

## शक्तिवर्धक धातुपौष्टिक पाक

कडकीमुळें धातू लघवींतून जाणें, स्वप्नावस्था, स्त्रीसंग, अतिजलद, मुष्टिमैथुनामुळें, अतिस्त्रीसंगामुळें आलेलें नपुंसकत्व, इंद्रियशिथिलता, गर्मी, परमा, ॲनिमिया, अशक्तपणा वगैरे नाहींसें होऊन धातु घट्ट बनते. शौचास साफ होऊन भूक लागते. कामशक्ति जारांत वाढते. तरुणांना येईलच यांत आश्चर्य नाहीं; पण ८०-९० वर्षांच्या वृद्धांनींहि घेतल्यास पहिल्या पंचविशीची मजा केल्याशिवाय रहाणार नाहींत. स्त्रियांचें सर्व रोग, तांबडी-पांढरी धुपणी, मुलें न होणें व होऊन मरणें वगैरेवर हा रामबाण आहे. संतति होण्यास मदत होते यांत अनेक वनस्पति व भस्में, सुवर्णमालिनी, वसंतमालिनी वगैरे मौल्यवान औषधें मिक्स केलीं आहेत. नं १ किं. रु. १० सात दि. गुण. नं. २ किं. ६. पंधरा दि. गुण. स्पेशल डबा श्रीमंत शेठ-सावकाराकरितां किं. रु. १५ चोवीस तासांत गुण. यांत पुष्कळ जोदार मौल्यवान औषधें मिश्र केलीं आहेत; यास पथ्य नाहीं. एक डबा २८ दिवस पुरतो. दोन डबे घेणारास पो. खर्च माफ. चार डबे घेणारास एक डबा बक्षीस. गुणाबद्दल असंख्य सर्टिफिकिटें आहेत.

पत्ताः—मॅ. डी. एस. एण्ड को. औषधालय

मुं. पो. मिरज बॉ. नं ८

## विश्वभारती इन्शुअरन्स कंपनी लि.

नोबल चेंबर्स, पारशी बझार स्ट्रीट, फोर्ट, मुंबई.

**आग, आयुर्विमा, मोटार, अपघात, मरिन वर्कमेन्स कॉंपेन्सेशन**

आजच्या गंभीर परिस्थितींत विमा उतरविणें अत्यंत आवश्यक आहे. कुटुंबवत्सल लोकांचे तर तें आद्य कर्तव्य आहे. विश्वभारती विमा कंपनी आपणांस सर्व काळजींतून मुक्त करील अशी आम्ही आपणांस ग्वाही देतों.

| अधिकृत भांडवल | विक्रीय भांडवल | वसूल भांडवल |
|---|---|---|
| रु. २५,००,००० | रु. १२,००,००० | रु. ८,७५,००० |

चेअरमन व मॅनेजिंग डिरेक्टर श्री. **रामराव गणपतराव विजयकर,** मॅनेजिंग डिरेक्टर श्री. **चंद्रशंकर गि. द्विवेदी**

बाहेरगांवी त्याचप्रमाणें मुंबईमध्यें एजन्सीसाठीं लिहाः—

ब्रॅंचिस व ऑर्गनायझिंग ऑफिसेस—अहमदाबाद, सुरत, नागपूर, पुणें, मद्रास, गुंतूर, कलकत्ता, मंगलोर, कराची, बडोदे, भडोच, भावनगर.

अनुक्रमणिका




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




: लेखक :
चं. वि. बावडेकर



खिलाफतीच्या चळवळीतले ते दिवस होते.

शहरांतल्या कांहीं मिश्र पुढाऱ्यांचे, म्हणजे कॉंग्रेसवाल्या हिंदूंचे आणि खिलाफतवाल्या मुसलमानांचे पाय त्या निमित्तानें आमच्या खेड्याला लागले.

गांवच्या चव्हाट्यावर त्यांची मोटार थांबली, तासभर त्यांनीं तिथें व्याख्यान दिलें आणि व्याख्यान संपतांच भर्रकन् त्यांची मोटार पुढच्या मुक्कामाला निघून गेली.

पण त्यांच्या त्या तासाभराच्या व्याख्यानानें आमच्या निद्रित खेड्यांत प्रचंड जागृती घडवून आणली. "टिळक महाराज की जय" हा त्या वेळपर्यंतचा सार्वजनिक प्रसंगींचा घोष लुप्त होऊन त्याची जागा "अल्ला–हु–अकबर" या घोषानें पटकावली आणि गांवांतल्या मुसलमान वाड्यांत हिंदी राजकारणाबद्दल भलतीच आस्था आणि आत्मीयता निर्माण झाली.

म्हामूद शिंप्यानें आपल्या वाड्यांत वर्गणी गोळा करून मुंबईहून एक उर्दू पत्र सुरूं केलें.

—पण कोणालाच तें वाचतां येत नसल्यामुळें त्याचे अंक फक्त फोडले जाऊन ते तसेच घरच्या घरीं साचूं लागले.

त्या रद्दीकडे एके दिवशीं भाविकपणें पहात असतां म्हामूदच्या मनांत अचानक एक विचार चमकून गेला. "बस्स ठरलें, चालू सालापासून आपल्या या गांवांत ताबूत सुरू करायचा. कांहीं तरी चळवळ पाहिजे. स्वस्थ राहून उपयोगी नाहीं."

इस्माइल ताशेवाला आणि हुसेन खाटीक यांचा त्यानें विचार घेतला. ही कल्पना त्यांना मान्य झाली. इतरांनीं माना हालविल्या आणि मुसलमान वाड्यांतलीं पोरें खूष होऊन त्यानंतर दोनचार दिवसांनीं ओरडूं लागलीं, "आमच्या गांवांत ताबूत–आमच्या दादाचा ताबूत."

चिल्हेद जाऊन मोहिरम जवळ येऊं लागला. पांच कोसावर असलेल्या तालु-

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

त्याच्या गांवीं ताबूत बांधण्यांत कुशल असलेल्या चांद साहेबाला म्हामूद शिंप्यानें मोठ्या सन्मानानें मुद्दाम बोलावून आणलें आणि त्यांच्या खास देखरेखीखालीं ताबूताचें काम सुरू झालें.

रोज शाळा सुटल्यावर आम्ही विद्यार्थी मुसलमान वाड्यांत जाऊन म्हामूद शिंप्याच्या मांगरांत तयार होणारा ताबूत मोठ्या कुतुहलानें पाहूं लागलो.

ताबूताच्या कामट्या हळुं हळुं अदृश्य होऊन त्यावर कागद चढले. चित्रविचित्र रंगाच्या कागदांनीं नंतर तीं रद्दी झांकून जाऊं लागलीं आणि शेवटीं वर्खी कागदांनीं तो चकाकूं लागला. ताबूताचा डौलदार घुमट आणि चारी बाजूंचे मिनार दृष्ट लागण्याएवढे सुंदर वाटले आम्हाला.

ताबुताची रीतसर स्थापना झाली. जळणाऱ्या उदानें वातावरण धुंद झालें. नऊ दिवसांनीं तो उचलला गेला आणि थंडा करण्यासाठीं त्याची मिरवणूक आम्हां बालगोपाळांच्या मेळ्यांत रस्त्यानें जाऊं लागली.

—पण मिरवणूक ग्राम देवाच्या देवळासमोर येतांच अग्रभागीं चालणारा हुसेन खाटीक एकदम थबकून उभा राहिला. " म्हामूद, म्हामूद, ए इस्मैल " त्यानें हांक मारली. मिरवणुकीला थांबण्याचा इशारा दिला. म्हामूद, इस्माइल आणि हुसेन यांनीं सचिंत चेहऱ्यानें आपापसांत कांहीं खलबत केलें. लगेच हुसेननें आमच्यापैकीं एका विद्यार्थ्याला देवळांत पिटाळलें. आणि नाना गांवकराला बोलावून आणायला सांगितलें.

म्हातारा नाना गांवकर थोड्या वेळानें काठी टेकीत टेकीत रस्त्यावर आला. " कायरे हुसेन, गडबड कसली ? " त्यानें विचारलें.

" काय नाय नाना, " हुसेन अजीजीच्या स्वरांत म्हणाला, " देवा येतोबाक् जरा गाराणा घालूंचां आसा त्येका म्हणूंचां, देवा आमी ह्या लेकरांनीं नव्या काम घेतलासा, त्येच्यावर तुजी कृपा दिइटी ठ्येव. हो घ्या नाल ही साकार "

नाना गांवकर हंसला. हुसेन, म्हामूद आणि इस्माइल यांना घेऊन तो सभामंडपाकडे गेला. बाहेर त्यांना उभे करून नारळ साखर घेऊन तो गाभाऱ्यांत शिरला. गुरवाला हांक मारून समईची मिणमिणती ज्योत मोठी करविली आणि गाभाऱ्याच्या उंबरठ्यावर नारळ साखर एका तबकांत ठेऊन वेतोबाला त्यानें गाऱ्हाणें घातलें, " देवा येतोबा, आमच्या ह्या मुसलमान लोकांनीं यंदापासून ताबूत सुरू केले हा, ह्या काम तुजांच आसाऽ असां समजून तां गोड करून घे आणि तेंकां यश देवन् सुक्षमपणान् आपली सेवा दरसाल करून घे. ही तुजींच लेकरां आसत. पाव बाबा येतोबा."

नानानें नारळ फोडला. तो तबकांत ठेवला, दोनचार फुलें गुरवाकडून मागून घेतलीं आणि तबक घेऊन तो बाहेर आला.

" ध्येस घातल्यात मां नाना गाराणां ?" म्हामूदनें विचारलें.

" होय अगदीं चोख " नाना म्हणाला.

" मग वाटा तर चिरागी (खिरापत)" इस्माईलनें सांगितलें.

फोडलेल्या नारळाची खिरापत करून नानानें ती सर्वांना वाटली. हुसेन, म्हामूद आणि इस्माइल यांना हायसें वाटलें. त्यांचे चेहरे प्रफुल्लित झाले. " चला तर आतां तळीकडे " ते म्हणाले आणि थांबलेली मिरवणूक पुनः चालूं लागली.

" अल्ला—हु—अकबर " या घोषांत ताबूत तळीकडे निघाला.

———


कुटुंबांत संग्रह करण्यास, मंगल प्रसंगीं आहेर देण्यास, प्रेमांतील व्यक्तींना भेट देण्यास—

**अत्यंत योग्य पुस्तकें कोणतीं ?**

असा प्रश्न केल्यास त्यास सर्वांकडून एकच उत्तर मिळतें

**श्री. नारायण हरी आपटे**

**यांचीं पुस्तकें.**

गृहसौख्य, सुगरिणीचा संसार, संसारांत प. पूर्वी, आम्ही दोघं, लोकमित्र, एकटी, साजणी, इत्यादि पुस्तकें सर्वत्र मिळतात.

**आपटे मंडळी ग्रंथ प्रकाशक**
**पुणें २.**




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



: कवि :

शान्ताराम आठवले

अरे पाटलाच्या पोरा–ज़रा जपुन जपुन !
मी घेऊन माझी गुरं
येताजातांना शेतावर
आम्बेराईच्या वळणावर
कां बसतोस चोरा – टपुन टपुन !
तुझ्या मळ्यांतल्या विहिरीवर
मी भरतांना घागर
पाणी उडवुन अंगावर
पदराला नको धरूं – लपुन छपुन !
कुस्तीचा मारूनी फडं
तू जितुन सोन्याचं कडं
येशी मिरवत गांवाकडं
रूप बघुन जाते राया – दिपुन दिपुन !
ने प्रीत सख्या शेवटा
झाला गांवांत लई बोभाटा
लावुं नको कुळाला बटा
लग्नाआधीं राया जरा – जपुन जपुन !
अरे पाटलाच्या पोरा जरा जपुन जपुन !


For Reliable Supply
Of
Railway Engineering Material

SEE

# NEW ENGINEERING WORKS

Govt. & Railway Contractors

: *Specialists in* :

**Signalling Kent Couplers & Interlocking-Vaccuum Brakes-Head-Lights-Fittings Etc.**

NEW ENGINEERING
WORKS

Ambewadi-Opp. Majestic Cinema
F, Block, 1st Floor, GIRGAUM
BOMBAY.

P. O. Box, 3572—Bombay.

GRAM:—"EVERSOUND"


अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

( पान २७ वरून चालू )

म्हणून ती आंत गेली. विनायकच्या शेजारच्या खुर्चीवर ती बसली. पण ती मनाशीं सारखी विचार करीत होती, मनोहर कां बरं आला नाहीं ?....

●

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्याबरोबर तिनं मनोहरला टेलिफोन केला असता. परंतु ती फोन करणार कुठें ? तिला फक्त एवढंच माहित झालं होतं कीं ज्या हॉटेलांत मनोहर उतरला होता तें मेट्रो सिनेमापासून जवळच होतं. पण हॉटेलचं नांव मनोहरनं सांगितलं नव्हतं आणि फोनवरच्या त्या घाईच्या संभाषणांत तिनंहि तें विचारलं नव्हतं. मग ती फोन करणार कुठें ? मनाशीं चरफडत ती स्वस्थ राहिली. मनोहरचाच कदाचित् फोन येईल असें तिला वाटत होतें. आणि कदाचित् तो प्रत्यक्ष आपल्याला भेटायला येईल अशी अंधुक आशाहि तिच्या मनांत डोकावत होती.

तिची ती आशा खरी ठरली. मनोहर तिच्याकडे आला. पण फार उशीरां. आणि तो येऊं नयेसं तिला वाटत होतं अशा वेळीं. मनोहर तिला भेटायसाठी आला तेव्हां विनायक तर हजर होताच, पण खोलींत पांच सहा पुरुषांचं कोंडाळं पडलेलं होतं. त्यांत विनायक बरोबर तिच्याकडे वारंवार येणारे त्याचे दोन स्नेही होते, आणि तिच्यासारख्या तरुण स्त्रियांशीं नुसत्या चकाट्या पिटायला मिळाल्या अन् चहा प्यायला मिळाला तरी पुष्कळ झालं अशा हिशेबानं लघटपणा करणारे पुष्कळ पुरुष असतात त्यांतले बाकीचे होते.

या कोंडाळ्यांत ती बसलेली असतांना मनोहर आलेला पाहून गुलाबला कांहीं बरं वाटलं नाहीं. जमलेल्या साऱ्या मंडळींना एकदम निरोप देणें तिला शक्य नव्हतं. मनोहरशीं एकीकडे बोलायला मिळायला पाहिजे अशी तिच्या जिवाला ओढ तर लागलेली होती. तिनं विनायकचा व इतर मंडळींचा परिचय करून दिला, मनोहर आपल्या जागीं बसला. बाकीच्या मंडळींच्या गप्पा पुन्हां पूर्ववत सुरूं झाल्या. त्यांत भाग घेणें मनोहरला शक्य नव्हतं. मनाशीं तो आश्चर्य करूं लागला, कीं दोन वर्षांत गुलाब इतकी पालटली कशी ? घरांत चार पुरुष जमवून वायफळ गप्पा ऐकत बसलेली ती त्याला पूर्वीं कधींच आढळलेली नव्हती......

आदल्या रात्रीं त्याला जो धक्का बसला होता तो आतां दसपटीनें वाढला. रात्रीं गुलाबनं त्याची फार वाट पाहिली व ठरल्याप्रमाणें तो सिनेमाच्या थिएटरवर आलाच नाहीं असं तिला वाटलं होतं. परंतु खरा प्रकार घडला होता तो निराळा होता. मनोहर थिएटरवर आला होता. पण त्याच्या दृष्टीस गुलाब पडली होती ती विनायकजवळ अगदीं अंगाला अंग खेचून उभी राहिलेली. तो तिच्याशीं हंसत कांहींसं बोलत होता, आणि तिच्या साडीची पीन तो नीट बसवित होता. त्याचं तोंड अगदीं तिच्या तोंडाजवळ गेलेलं होतं. तें दृश्य पहातांच मनोहरच्या मनांत आलं होतं, ही पूर्वीची आपली गुलाब नव्हे ! ही आतां आपली राहिलेली दिसत नाहीं. ही दुसऱ्याची झालेली दिसते...त्याच्या अंतःकरणाला चमत्कारिक वेदना झाली होती. ती होऊं देणं बरं नव्हे हें त्याला कळत होतं. परंतु तरीहि ती त्याला दूर करतां आली नव्हती. गुलाबची भेट घेण्याची जी विलक्षण अधीरता त्याच्या मनांत आज कित्येक दिवस सांठली होती ती एकदम दुखावली गेली होती. तो थिएटर पर्यंत चालतच आला होता. त्याचं मन पालटल्याबरोबर नकोच ते पुढें होणं आणि गुलाबला भेटणं असं वाटल्यामुळें तो परत फिरला होता....

आज आतां जेव्हां तो तिच्या भेटीला आला तेव्हां ती एकटी असती तर हा खुलासा त्यानं केला असता. परंतु ती एकटी नव्हती. तें पाहून तो मनांतल्या मनांत रागावला होता. आणि तिच्याभोंवती जमलेल्या टोळक्याच्या फालतु गप्पा कांहीं केल्या संपेनात व आपल्या वाट्याला गुलाब एकटी येईल असा संभव त्याला दिसेना तेव्हां त्याच्या मनांतली चीड फारच वाढली. पुन्हां पुन्हां त्याच्या मनांत येत होतं, ही निराळी गुलाब आहे !

ही निराळी गुलाब त्याला मुळींच नको होती ! हा कोण विनायक नांवाचा जो तरुण पुरुष आहे त्याच्या प्रेमांत जर ती सांपडली असेल तर स्वतःचं प्रेम केवळ पूर्वसंबंधाच्या हक्कावर तिच्यावर लादण्याची त्याची मुळींच इच्छा नव्हती. या गप्पीदास मंडळींच्या सहवासांत तिला जर सुख होत असेल तर त्यांतून तिला ओढून काढून स्वतःच्या सन्निध आणण्यास तो उत्सुक नव्हता. एकतर तो स्वाभिमानी होता, आणि शिवाय गुलाबच्या सुखांत व्यत्यय कां आणावा असं वाटण्याइतकं त्याचं तिच्यावर प्रेम होतं....

चहा आला तेव्हां इतर मंडळींबरोबर त्यानं तो घेतला, आणि लगेच त्यानं गुलाबचा निरोपहि घेतला.

जो प्रकार घडला होता तो गुलाबला अतिशय तापदायक होत होता. पण तो तिला आवरतांहि येत नव्हता. तिचा जीव खरोखर अगदीं गुदमरून गेला होता. त्यामुळें मनोहरनं तिचा निरोप घेतला त्यावेळीं तिला धड बोलतांहि आलं नाहीं. आतां आपणच त्याच्या हॉटेलवर जाऊन त्याला भेटलं पाहिजे असं तिनं मनाशीं ठरविलं. तिनं त्याच्या हॉटेलचं नांव आणि पत्ता विचारून घेतला.

पण संध्याकाळीं सवड सांपडतांच ती जेव्हां हॉटेलमध्यें गेली तेव्हां मनोहर निघून गेल्याचं तिला समजलं.

तीन दिवसांनीं तिला मनोहरचं पत्र आलं. त्यांत चार ओळीचाच मजकूर होता. त्यानं लिहिलं होतं,

" मी आपल्या गांवीं निघून आलों आहे. माझ्या प्रेमाची तुझ्यावर बळजोरी करण्याची माझी यत्किंचित इच्छा नाहीं. तुझ्या सुखांत माझ्या प्रेमाचा मी व्यत्यय आणावा हेंहि मला रुचत नाहीं. तूं सुखात असावंस एवढीच माझी नेहमीची इच्छा आहे. "

●

मनोहर आपल्या गांवीं म्हणजे नेरळला आला होता. तिथें त्यांची थोडीशीं शेतवाडी होती. त्याचं लहानपण या छोट्या गांवांत गेलं

अनुक्रमणिका
मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

होतं. लहानपणीं आजुबाजूच्या शेतांतून, रानां-तून, आणि टेकड्यांवरून तो भटकला होता. या भागांतली वनश्री त्याला प्यार होती. इथें आपल्या निराशेचा आपल्याला विसर पडेल अशी त्याची कल्पना होती. म्हणून तो धाईनें इकडे निघून आला होता. इकडे आल्यावर कधीं आपल्या धाकट्या भावाला बरोबर घेऊन तर कधीं एकटा तो सकाळसंध्याकाळ भटकत असे. सकाळच्या वेळीं तो त्याच्या गांवालग-त्ची माथेरानची टेकडी अर्धीअधिक चढून जाई आणि परतल्यावर पायथ्याशीं एक विस्तीर्ण वृक्ष होता त्याच्या छायेंत बसून रहात असे. समोर दोन डोंगराच्या मधल्या छोट्याशा खोऱ्यांत छोटीं छोटीं शेतं पसरलेलीं त्याला दिसत. मधूनच झाडाचे शेंडे वर आलेले असत. छोट्या नदीचे पाणी उन्हांत चमकत असे. पुष्कळच वर सरकलेल्या सूर्याच्या प्रकाशांत त्याच्या नजरेसमारची सृष्टि अगदीं स्तब्ध शांत भासत असे......

आज तो असाच एकटा बसलेला असतांना त्याचा चवदा पंधरा वर्षांचा भाऊ त्याच्याकडे धाईनें येत असलेला त्याला दिसला. तो जवळ आल्यावर मनोहरनं त्याला विचारलं,

"काय रे?"

त्याचा भाऊ धापा टाकीत त्याच्यापुढें उभा राहिला होता. तो म्हणाला, "लवकर घरीं चल."

"कां?"

"आतांच्या गाडीनें कुणी पाहुणे आले आहेत. आमच्या ओळखीच्या नाहींत त्या."

"त्या! म्हणजे कोणी बाई आहेत कीं काय?"

"होय–चल लवकर घरीं."

घरीं परत येऊन मनोहरनं आंगणांत पाऊल टाकलं आणि समोर पाहिलं तो ओटीवरच्या वाघाच्या कातड्यानं आच्छादलेल्या आराम खुर्चींत गुलाब बसलेली त्याला दिसली! त्याला पहातांच ती हंसली. तोहि हंसला. आणि ओटीच्या पायऱ्या चढतां चढतां तो फक्त म्हणाला,

"तुम्ही होय?"

त्याचा धाकटा भाऊ आंत गेलेला दिस-तांच गुलाब भुंवया चढवून त्याला म्हणाली, "मला 'तुम्ही' केव्हांपासून म्हणायला लाग-लांत? मी 'तुम्ही' झालें होय?"

मनोहरला मोठ्यांदा हंसूं आलं. "माझ्या तोंडून सहज शब्द गेला. माफ कर. पण तूं येशील हें ध्यानींमनींसुद्धां नव्हतं."

ती म्हणाली, "तूं असा घरीं निघून येशील हें माझ्यातरी कुठं ध्यानींमनीं होतं?" तिनं आपली बॅग उघडली, त्याचं तें चार ओळींचं पत्र काढलं, त्याच्यापुढें धरलं आणि म्हटलं, "याचा अर्थ विचारायला आलेय मी."

"त्याचा अर्थ उघड आहे."

"मोठा शहाणा आहेस! लढाईवर जाऊन हेंच शिकलास वाटतं?"

●

संध्याकाळीं डोंगर चढून जाऊन तीं दोघं जेव्हां एके ठिकाणीं बोलत बसलीं तेव्हां मनोहरनं आपले सारे विचार गुलाबला मनमोकळेपणानें सांगितले, आणि तो म्हणाला, "ते विनायकराव म्हणून जे कोण गृहस्थ आहेत त्यांच्याशीं तूं लग्न करणार असलीस तर तें मी तुला मोडायला लावावं असं मला वाटत नाहीं."

गुलाब म्हणाली, "त्याबद्दल मग सांगणार आहे मी तुला. पण आधीं मला हें सांग, तूं एकदम नाहींसा कुठें झाला होतास? माझ्या बाबांनीं तुझी बातमी काढायसाठीं किती प्रयत्न केला तुला माहित नाहीं. तुझा ठावठिकाणासुद्धां आम्हांला कळूं नये असा कुठें नाहींसा झाला होतास तूं? आणि कां?"

क्षितिजाकडे झुकलेल्या सूर्याचे किरण तिच्या अगदीं डोळ्यांवर आले होते म्हणून तिनं आपला उजवा तळवा थोडा वांक करून कपाळाखालीं धरला होता. तिच्या गोऱ्यापान बोटांच्या फटींतून लालसर रंग पसरला होता. त्याकडे पहात मनोहर कांहीं वेळ गप्प बसला आणि नंतर बोलूं लागला.

त्यानं जी हकिकत सांगितली ती गुलाबला फार अद्भूत वाटली.

तो ज्या पलटणींत होता ती आघाडीवर खडी झाली असतांना समोरून सुभाष बाबूंच्या आझाद हिंद फौजेची एक तुकडी चालून आली होती, आणि तिनं चकमक सुरू करण्याऐवजीं या पलटणींतल्या लोकांना दिसेल अशा बेतानं एक पाटी उंच करून दाखविली होती. त्या पाटीवर लिहिलं होतं, "हिंदी सैनिकांनो, आमच्याविरुद्ध लढण्या-ऐवजीं आम्हांला येऊन मिळा! यांतच मायदेशाची खरी सेवा आहे!" याला उत्तर म्हणून मनोहर ज्या पलटणींत होता तिनं एक पाटी उंच करून दाखविली कीं "तुम्ही जपान्यांचे हस्तक म्हणून त्यांच्या हुकमती-खालीं लढत आहांत. तुम्ही हिंदुस्थानचे खरे मित्र नव्हे!" आझाद हिंद फौजेनं पुन्हां पाटी उभारली, "आम्ही जपान्यांच्या हुकमतीखालीं लढत आहोंत हा तुमचा समज साफ चुकीचा आहे. हिंदुस्थान स्वतंत्र व्हावा म्हणून लढणारे आम्ही स्वतंत्र शिपाई आहोंत. आम्हांला येऊन मिळा!" ही पाटी दिसूं लागल्याबरोबर मनोहरच्या हिंदी पलटणीला एकदम मोहरा फिरवून परत-ण्याचा हुकूम लष्करी अधिकाऱ्यांकडून देण्यांत आला, आणि त्या जागीं गोरी फौज आणण्यांत आली.

पण या प्रकारानं मनोहरच्या आणि त्याच्यासारख्या इतर कांहीं हिंदी सैनिकांच्या मनांत क्रांति झाली होती. यापूर्वी कित्येक दिवसांपासून ते मोठ्या रोमांचकारक बातम्या ऐकत होते. सुभाष बाबू ता. २ जुलै १९४३ रोजीं सायगांव येथें येऊन हिंदी चळवळीचीं सूत्रें त्यांनीं हातांत घेतल्यापासून नानाप्रकारच्या कमी अधिक आश्चर्यकारक बातम्या मनोहरच्या छावणीपर्यंत हलके हलके पसरून येऊन पोंचत असत. या बातम्या येऊन पोंचूं नयेत म्हणून सैन्याच्या अधिकाऱ्यांनीं घेतलेली दक्षता वाया जात असे. मात्र या बातम्या येऊं लागल्या-पासून त्यांत अशीहि एक वदंता वारंवार मिसळलेली असे कीं हिंदुस्थानांतून ब्रिटिश लोकांना हांकून देण्यासाठीं सुभाषचंद्र बोस हे जपान्यांचे हस्तक बनले आहेत. आपला देश ब्रिटिशांच्या हातून




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# मित्राच्या नाशाला कधीं कधीं मित्रच कारणीभूत होतो—

हरिश्चंद्र पिक्चर्सचा हिंदी संगीत बोलपट

—दिग्दर्शक—

एस्. एम्. युसुफ



# दरम्यान

भूमिकाः—कौसल्या, कुमार, याकूब, सुलोचना चटर्जी, नारंग, शाकीर, मधुसूदन.

कमल व ब्रॉडवे मध्यें गाजलेलें चित्र

लौकरच तुमच्या शहरीं दाखल होणार—

प्रकाशकः—पिअरलेस पिक्चर्स, मुंबई ४






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

काढून ते जपान्यांचे हातीं देणार आहेत. ते कांहीं आपला देश स्वतंत्र करणार नाहींत. फक्त आपल्या देशाचा विक्रय करून जपान्यांकडून मोठं बक्षिस मिळविणार आहेत. तशा प्रकारचे करार त्यांच्यांत व जनरल टोजोमध्यें झालेले आहेत. या वदंतेवर मनोहरचा व इतरांचा विश्वास बसत नसे. पण ती इतकी दाट होती व इतकी वरचेवर त्यांच्यापर्यंत येऊन पोंचत होती कीं त्यांना वाटूं लागे त्याचा काय नेम, सुभाषबाबू जपान्यांचे हस्तक बनले असतीलहि. आणि मग त्यांच्या मनांत येई, असं असेल तर सुभाषबाबू जी फौज उभारीत आहेत तिच्यांत जाऊन मिळण्यांत काय अर्थ आहे? परंतु हा विचारहि त्यांना पटत नसे. सुभाषबाबू आपल्या देशाचं स्वातंत्र्य जपान्यांना विकतील व त्यांचे केवळ हस्तक बनतील या कल्पनेवर विश्वास ठेवणं त्यांना जड जाई...अशा द्विधा मनस्थितींत या लोकांनीं दहा महिने घालविले होते. आणि अखेर आतां त्यांची पलटण आझाद हिंद फौजेशीं सामना देण्यासाठीं उभी टाकली तेव्हां त्यांना सत्य कळलं होतं! आतां ब्रिटिशांच्या लष्करी नोकरीवर लाथ मारून आझाद हिंद फौजेंत दाखल होणं हेंच आपलं कर्तव्य होय अशी त्यांची खात्री पटली होती!...

रात्रीच्या गडद अंधाराचा आश्रय घेऊन या मंडळींनीं छावणी सोडली आणि पलीकडे आझाद हिंद फौजेचा तळ पडला होता त्या ठिकाणीं जाऊन ते दाखल झाले. तेव्हांपासून त्यांचा आणि त्यांच्या हिंदुस्थानांतील आप्तेष्टांचा संबंध अजिबात तुटला!...आठ दहा महिने ते आझाद हिंद फौजेंतून लढले. परंतु पुढें अमेरिकन सैन्यानं जपानवर निकराचे हल्ले सुरू केल्यावर जपाननं आपली सर्व लढाऊ शक्ति आपल्या देशाच्या रक्षणासाठीं केंद्रित केली. जिंकलेले मुलूख ते भराभर सोडून देऊं लागले. ही लाट होतां होतां रंगूनपर्यंत येऊन थडकली. आझाद हिंद फौजेला जपान्यांचा जो पाठिंबा होता तो पार नाहींसा झाला. ब्रिटिशांनीं रंगून पुन्हां हस्तगत केलं. सुभाषबाबूंना १९४५ सालीं एप्रिल महिन्याच्या २४ तारखेस रंगून सोडून विमानानं बँकॉकला जाणं भाग पडलं. सारंच पारडं फिरलं हलके हलके आझाद हिंद फौजेंतले हिंदी सैनिक हिंदुस्थानांत परत आले...

ही सारी हकिकत सांगून मनोहर गुलाबला म्हणाला, "मी परत आलों तो किती चमत्कारिक मनस्थितींत आलों असेन त्याची तूंच कल्पना कर. खरं म्हणजे मी माझ्या मायदेशाला परत आलों होतों. परंतु या गोष्टीचा आनंद किंचित्‌सुद्धां होत नव्हता. उलट ज्या अवस्थेंत मला आणखी माझ्याच सारख्या इतर सैनिकांना रंगून सोडून इकडे यावं लागलं होतं त्या अवस्थेची एक प्रकारची शरम वाटत होती. ज्या आम्ही 'चलो दिल्ली' अशा घोषणा केल्या होत्या, हिंदुस्थानला स्वतंत्र करण्याची स्वप्नं रचलीं होतीं, पारतंत्र्यांतून मुक्त केलेल्या आपल्या देशांत पराक्रमी वीरांप्रमाणें स्वतंत्र पोंचल्यावर पवित्र जन्मभूमीला घट्ट आलिंगन देऊन तिचं चुंबन घेण्याचे बेत केले होते, ते आम्ही 'फिसकटला सारा मुकाबला' असं मनाशीं कबूल करीत घरीं परतलों होतों. या एकंदर घटनेचा मनाला भयंकर संताप आणि विषाद वाटत होता. मायदेशाच्या स्वातंत्र्यासाठीं आम्ही शस्त्र उगारलं होतं. पण दुष्ट दैवानं आमची सेवा मंजूर होऊं दिली नव्हती. केवढा मनस्वी खेद होत होता या गोष्टीचा! त्याचं वर्णनें करून सांगतां यायचं नाहीं मला..."

तो स्तब्ध राहिला.

गुलाबहि स्तब्ध होती.

समोर सूर्य आणखी खालीं सरकला होता. प्रकाशाची तीव्रता नाहींशी झाली होती. शेतांच्या आणि झाडांझुडपांच्या हिरव्या पिवळ्या निळ्या रंगछटांना मार्दव येऊं लागलं होतं. पांढऱ्या बगळ्यांचे छोटे छोटे थवे ठिकठिकाणीं जमूं लागले होते. डोंगराच्या उतारावरून जनावरं घराकडे परतलीं होतीं. दूरवर काळ्यानिळ्या दाट धुराची जाड रेघ वेगानं पुढेंपुढें सरकतांना दिसत होती, आणि तिच्या मागोमाग एका आगगाडीचे डबे छोट्या छोट्या ठिपक्यांचे मालिकेप्रमाणें वेगानं सरकत होते....

मनोहर शून्य दृष्टीनें त्या आगगाडीकडे पहात असावा. कारण आगगाडी दूरच्या त्या डोंगराआड वळून दिसेनाशी झाली तेव्हां भानावर आल्याप्रमाणें त्यानं मान वळविली व गुलाबकडे पाहून तो म्हणाला,

"अशा मनस्थितींत तुला केव्हां भेटेन असं झालं होतं मला. जवळ जवळ दोन वर्षे केवळ माझ्या आठवणींतली तुझी मूर्ति पाहून माझ्या मनाला मी दिलासा दिला होता. तुला प्रत्यक्ष पहाण्यासाठीं मी अगदीं अधीर झालों होतों. मनाशीं सारखं योजीत आलों होतों कीं गुलाब भेटल्याबरोबर ती माझ्याकडे पाहून हंसेल, आणि तिचं तें गोड हांसणं पाहिलं कीं मला सर्व कांहीं मिळेल. पण मेट्रो सिनेमाच्या दारांत तूं मला प्रथम दिसलीस तेव्हां माझं अंतःकरण एकदम दचकलं. मनांत आलं ही माझी गुलाब नव्हे. ही दुसऱ्याची झाली आहे. मग पुढें होऊन तुला भेटणं मला नकोसं वाटलं, मी परत गेलों."

तो पुन्हा गप्प झाला. परंतु थोड्या वेळानं तो म्हणाला, "अजून माझं तुला हेंच सांगणं आहे कीं तुझं मन दुसरीकडे जडलं असेल तर—"

गुलाबनं एकदम त्याच्या हातावर हात ठेवून विचारलं, "अजून?" त्यानं जेव्हां तिच्या नजरेला नजर लावून फक्त मान हालविली तेव्हां तिनं आणखी विचारलं. "तूं इकडे घरीं आलास हें पाहताच तुझ्या मागोमाग मी तुझ्याकडे आलें तरी? मी अशी तुझ्याकडे आलें या गोष्टीला कांहीं अर्थच नाहीं कां रे?"

"अर्थ आहे. पण ज्या परिस्थितींत मी तुला पाहिलं तिलाहि कांहींतरी अर्थ असला पाहिजे. तो तुझ्याकडून कळल्याखेरीज—"

ती एकदम म्हणाली, "तो तुला अवश्य कळला पाहिजे. मी कुठें नाहीं म्हणतें? तो तुला सांगण्यासाठींच मी आले ना. विनायकला सिनेमाच्या दारांत माझ्याशेजारीं उभा राहिलेला तूं पाहिलास त्याला अर्थ आहे. दुसऱ्या दिवशीं सकाळीं माझ्या खोलींत पाचसहा पुरुष जमलेले तूं पाहिलेस

# ATTENTION MOTORISTS !



EXPERTS ARE CALLING YOUR PRECIOUS MOTOR CARS FOR:—

- **TYRE & TUBE VULCANISING**
- **TYRE SERVICING**
- **BATTERY CHARGING**
- **MOTOR SERVICING**
- **REGD. CERTIFIED TYRE & TUBE DEALERS**



ALSO DEALERS IN PETROL, OILS, GREASE AND ALL SORTS OF MOTOR ACCESSORIES



# One-Stop Service Stations Co.

OPP. ROXY CINEMA, SWADESHI MILL COMPOUND
QUEENS ROAD, BOMBAY 4.

Proprietors : P. H. BANNERJI & G. S. REDIG

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

त्यालाही अर्थ आहे. आणि तो तुझ्यापासून गुप्त ठेवावा असंहि मला वाटत नाहीं. मी तुला स्पष्टच सांगतें कीं तूं आणखी कांहीं दिवस मला भेटला नसतास तर मी विनायकशीं लग्न केलं असतं. पण याचा अर्थ ज्या तऱ्हेचं प्रेम मी तुझ्यावर केलं होतं त्या तऱ्हेचं माझं प्रेम विनायकावर होतं, असा नव्हे. पूर्वी तूं आणि मी ज्यावेळेस एकमेकाचं प्रेम जिंकीत होतों त्यावेळेस जगांत केवळ तूंच एक मला दिसत होतास. इतर पुरुषांचा सहवास मला कधींहि हवासा वाटला नव्हता. चार पुरुष जमवून चकाट्या पिटीत बसलेली मी कधींच कोणाच्या दृष्टीस पडलें नव्हतें. पण माझ्यांत हा जो बदल झाला त्याला कारण तूं आहेस—"

"मी ? हें काय तुझं चमत्कारिक बोलणं ?"

"चमत्कारिक नाहीं मनोहर. माझं मन समजून घेण्याचा प्रयत्न करशील तर तुला तें चमत्कारिक वाटायचं नाहीं. तूं एक महिन्याच्या रजेवर आला होतास ती संपल्यावर तूं मला एकटीला टाकून गेलास तेव्हां मला जग एकदम सुनं झाल्यासारखं वाटलं. कांहीं दिवस तुझीं पत्रं येत होतीं. तुझं पत्र आलं कीं मला वाटायचं माझ्या आयुष्यांत उल्हास आहे, आनंद आहे, प्रकाश आहे. पण तें तेवढ्यापुरतंच वाटायचं. पुन्हां वाटूं लागायचं तूं मला टाकून गेलास तरी कसा, तू किती दूर गेलास, मी आतां कशी राहूं ? भारी उदास आणखी एकटं वाटायचं. तुझीं पत्रं येईनाशीं झालीं, आणखी अखेर तर तुझी बातमीच समजेना, तेव्हां माझी जी अवस्था झाली तिचं मी कसं वर्णन करूं ? मला कशांतच गोडी वाटेना. पण काळ हें एक मोठं चमत्कारिक रासायनिक द्रव्य असलं पाहिजे. कारण त्याच्या योगानं खोट्या उसन्या भावना तर नाहींशा होतातच, पण खऱ्या भावनेचेसुद्धां कढ ओसरतात. मला हलके हलके वाटूं लागलं मी कशांतहि गोडी न मानतां उदासवाणी आणि एकटी किती दिवस रहाणार ? मी अशी राहिलें म्हणून माझं हरपलेलं सुख मला परत मिळणार आहे काय ? मी हलके हलके माझं मन या ना त्या गोष्टींत रमवूं लागलें. कुणाचा सहवास मला हवा होता म्हणून नव्हे तर एकटेपणा असह्य झाला होता म्हणून मी चारचौघांत बसूं बोलूं लागलें. विनायकला मी माझ्या अधिक सहवासांत येऊं दिलं तें सुद्धां माझा एकटेपणा घालविण्यासाठींच ! इतर पुरुषांपेक्षां मला तो अधिक बरा वाटला म्हणून मी त्याच्याबरोबर हिंडूं फिरूं लागलें. तूं आणखी उशीर केला असतास तर मी विनायकशीं लग्न केलं असतं. पण याचा अर्थ तुझ्यावर जसं माझं प्रेम बसलं होतं तसं त्याच्यावर बसलं होतं असा नव्हे. कारण त्याच्यावर मी प्रेम केलं नाहीं. फक्त त्याला माझ्यावर करूं दिलं. माझं हें सारं बोलणं तुला फार चमत्कारिक वाटतंय कीं काय कुणास ठाऊक. परंतु तुझ्यावांचून मी एकटी राहिलें त्यानंतर जी मनःस्थिती माझ्या वांट्याला आली तिचा अनुभव तुला आला असता तर तूं माझं मनोगत ओळखलं असतंस आणखी माझ्या प्रेमाची तुला खात्री पटली असती..."

मनोहर तिच्याकडे पहाण्याऐवजीं दूर अंतराळांत कुठेंतरी पहात होता. गुलाबनं त्याला विचारलं, "माझं बोलणं तूं ऐकतो आहेस कीं नाहीं ? कसला विचार करतो आहेस ?"

त्यानं झटकन् तिच्याकडे नजर वळविली आणि तो हंसून म्हणाला, "विचार कुठं करतों आहे ? मी तुझं बोलणं ऐकतों आहे."

हे त्याचे शब्द अर्धे खरे होते, अर्धे खोटे होते. कारण तो तिचं बोलणं ऐकत होता आणि त्याचवेळीं तो स्वतःशीं विचारहि करीत होता. तिच्या प्रश्नानं किंचित् चमकून जेव्हां त्यानं तिच्याकडे पाहिलं आणि हास्य केलं त्यावेळीं त्याच्या मनात येत असलेल्या कांहीं विवक्षित आठवणींचा धागा एकदम तुटला होता. काळ म्हणजे एक चमत्कारिक रासायनिक द्रव्य आहे, त्याच्या योगानें माणसाच्या मनांतले खऱ्या भावनांचे कढ ओसरतात, हा तिचा उद्गार त्याला अगदीं सार्थ वाटला होता. एकटेपणा असह्य झाला कीं मनुष्य आपल्या अंतःकरणाच्या प्रेमाशीं विसंगत गोष्टी करतो हें तिचं बोलणं त्याला पटलं होतं. कारण तें ऐकतांच तो आघाडीवर असतांना त्याच्या आयुष्यांत घडलेली एक गोष्ट त्याला आठवली होती....

त्या मुलीची आणि त्याची एके दिवशीं संध्याकाळीं रानांत अकस्मात गांठ पडली होती. तिच्या हातांत रानफळाची एक लहानशी टोपली होती. तिची भाषा त्याला धड बोलतां येत नव्हती. त्यानं फळं मागितलीं तें तिला कळेना. तेव्हां त्यानं खिशांतलीं नाणीं काढून तिच्यापुढें धरलीं, त्याबरोबर ती एकदम भयभीत होऊन धावूं लागली. त्याच्या लक्षांत आलं कीं आपण तिला पैसे दाखविले याचा कांहीं तरी भलताच अर्थ तिनं केला असला पाहिजे. सैनिकांच्या हातून असले प्रकार घडलेले तिनें ऐकले असले पाहिजेत. तिच्या मुग्धपणाचं त्याला विलक्षण आकर्षण वाटलं होतं. मोठ्या प्रयत्नानं त्यानं तिला परत यायला लावलं होतं, आपल्या मनांत कसलाहि वावगा हेतू नाहीं याबद्दल तिची खात्री पटविली होती. मग ती मोठमोठ्यांदा हंसूं लागली होती, तिनं त्याला फळं खायला दिलीं होतीं, जंगलांतल्या आपल्या खोपट्याची वाट त्याला दाखविली होती. आणि या प्रसंगानंतर तो तिला कितिदांतरी भेटला होता. त्याच्या मनांत वारंवार येत असे हें माझं वागणं गुलाबवरच्या माझ्या प्रेमाशीं सुसंगत आहे काय ? आणि दर वेळीं त्याच्या अंतःकरणानं ग्वाही दिली होती 'आहे या मुलीच्या सहवासांत माझं मन मी रमवीत असलों तरी माझं अंतःकरण गुलाबपाशींच आहेच !...' कांहीं दिवसांनीं त्याची छावणी हालली होती. पुन्हां त्या तरुण वन्य किशोरीला त्यानं कधीं पाहिलं नव्हतं. कांहीं दिवसांनी तिचा त्याला विसर पडला होता....

गुलाबचा प्रश्न त्यानं ऐकला तेव्हां त्याच्या मनांत एकदम आलेल्या या आठवणींचा धागा तुटला, व तिच्याकडे पाहून हंसून तो म्हणाला, "विचार कुठं करतों आहे ? मी तुझं बोलणं ऐकतों आहे."

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

गुलाब म्हणाली, "मग तुला काय वाटतं ? अजूनीहि माझ्याबद्दल शंकाच आहे कां तुझ्या मनांत ? माझं मनोगत तुला अजूनतरी कळलं कां नाहीं ?"

"कळलं." असा उद्गार काढतांना मनोहरच्या मनांत क्षणभर आलं कीं कां कळलं तें तिला सांगून टाकावं. पण लगेच त्याला वाटलं, नको. त्यानं फक्त त्याच्या डाव्या हातावर तिनं हात टेकला होता तो पंजा फिरवून हातांत घेतला आणि आपला उजवा हात त्यावर टेकला.

मग तीं दोघं किती वेळ तरी तशींच बसून राहिलीं.

प्रकाश आतां जवळजवळ नाहींसा झाला होता. सृष्टींतले हिरवे पिवळे निळे तांबडे इत्यादि रंग लुप्त झाले होते. आतां फक्त सगळीकडे एकच विचित्र धूसर छटा पसरली होती. दूरचे डोंगर त्यांची उंची आणि त्यांचा आकार वाढल्याचा विचित्र भास होऊन अधिकच भव्य दिसूं लागले होते, दिवसभर आभाळांत अदृश्य राहिलेले तेजांचे ठिपके हलके हलके स्पष्ट दिसूं लागले होते. आणि चहूंकडे जी शांतता पसरली होती ती आतां वस्तूवस्तूंचे आकार लुप्त झाल्यामुळें अथांग भासूं लागली होती...

तीं दोघं आपल्या जागेवरून उठलीं आणि डोंगर उतरूं लागलीं. एका झाडावरच्या फांद्यांवर काजव्यांचा खूप मोठा थवा होता. राहून राहून सबंध झाड एकदम लख्ख प्रकाशत होतं. तीं दोघं आपोआप त्या ठिकाणीं थबकलीं. आणि दोघांचेहि हात एकमेकांच्या खांद्यावर पडले. गुलाबला हृदयाशीं जवळ ओढून घेऊन मनोहरनं विचारलं,

"गुलाब, तूं मृच्छकटिक नाटक पाहिलं आहेस कां ?

"अं हं."

"निदान वाचलं आहेस कां ?"

"अं हं. कां ?"

"मला गातां येत असतं तर चारुदत्ताच्या तोंडचं एक पद मी यावेळीं म्हटलं असतं."

"कोणतं ?"

'**तेचि पुरुष दैवाचे**—'

त्याच्या मनांत येत होतं मृच्छकटिक नाटकांतली वसंतसेना चारुदत्ताच्या भेटीला आली तेव्हां दोघंहि पावसांत सांपडून भिजलीं आणि चारुदत्त म्हणाला, ज्यांचीं अंग जलधरांनीं भिजलेलीं आहेत अशा 'ललना स्वयें येउनी' ज्या पुरुषांना आलिंगन देतात '**तेचि पुरुष दैवाचे**....' आतां या क्षणाला जलधारा पडत नव्हत्या पण वरच्या आभाळांतून लहान लहान तारकांच्या मृदु प्रकाश-धारांनीं तो आणि गुलाब न्हाऊन निघत होतीं...तो पुन्हां म्हणाला,

"**तेचि पुरुष दैवाचे** ! गुलाब, तुझं नाटकांचं वाचन अगदीं मागासलेलं आहे. आतां घरीं गेलों कीं माझ्या कपाटांतलं मृच्छकटिक नाटक काढून मी तुला आधीं वाचून दाखविणार—"

तीं दोघं घरीं परत येऊन पोंचलीं तेव्हां बरीच रात्र झाली होती. त्यांनीं अंगणांत पाऊल टाकलं तोंच ओटीवर मनोहरची आई उभी होती ती म्हणाली,

"कोण मनोहर ! तूंच ना ? किती उशीर केलास रे !" तिच्या स्वरांत चिंता होती. त्या दोघांची तिनं बराच वेळ वाट पाहिली असावी.

पायऱ्या चढतां चढतां मनोहर म्हणाला, "फार उशीर झाला होय ! अग आई, त्याची अशी गम्मत झाली कीं आम्ही परत येतांना वाट चुकलों आणखी मग अंधेरांत कुठल्या कुठेच गेलों ?"

"असं होय. पण मी केवढी काळजींत पडलें होतें." असं म्हणत मनोहरची आई घरांत गेली.

ओटीवर दुसरं कुणीच नव्हतं. गुलाबनं मनोहरला चिमटा घेतला व म्हटलं, "अरे लबाडा, वाट चुकला होतास होय ? तुझ्या आईला जसं कांहीं खरंच वाटेल ? म्हणे वाट चुकलों !"

मनोहर म्हणाला, "मग वाट चुकलों नव्हतों काय ? तूं इकडे निघून आलीस. म्हणूनच मला पाहिजे त्या वाटेनं आतां मला जातां येणार आहे ! नाहीं तर वाट चुकलीच होती ! खरं कीं खोटं ?"

त्यानं गुलाबला जवळ ओढल्यासारखं केलं तेव्हां ती झटकन् दूर झाली, आणि "स् ! हें काय ? कुणी आलं म्हणजे ?" असं म्हणून ती आंत मनोहरच्या आईकडे धांवली !

---




अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# कलावंतांनीं वाखाणलेलें कलाचित्र---

" A Touching document of Bengal's hungry people...... their performances are polished & most realistic "
—Says V. SHANTARAM.

" It is a picture which each & everyone must see. I am sure they ( artistes ) will put the Professional Cinema Stars to shame. "
—Says UDAY SHANKAR.

" I am proud of your " DHARTI KE LAL " which is indeed a picture with mighty message. "
—Says A. R. KARDAR.

पीपल्स थिएटर्सचें

# धरती-के-लाल

कॅपिटॉलमध्यें गाजलेलें हें चित्र लौकरच तुमच्या शहरीं येणार !

जयहिन्द प्रकाशन

: निर्माते–दिग्दर्शक :

के. अहमद अब्बास

: भूमिका :

जनतेचे ५००० कलावंत



धरती-के लाल



धरती-के लाल







अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

१० वर्षांची गॅरंटी–काळी न पडणारी–अगदीं स्वस्त पण जास्त टिकाऊं 'अंबर ज्युवेलरी' वापरा.

**किरकोळ किंमती–** अिअरिंग्ज जोडी–यू १–रु. ५।, यू २–रु. ६।, यू ३–रु. ५॥, यू ४–गळ्यांतील दुहेरी साखळी २२ अिंची प्रत्येकीं १२॥ रु; यू ५–आिमिटेशन कल्चर मोत्यांची नथ रु. १२॥. अिअरिंग्ज जोडी–यू ६–रु. ६, यू ७–रु. ५॥, यू ८–रु. ४॥, यू ९–रु. ४॥, यू १०–रु. ९॥ प्रत्येक ४ कल्चर मोत्यांचे, यू ११–रु १२॥ प्रत्येक ७ खड्यांचे, यू १२–रु. १०॥ फिलिजेरी, यू १३–रु. १४॥ प्रत्येक १२ खड्यांचे, यू १४–रु. ५।, यू १५–सात खड्यांची आंगठी रु. १२॥, यू १६–कफ बटणें जोड रु. ५॥, यू १७–रुंद बांगड्या रु. ११॥, यू १८–तोडे जोड रु. १३॥, यू १९–फॅन्सी बांगड्या जोडी रु. ३॥, यू २०–खऱ्या कल्चर मोत्यांचा कुडी जोड रु. २५॥, यू २१–९ कॅरेट गोल्ड सात खड्यांचा कुडी जोड रु. २७॥ यू २२–रिस्ट वॉच चेन रु. ९।, यू २३-रिस्ट वॉच चेन रु. ८॥ यू २४–साडी पिन रु. ५।, यू २५–आंगठी रु. ५॥ यू २६–२२ अिंची गळ्यांतील साखळी लॉकेटसह रु. ८।, यू २७–डोक्यांतील फूल रु. ६॥। यू २८–अमेरिकन पद्धतीची आंगठी रु. १८॥, यू २९ व ३०–चार बटणांचा सेट प्रत्येकीं रु. ५॥, यू ३१–ब्रूच रु. ९।, यू ३२–तीन पदरी चपलाहार रु. २७॥, यू ३३–फॅन्सी नेकलेस रु. १८॥, यू ३४–गोल मण्यांची माळ रु. १३॥.

एजन्टस पाहि... ३०० नाविन्यपूर्ण डिझाईनचा कॅटलॉग मोफत मिळेल

कायम चकाकीची **अंबर ज्युवेलरी**

बी. ए. अम्बर अँड सन
अम्बर ज्युवेलरी हाऊस,
१५७ गिरगांव, मुम्बई



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

( पान ३८ वरून चालू )

आमच्या भक्तमंडळींत तूं होतास तुझें नांव केशव असें होतं. " पांगारकरांच्या मनाचा हा धर्म माझ्या वांट्याला खचितच आलेला नाहीं. त्यामुळें जागृतींत तर नव्हेच नव्हें, पण सुषुप्तींत सुद्धां मला असला झोत कधीं दिसेल असें वाटत नाहीं. सर्व ज्ञानाची प्रसविका जी शंका आणि मनाला एकाच ठिकाणीं बद्ध करून टाकणारे जे विकल्प आणि या सर्वांना पाणी घालणारा तो जो जबरदस्त तर्क यांनीं माझ्या मनाचा पुरता कबजा घेत-लेला आहे. आणि तर्क तो अर्क जाणावा हें रामदासाचें वचन वाचल्यापासून तर मला त्याची संगति मुळींच सोडवत नाहीं, परंतु, हें सारें जमेस धरून सुद्धां, मला खरोखर असें वाटतें कीं या महानुभाव लोकांचीं दर्शनें अवश्य व्हावीं, माणसाची जात उत्तरोत्तर प्रगल्भ होत चाललेली आहे; आणि म्हणून पुढल्या पुढल्या काळीं उत्पन्न होणारीं माणसें पूर्वकालीन माणसांच्या पेक्षां अधिक परिणत बुद्धीची निघतील या विषयीं मला मुळींच शंका नाहीं पण हें खरें असलें तरी मागें होऊन गेलेल्या माणसांच्या संबंधानें कोणा कोणा लोकांच्या मनांत जी क्षुद्रबुद्धीची जाणीव असते, तिचा एक लेशही माझ्या मनांत नसतो. पुढें उत्पन्न होणारे मोठे लोक हे आभाळांतून पडणार आहेत असें मुळींच नाहीं. मानवी जीविताचा झोत अखंड चाललेला आहे. आणि कालानुक्रमानें त्याचा विस्तार विशाल होत आहे. पण या पुढल्या विस्ताराला मागला विस्तार कारणीभूत झालेला आहे व होणार आहे ही गोष्ट विसरतां येत नाहीं.

समकालीन लोकांच्या मानानें ज्यांच्या कर्तृत्वाची आणि बुद्धीची झेंप मोठी, ते या विस्ताराला कारण होत आलेले आहेत. अर्थात्, त्यांचें स्मरण मनांत होत रहाणें हें मानवी जीवनाच्या सामरस्याच्या दृष्टीनें अगदीं ओघानें येतें. आणि म्हणूनच, ते मागले मागले लोक आपल्या दृष्टीस पडावें असें मला वाटतें.

म्हणूनच, तुझ्या दारांत बसून कांहीं चिंतन करावें असेंही वाटतें. आजवर कोट्यावधि लोक जन्माला आले आहेत. आणि कोट्यावधि लोक एकाच खाईकडे निघून गेलेले आहेत. त्यांचें स्मरण कोण ठेवतो? पण, ज्यांनीं आपल्या बुद्धीनें आणि कर्तृत्वानें कांहीं नवें संकल्पिलें आणि आचरिलें त्यांनींच आम्हां मानवांना हें आजचें वैभव प्राप्त करून दिलेलें आहे. म्हणून माझें मन पुनः पुन्हां त्यांच्याकडे वळतें, शिवाय, आणखीही एक वारकासा विचार मनांत खोंचत रहातोच. पुढें होणार आहे असा फक्त अंदाज आहे. पण जें मागें झालें आहे तें निश्चित असून हस्तगत झालेलें आहे. खगोलशास्त्री सांगतात कीं दर पंधरा पंधरा हजार वर्षांनीं पृथ्वीवर हिमप्रलय होणार असतो. हें जर कां खरें असलें तर भावी कालांत फार प्रचंड माणसें उत्पन्न होण्याची आशाच खुंटल्यासारखी होणार आहे. माणसानें जमा केलेले आणि उत्पन्न केलेलें सगळें वैभव या बर्फाच्या लोंढ्याखालीं गुदमरून मरून जाईल. किंवा त्याच्या थंडीनें तरी कुडकुडून मरून जाईल. अर्थात् भावी कालासंबंधानें थोडीशी अशाश्वती आहेच.

परंतु, जे धीरगंभीर पराक्रमी आणि स्वतंत्रबुद्धीचे पुरुष आजपर्यंत होऊन गेले त्यांची नांवें मनांत कायमची ठसलेलीं आइेत आणि म्हणून आमचें मन पुनः पुन्हां मागें वळतें ही एक ऐतिहासिक रसिकता आहे,

ज्ञानेश्वरा ! भूतकाळाच्या वाटेवरील एक मोठी विश्रांतीची मुक्कामाची जागा म्हणजे तुझी ही समाधी आहे आणि तुझा हा अजान वृक्ष आहे याचा लोभ माझ्यासारख्या लोकानांच वाटतो असें नव्हे. पैठणच्या त्या उदारधी ब्राह्मणाला हाच मोह पडलेला होता. तुझें ज्ञान भूतकाळांत कोठेंतरी गळवटून पडलेले होते; तें मुक्त व्हावें, आणि त्याचें पाट महाराष्ट्रांत पुनः जिकडे तिकडे वाहूं लागावे असें त्या एकनाथाला वाटूं लागलें. तुझ्या गळ्यालाच झाडाची मुळी लागलेली आहे, असा दृष्टांत त्याला झाला आणि हा पैठणचा ब्राह्मण तुझ्या समाधीपाशीं येऊन ठेपला. तुझ्या गळ्याला लागलेली मुळी त्यानें बाजूला सारली म्हणजे काय केलें ? हें आतां महाराष्ट्राला खास माहित झालेलें आहे. घरोघरीं आणि क्षेत्रोक्षेत्रीं तुझ्या ग्रंथाची पारायणें चालू आहेत; आणि प्रत्येक क्षेत्राच्या ठिकाणीं लक्षावधि यात्रेकरू या आईचें म्हणजे ज्ञानेश्वरीचें स्तवन टाळ्या पिटून करीत आहेत. इतकेंच काय पण ज्यांना आधुनिक पद्धतीचे विद्वान म्हणून म्हणतात. त्यांना सुद्धां तुझ्या वाङ्मयाचा मोह इतका विलक्षण पडला आहे कीं, त्यांचीं अध्ययनें करण्यांत प्रौढ विद्यार्थ्यांना आणि त्यांचीं अध्यापनें करण्यांत प्रौढ शिक्षकांना आत्म-गौरवच वाटत आहे. पण हें सारें एकनाथानें तुझ्या गळ्याची मुळी काढली म्हणून झालें. याचा अर्थच हा कीं मागल्या मागल्या श्रेष्ठ पुरुषांचें स्मरण आणि स्तवग्रहण पुढिलांनीं करत रहावें. म्हणजे त्यांनीं ऐतिहासिक रसि-कता दाखवावी हें आमच्या वाडीच्या दृष्टीनेंच युक्त आहे.

ज्ञानेश्वरा ! तुझ्या जीविताचें साऱ्या लोकांना जें नवल वाटतें तें हें कीं, तूं एवढ्या लहान वयांत, नाना प्रकारच्या विचाराचीं क्षेत्रें उल्लं-घिलीस तरी कशीं ? तुझ्या मानानें, हें जग रेम्याडोक्या माणसांनीं भरलेलें आहे असें वाटतें. सुईला नाक लागेपर्यंत माणसें जगलेलीं आहेत, पण यांना कसलीही जागृति प्राप्त झालेली नाहीं. आजचा दिवस कालच्यासारखा आणि उद्यांचा आजच्यासारखा असेंच त्यांचें चाललेलें आहे. तूं मात्र तुझ्या या पारमार्थिक कुलांत पुढें उत्पन्न झालेल्या तुकारामानें वर्णिल्याप्रमाणें जागृतीचा नित्य नवा दीस पहा-तोस, एकेक ज्ञानाचा खंड झपाझप मागें टाकून तूं पुढील स्तबकांत प्रविष्ट होत होतास, आणि या कामीं तुझ्या बुद्धीनें आणि मनानें जें चापल्य दाखविलें तें मानवी इतिहासांत केवळ अद्भुतच होय. विचाराची केवढीं प्रचंड आंदोलनें तुझ्या मनांत चाल्ठे असतील. एकीकडे " कुंचे पताका झळकती-टाळ मृदंग वाजती ! " हा भक्तिमार्गीयांचा प्रेमळ बोध, आणि दुसरीकडे " अवघ्या बाहीं म्या व्योम

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

कवळिलें" ही वेदान्ताची गर्जना हीं तूं निर-निराळ्या वेळीं केलीस कां हीं दोनहि तुझ्या मनांत एकाच वेळीं चालू होती ? आणि या घोषाचा आणि या गर्जनेचा परस्परांना अत्यंत अनुकूल असा कांहीं अंतःसंबंध होता ?

"सुंदर सुरेख वोतिलें, परब्रह्मतेज फांकलें" हा तुझा भक्तिमार्गाचा घोष आणि "मेघधारी तपन केलें, तारा पुष्पीं वरी पूजिलें, । चंद्रफळ म्या वाहिलें, ओंवाळिलें रविदीपें ॥" हें तुझें निर्गुणांतील उड्डाण हीं दोनही तुझ्या मनाच्या म्यानांत एकदमच सामावली होती काय ? कां हीं दोनही निरनिराळ्या वेळीं तूं तेथें खोंचून बसविली होतीस ? त्यांचा परस्परांचा कांहीं अनुकूल अंतःसंबंध आहे काय ? एकीकडे चंद्रभागेच्या तीरावर टाळ मृदंगाचा घोष चालू असतांना, दुसरीकडे त्याच वेळीं "माझा मीच श्रोता, माझा मीच वक्ता, माझा मीच दाता, त्रिभुवनीं," असें तूं म्हणत होतास. जनसंमर्दाच्या कोलाहलांत बसून तूं भक्तीचें सुख अनुभवीत होतास त्याचवेळीं "एकल्यानें एकला, अनंतरुपें देखिला। दुजेपणा मुकला, ज्ञानदेवा ॥" हा वेदात्यांचा अनुभव तूं र्निर्लेपपणानें सेवित होतास.

"सकळ धर्मांचें कारण, नामस्मरण हरिकीर्तन । तया क्षमा समाधान, संत जन साधिती ॥" हें तुझें प्रतिपादन एकीकडे चालू असतां, "विश्वाचें आर्त माझ्या मनीं प्रकाशलें, अवघेंचि झालें देह ब्रह्म । आवडीचे वालभ माझेंनि कोंदाटलें," "नवल देखिलें, नभाकार गे माय।" हा वेदांत्यांचा अनुभव तुला त्याचवेळीं येत होता काय ? असें झालें असलें, तर या दोन्हीं गोष्टींचा आंतून काय संबंध असेल याचें चिंतन करीत रहाणें हें विचारी लोकांना प्राप्तच आहे.

"आम्ही संन्यास घेतला, देहादिकांचा त्याग केला ! पहातां पहातां मी परठाश गेले, तेथें एक देखिलं महाभूत ॥" ह्या ओळी अनुभवाच्या दृष्टीनें एकामागून एक येतात काय ? पण ज्ञानेश्वर ! मला न कळणाऱ्या गोष्टींच्या खोल पाण्यांत मी शिरत आहे अशी शंका मला येते. येवढी मात्र खात्री मला वाटते की तुझ्या मनाचे परिभ्रमण गरुडालासुद्धां लाजवील असें होतें. आणि घार जशी सूर्यबिंबाकडे निश्चल दृष्टी लावून आकाशांत झेंपावत सुटते तशी तुझी परमार्थ बुद्धि, डोळे दिपूं न देतां त्या शेवटच्या कैवल्याकडे पहात झेंपावत चाललेली होती.

मला यांतलें कांहींही साधेल असें वाटत नाहीं. आम्हां चारचौघां लोकांचा जो मार्ग आहे, तो पिप्लीका मार्ग म्हणजे मुंगीचा मार्ग आहे. आणि तुझा जो ज्ञानमार्ग आहे तो विहंगमाचा मार्ग आहे. म्हणून, मी आतां तुला गरुडाची उपमा दिली. या आमच्या मुंगीच्या मार्गानें तमाम दुनियेच्या सहवासांत आम्ही मुक्कामाला केव्हां पोंचूं तेव्हां पोंचूं. पारमार्थिक लोक मला मनांतून काय म्हणतील ते म्हणोत. हा खरा मुमुक्षु बनलेला

Consult.......................
for
ALL AIR-COOLING
&
HOMIDIFICATION
PROBLEMS
D. K. Shahade & Co.
SPECIALISTS IN AIR-CONDITIONING
BOMBAY 4.
PHONE
34029

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

नाहीं असा दोष त्यांनी मला दिला तरी चालेल, कारण मला ती घाई खरोखरीच झालेली नाही. आहे यांत काय वाईट आहे ? प्रपंच हा प्रपंच म्हणून जर दुःखमय असला तर त्याच्यांतील दुःखे नाहींशी करण्याचे यत्न आम्ही माणसांनीं अव्याहत चालविलेले आहेत आणि ते सारे यशस्वी होत चाललेले आहेत. पूर्वीच्या काळीं प्रपंच तितका दुःखमय होता तितका तो सध्यां राहिलेला नाहीं. आपली बुद्धि चालवावी आणि तिच्या बळावर आपलें हाल कमी करून घ्यावें हें इंगितच माणसाच्या ध्यानांत आलेले नव्हतें. तोंपर्यंत अगतिक बनून तो दुःखाचा टाहो फोडीत असे, आणि या संसारांतून पळून जाण्याच्या गोष्टी बोलूं लागे. संसारांतून पळून जाऊन देवाच्या गाभाऱ्यांत शिरावे, निदान त्याच्या मंदिराच्या वळचणीखालीं तरी टाळी वाजवीत उभे रहावे असें त्याला वाटे. किंबहुना, दुःखमय प्रपंचाच्या या खिंडारांतूनच परमेश्वराच्या रम्य मंदिराकडे वाट जातें. असा सिद्धांतच ह्यांनीं आपल्या मनाशीं बांधलेला होता. तुझ्यासारख्या आमच्या सगळ्या संतांनीं असें निग्रहानें सांगितलें आहे कीं, प्रपंचांत हाल व्हावेत तेव्हांच लोक परमार्थाकडे वळतात. व वाङ्मयाचा इतिहास वाचींत असतांना ही गोष्ट पदोपदीं प्रत्ययास येते कीं, अमुक अमुक गृहस्थ हे प्रपंचाच्या बाधीनें अगदीं हैराण होऊन गेले व म्हणूनच परमार्थाकडे वळले. पण आधुनिक कालाचा महिमा असा आहे कीं हे प्रपंचांतील हाल आतां कमी होत चाललेले आहेत. माणसांच्या सुखाची शीग आतां वाढत चाललेली आहे. आणि प्रपंचांतून पळून जाण्याच्या ऐवजीं प्रपंच ही भोग्य आणि अंगीं लागण्यासारखी वस्तु आहे असे त्याला वाटूं लागले आहे. असें जर आहे तर निवृत्तीला अत्यवश्य अशी जी प्रपंचाची घृणा ती अतःपर शिल्लकच उरणार नाहीं. आणि मग त्या प्रपंचावर रागावून परमेश्वराच्या मंदिराची वाट चालूं लागावी असेंही कारण कोणास वाटणार नाहीं. हा फरक आधुनिक शास्त्रांच्या अभ्यासानें आमच्या जीवितांत झालेला आहे. सुख पहातां जवापाडें, दुःख पर्वतायेवढें हें तुकारामाचें वचन प्रपंचापुरते तरी आतां खरें नाहीं. मग, प्रपंचांत सौख्य उत्पन्न झालें म्हणून परमेश्वराकडे वळण्याची माणसाची प्रवृत्ति बंद होईल कीं काय ? मला तर असें वाटतें कीं मनुष्य जों जों अधिकाधिक सुखी होत जाईल तों तों जास्त जिज्ञासू बनत जाईल आणि दुःखाच्या काट्याकुट्यांतून परमेश्वराच्या मंदिराची वाट चालूं लागण्याऐवजीं जिज्ञासेच्या अतिशय नरम आणि सुखमय अशा भूमिकेवरून तो या मंदिराकडे जाऊं लागेल. परमेश्वराची भक्ति ही त्याच्या प्रापंचिक दुःखाची प्रतिक्रिया आहे कीं काय ? असें सुद्धां पुष्कळदां मनांत येते. त्याची भक्ति करून काय करावयाचें आहे ? काय साधावा-


★ आपले छोटे युवराज......

तीन वर्षांचे होताहेत तोंच त्यांचेकरितां एक पॉलिसी घ्या....

वार्षिक हप्ता रु. १०२-४-०

मुलाचे २१ व्या वर्षीं रु. २३०० किंवा ३५ व्या वर्षीं रु. ४,०००+बोनस घ्यावे.

आतां अथवा पुढें वैद्यकीय तपासणी नाहीं.

वेस्टर्न इंडिया हाऊस, सर फिरोजशहा मेथा रोड येथें मुंबई शाखाधिकारी यांना भेटावें. सर्व माहिती आनंदानें पुरविली जाईल.

टे. नं. २६९०५

वेस्टर्न इंडिया विमा कंपनी लिमिटेड सातारा.


अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

याचें आहे ! प्रपंचांत तें साधावयाचें असेल तें परमेश्वराच्या निरपेक्ष अशा शास्त्रीय संशोधनानें आतां सहज साधतां येत आहे. त्याला परमेश्वराच्या भक्तींत शिरण्याची आवश्यकता नाहीं. म्हणून मला असें वाटतें कीं परमेश्वराची भक्ति ही शब्दसंहति मागे पडेल. परमेश्वराचें ज्ञान करून घेणें आणि मनानें त्या ज्ञानाचें संशोधन करणें हेंच काय ते उन्नत मनाची माणसें करीत रहातील. परमेश्वराचें स्वरुप समजावून घेणें हा एक संशोधनाचा विषय बनेल आणि ज्यांना त्याचा अभ्यास झेपेल तें तो करूं लागतील. इतर भौतिक शास्त्रांचे जसे अभ्यास आहेत तसा त्या शास्त्रांच्या फार पलीकडे असलेला जो परमेश्वर त्याचें संशोधन करणें हाही एक अभ्यासाचा विषय बनेल. ज्ञानेश्वरा ! तुम्ही ज्ञानमार्गी लोक तरी असें संशोधनच करीत असतां असें माझ्यासारख्या तिऱ्हाईत माणसाला वाटतें. त्या संशोधनांत कांहीं वासनांच्या साफल्याची इच्छा, प्रपंचांतील सुखें हे विषयच येऊं शकत नाहींत. एका गूढस्थ महान् कारणाचे तें एक संशोधन असतें इतकेंच. हें ज्यांच्यानें करवेल ते करतील आणि बाकीचे लोक, संसार सुखाचे होत चाललेले असल्यामुळें तेवढ्यासाठीं जी भक्ति करावयाची असतें त्या भक्तीकडे वळणारही नाहींत.

कोणाकोणा पारमार्थिकांचें म्हणणें असें आहे कीं प्रपंच ही वस्तू आणि भोंवतालचा हा सारा पसारा प्रकृतीतःच दुःखमूल आहे. पण यांत कसली दुःखें आहेत? तुकारामानें म्हटलें आहे, 'येणें दुःखें माझा फुटो पाहे प्राण' येणें म्हणजे कोणत्या दुःखानें? जगाची अशाश्वती हीच तुकारामाला बाधत होती काय ? कीं तुझ्यापासून आत्मतः दूर राहिल्यानें दुःख त्याला होत होतें ? पण यांत दुःख कसलें ? ती एक मनाची किंवा आत्म्याची अमुक काळापुरती स्थिति असेल इतकेंच काय ते ? यांत दुःख कोणचें हें मात्र ध्यानांत येत नाहीं. मला असें वाटते कीं आधुनिक काळांत आपल्या कल्पनांचें पृथःकरण जास्त व्यवस्थित होत आहे आणि भौतिक शास्त्रशोधांचे सुखप्रद परिणाम प्रपंचावर इतके होत आहेत कीं, पूर्वींच्या आपल्या परमार्थाविषयींच्या कल्पना आपल्याला खास बदलाव्या लागतील. म्हणजे प्रपंचांत प्रत्यक्ष दुःख असें फारसें उरणारच नाहीं. आणि प्रपंच अथवा ऐहिक जिणें ही वस्तू या प्रकृतितःच दुःखमय आहे ही कल्पना सध्यां वाटतें तितकी बाधक रहाणार नाहीं. आपण केलेल्या या जाचांतून मानवप्राणी बाहेर पडले आणि सर्व वस्तुजाताच्या नाभिस्थानीं असलेले तें जें कोणचें एक सनातन, शाश्वत आणि निरामय तत्व असेल त्याच्या संशोधनाला, शुद्ध जिज्ञासा म्हणून तो मनानें प्रवृत्त होईल. अखिल मानवजात येवढ्या उंचीवर खास येऊन बसेल. हें संशोधन जर ती करीना तर तिनें आपलें मनुष्यत्व सोडलें आणि आपली बुद्धि गमावली असाच त्याचा अर्थ होईल. बुद्धीची आणि जिज्ञासेची अर्हता म्हणूनच मनुष्यप्राणी परमेश्वराचें संशोधन करीत राहील आणि यांत कांहींही चूक नाहीं.

ज्ञानेश्वरा ! या विचारांत फार पाखंड भरलेलें आहे असें परमेश्वराचें भक्त खासच म्हणतील. पण तुझ्या अजान वृक्षाखालीं बसून हे विचार मनात आणण्यांत मला कसलेंही पातक वाटत नाहीं; कारण तूं ज्ञानशिलाचा मुकुटमणी आहेस आणि म्हणून, आपल्या मनांत जे नानप्रकारचें कांहींच चूक नाहीं, तूं जें अत्यंत सुरस असें वाङ्मयवैभव निर्माण केले आहेस, त्यामुळें लक्षावधी लोकांच्या मनाची झड तुझ्या ग्रंथावर पडत असते. परंतु, मला तुझ्या ग्रंथापेक्षासुद्धां तुझ्या त्या चरित्राचें महत्व जास्त वाटते. मानव्याचे जे प्रचंड प्रतिनिधि आजवर झाले आहेत, त्यांतच तुझी गणना करावयास हवी. मानवी मनाची तूं एक बेरीज आहेस. एखाद्या छोट्याशा पेटिकेंत दशयोजनें व्यापून टाकील असा कस्तुरीचा सुगंध कोंडून धरावा तसा तुझ्या त्या लहानशा चरित्रांत उत्तरोत्तर प्रगल्भ होत जाणारे मानवी मनाचे सर्व अनुभव कोंडून धरलेले आहेत.

माणसाच्या मनाला पडणारे सगळे प्रश्न तुला पडलेले होते, तुझें वैभव असें कीं तूं ते सारे सोडविलेंस आणि आतां कांहीं करावयाचें राहिलें नाहीं म्हणून या जीविताच्या या धर्मशाळेंतून तूं आपण होऊन बाहेर पडलास जिवंत समाधीच्या या कल्पनेचें अंतरंग अत्यंत विशाल आणि प्रगल्भ असें आहे. जिवंत समाधी हा कांहीं वैराग्याचा आलेला झटका नव्हें, ही कांहीं नैराश्याची लहर नव्हें, ही कांहीं घृणेची तामसी तपस्या नव्हें. जिवंत समाधी ही सर्व कांहीं आटोपल्याची दर्शक आहे. ज्या हुशार विद्यार्थ्यानें तास दीड-तासाच्या आंत प्रश्नपत्रिकेंतील सर्व प्रश्नांचीं उत्तरें देऊन टाकलेलीं आहेत, तो जसा परीक्षेच्या मंडपांतून सुखासमाधानानें बाहेर पडतो तसा तूं या मानवी जीवनांतून बाहेर पडलास, या विचारानें माझें मन हजारदां मोहित झालेलें आहे आणि मोहित होत राहिल. त्या मोहाच्या पाशांत बारीकसा विचार करीत मनानें तरी तुझ्या दारांत येऊन बसावे म्हणून मी या सोन्याच्या पिंपळाखालीं येऊन बसलों होतो. तुझी ती पारमार्थिक लोकशाही केवढी संपन्न आणि प्रसन्न होती. आम्ही त्या लोकशाहींत प्रविष्टही झालेलों नाहीं. पण मनानें केव्हां केव्हां तुझ्या दाराशीं यावे आणि तिनें पावन केलेल्या त्या पिंपळाचा वारा प्यावा असें मधूनमधून वाटते.

---

पहिल्याच त्या धर्गीचा
गालांवर जो बोभाटा...
काय आटलें आगींत ?
कसा झडला ग कांटा ?

—पुरुषोत्तम शिवराम रेगे

(पान ४२ वरून चालू)

सकाळीं मी खूप उशीरानें जागा झालों आईनें जवळजवळ अंथरूणांतून ओढूनच मला जागें केलें.

मी घाईघाईनें अंघोळ, जेवण उरकून शाळेंत पळालों. शाळेंत जाण्याच्यापूर्वी आरशांत पाहून टोपी नीट घालावी असा मोह पडला होता, परंतु तो विचार मी निष्ठुरपणानें बाजूस सारला. ऐनवेळीं ती आत्मघातकी जाणीव मला नको होती. गुलाबच्या हृदयाचा ठाव पुढें केव्हां मिळेल तो मिळो परंतु आज दृष्टीनें मी आपला व्यक्त करण्याचें निश्चित ठरवलें होतें. मी तुझ्या पायाचा दासानुदास आहे हें नजरेनें मी तिला पटवून देणार होतों. अशा या शुभकार्याला अपशकून करून घेण्याची माझी इच्छा नव्हती.

पहिला तास फुकट गेला. मी वर्गांत जाण्याच्या आधींच गुलाब जाग्यावर बसलेली दिसली. तिची माझी दृष्टादृष्ट झाली नाहीं. तिनें माझ्याकडे एकदां तरी वळून पाहावें या आंतरिक तळमळीनें मी मास्तरांना जाणवणार नाहींत असें बरेंच उपद्व्याप करून पाहिले. परंतु तो तास तसाच गेला. गुलाबनें एकदां सुद्धां मागें वळून पाहिलें नाहीं. परंतु एवढ्यानें माझा धीर खचणें अशक्य होतें. दुसऱ्या तासाला सुरवात झाली. गणिताचे शिक्षक वर्गांत आले. काल घरून करून आणण्यासाठीं कांहीं उदाहरणें त्यांनीं सांगितलीं होतीं. अर्थातच चुकार तट्टू या नात्यानें उभा राहण्याची पाळी माझ्यावर आली. मी आनंदानें उठून उभा राहिलों.

गुलाबच्या दृष्टीपुढें येण्याची ही सोनसंधि मला मिळवून दिल्याबद्दल मी मनांतल्या मनांत त्या शिक्षकाचें शतशः आभार मानले. मी उठून उभा राहिलों—आणि मंत्रमुग्ध होऊन गुलाबच्या पाठीकडे पाहूं लागलों.

शिक्षक दरडावणीच्या सुरांत काय विचारीत आहेत इकडे माझें मुळींच लक्ष नव्हतें. त्या स्वर्गीय क्षणाकडे माझें सगळें लक्ष लागून राहिलें होतें. मी वर्गांत उभा आहे, माझ्या प्रत्येक हालचालींकडे वर्गांतील चाळीस मुलांचे डोळे लागले असतील ही साधी गोष्ट मी विसरून गेलों. शिवाय ज्या शिक्षकाशीं आतां सामना खेळावा लागणार ते शिस्तीचे करडे भोक्ते म्हणून प्रसिद्ध आहेत हीही गोष्ट मी विसरलों. काय झालें असावें कुणास ठाऊक! एकाएकीं सर्व वर्ग मोठमोठ्यानें हसूं लागला.

मी भानावर येऊन इतस्ततः पाहूं लागलों. फळ्याशेजारीं उभे असलेले शिक्षक छडी पुढें करून मला बोलवीत असलेले दिसले. माझें लक्ष कुठें आहे हा प्रश्न करड्या आवाजांत मला विचारण्यांत आला—आणि मुलें पुन्हां एकवार जोरानें हसलीं. खरें उत्तर देण्याची सोय होती काय? मी गोंधळून गेलों. आणि खालीं मान करीत हात पसरून शिक्षकांच्यापुढें उभा राहिलों.

छडीचे वळ मला तितकेसे तापदायक वाटले नाहींत,—वर्गांतील मुलांचें हसणेंही मी पचवूं शकलों असतो, पण—पण—गुलाबच्या नजरेस मी प्रथमच नजर दिली. आणि तिचें तें स्मित दृष्टीस पडतांक्षणींच माझ्या साऱ्या कोमल भावनांनीं एकदम टाहो फोडला! तिचें तें उपहासानें ओतप्रोत भरलेलें स्मित मी या जन्मांत विसरूं शकणार नाहीं. देवतेच्या पायावर वाहण्यासाठीं आणलेलें माझें हृदय देवतेनें एका स्मितानें ठोकरून लावलें. छडी मारणाऱ्या शिक्षकांविरुद्ध मला कांहींच तक्रार करावयाची नाहीं. चुकार मुलांना ताळ्यावर आणण्याचें त्यांचें कर्तव्य त्यांनीं केलें, मुलें हंसलीं. हंसणारच. माझ्यासारखा वेडाविद्रूप भासणारा ठोकळा जर भरवर्गांत पोरीच्या बाकाकडे वेंधळेपणानें पहात उभा राहिला तर मुलें हंसतील नाहीं तर काय उर बडवून रडत सुटतील?

पण माझा पवित्र नजराणा असा निष्ठुरपणानें देवतेनें लाथाडावा हें दृश्य मला सहन झालें नाहीं. मुलांच्या हंसण्यांत विखार नव्हता. पण गुलाबच्या डोळ्यांतील जहर मी तात्काळ ओळखलें—, आणि तें मला पाहणें अशक्य झालें. आणि ह्या गोष्टी बोलून दाखविण्याची यत्किंचित सोय नव्हती. दोन्ही हातांनीं तोंड दाबून मी आलेला हुंदका मोठ्या प्रयासानें दाबून टाकला.

जगाकडे पाहण्याची माझी दृष्टी विकृत आहे हा आरोप खोटा आहे. जग ज्या दृष्टीनें एकमेकाकडे पहात आहे त्याच दृष्टीनें त्या क्षणापासून मी जगाकडे आजवर पहात आलों आहे. मी लोकांच्या टीकेचा विषय होऊन राहिलों आहे आणि जग मात्र सुखेनैव आपला मार्ग आक्रमित आहे याचें कारण मात्र एक आहे. माझ्या अनुभूतीचा कडवटपणा मी झांकून ठेवूं इच्छित नाहीं. आणि जग मात्र लाखवेळां लाथा बसल्या तरी खोट्या समाधानानें हंसण्याचें ढोंग करून पुन्हां निर्लज्जपणानें लाळघोटेपणानें पुढें येत असतें जगाचा हा लपंडाव मला साधत नाहीं—आणि तो साधून घेण्यासाठीं मी मुळींच धडपडणार नाहीं!

—त्या दिवशीं मी घरीं आलों तो देवतेनें लाथाडलेलें थोबाड कुणालाहि इतःपर दाखवूं नये ह्या विचारानेंच. ज्या आरशानें मला माझ्या अवगुणाची खरी ओळख पटवून दिली होती तो आरसा मी रागाच्या भरांत फोडून टाकला. पण नंतर मला वाईट वाटलें. आरशानें काय पाप केलें होतें?

---

माजुन राहे दंगाधोपा
वाटूं लागला जिवास धोका
स्वरक्षणास्तव राणी लक्ष्मी!
जवळ बाळगी ब्लेड-'सहारा'!

—अनिरुद्ध

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# ६० वर्षांच्या तपश्चर्येचें फळ !



★

गेलीं ६० वर्षें विश्वासानें आणि मेहनतीनें जनतेची सेवा करणारी हिंदुस्थानांतील पहिल्या प्रतीची महाराष्ट्रीय संस्था.

★

मनपसंत व आधुनिक फॅशनचीं अॅल्युमिनीयमचीं, जर्मन सिल्व्हरचीं, चांदीचीं, पितळेचीं भांडीं तसेच मोहक व डौलदार टोप्या, लहान मुलांचे फॅन्सी ड्रेस, मखमल साटिन, राजा रविवर्मा तसेंच इतर देशी व विदेशी चित्रें, फोटो वगैरे मिळण्याचें एकमेव ठिकाण.

★

: फोन :

ऑफिस २७३३०

दुकान २५८३१

: टे. ग्राम :

ALUMINIUM




सोल प्रोप्रायटर-

एम्. एन्. देसाई टोपीवाला

मोतीबाझार मुंबई, २

## रा. ब. अनंत शिवाजी देसाई टोपीवाला




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# ही दिवाळी व नूतन वर्ष आमच्या असंख्य

## ग्राहकांस सुखाचें व समृद्धीचें जावो !




४८ तास असणारा मस्त सुगंध असलेलें—

# अत्तरलव्ह

रजिष्टर्ड

वापरून ही दीपावली उत्साहानें साजरी करा. बाटली किंमत १० आणे व १। रु. व्ही. पी. खर्च निराळा. शिवाय हिरवा चाफा, जाई, जुई, मोगरी, हिना, केवडा, खस, गुलाब वगैरे माल मिळण्याचें एकच ठिकाण,




G.J.B.

## अत्तर लव्ह डेपो
ठाकुरद्वार, बम्बई. २.


अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# तरंग

: कवि :

सोपानदेव चौधरी

येई नाचत शारदा
देहभान लागे सरूं
माझ्या मनींचे तरंग
तिच्या पायींचे घुंघुरु !
धरित्री मी तुझी माता
देसी पाय माझ्या उरीं
माझ्या चरणीं जे झुके
धरिसी त्या नभा शिरीं,
कुणीं तोडे फळेफुलें
कुणीं घालो अंगीं घाव
वृक्ष शिरे माझ्या कुशीं
मातृभक्ति याचें नांव !
अंगीं ठोकीयल्या मेखा
पोटावरी तार ताणे
लावूनिया गळां तात
शिकली सारंगी गाणें;
मुखीं चर्माच्या मुसक्या
ओठीं घाव दे हातोडी
वरी बैसता तडाखे
बोले तबल्याची जोडी !
कुमारी होत गृहिणी
लाभतां पतिबंधनें
कल्पना, कविता होई
लेवुनी छंद-बंधनें !


कसोटीस उतरून
लोकादरास पात्र
झालेला "ईस्टर्न"चा
माल वापरण्यांत प्रत्येकजण
अभिमान मानतो—



तुम्हांस आवडतील असे शूज,
निरनिराळ्या तऱ्हा,
सुबक आणि टिकाऊ—

●

तसेंच सर्व तऱ्हेचें लेदर गुड्स्-

●

होल्डॉल्स-सूट केसीस—
यांची खरेदी आमचेकडे करा !



इस्टर्न लेदर वर्क्स
कॉर्नर ऑफ सँढर्स्ट रोड, आणि
गिरगांव बँक रोड, मुंबई नं. ४


अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

[ पान ६२ वरून चालू ]

परत दाबली गेल्याचा आवाज त्याच्या कानावर आला. वहिनींची लचकती छाया परत एकदां कांचतावदानावर दिसली आणि त्यांच्या कंबरेभोंवतीं हात घालणारी दादांची लठ्ठ आणि ओबडधोबड आकृती. दादांनीं वहिनीच्या कंबरेभोंवती हात घातला एवढेंच नव्हे तर त्या दादांना झिडकारत असतां त्यांना जवळ घेऊन-! छीः! अगदीं सिनेमांतल्या मडमेसारखें वर्तन! आणि तेंहि त्या गोरीलासारख्या दादांनीं आपल्या सुंदर वहिनींच्या बाबतींत करावें! कसल्यातरी तीव्र आणि जळत्या रागानें बबनचें मस्तक तडतडलें! लहान मुलांच्या फक्त गालाचे पापे घ्यायचे असतात अशी त्याची बरेच दिवस कल्पना होती. पण मोठ्या पुरुषानें मोठ्या बाईच्या अगदीं तोंडात....! भैय्या टोणगे सांगतो तें खरं आहे एकूण! अरेरे, वहिनी!

एखाद्या अस्वलाच्या मिठींत सुंदर राजकन्या दिसावी, तशी दुबऱ्या दादांच्या कवेंत वहिनीची छायाकृति दिसत होती. तें दृश्य बबनला पाहवेना. आणि तरीहि त्या दृश्यावरून त्याचे डोळे निघेनात. त्या छाया पाहात असतांना एक फाजील देखावा आपण पाहात आहोंत एवढेंच त्याला वाटलें नाहीं, तर एक असह्य अत्याचार आपण पहात आहोंत असें त्याला वाटलें. बांधल्या नजरेनें बबन तिकडे पहात असतांच पुनःदिव्याची गुंडी दाबल्याचा आवाज होऊन वहिनींच्या खोलींत अंधेर झाला. छाया काळोखांत मिळून गेल्या व शक्तिपात झालेल्या माणसाप्रमाणें बबनचा जीव हल्लक पडला.

त्याच दमलेल्या अवस्थेंत बिछान्यावर अंग टाकून बबन आढ्याकडे पहात राहिला. बाहेर पावसाची रप रप सुरू झाली. पाकोळ्यावरून अखंडपणें पाणी ओघळत असल्याचा आवाज ऐकूं येऊं लागला. गार वारा वारंवार अंगाला चाटून जाऊं लागला. बबनचे डोळे अर्धवट मिटूं लागले. " Gold diggers of New York " ह्या बोलपटांतल्या इंग्रजी संगीताचे सूर सुरूं झाले. खिदळत नाचणाऱ्या अर्धवस्त्रावृत गौर युवतींचे पाय वर खालीं जातांना दिसूं लागले. संगीताचा आवाज, नर्तनाची टप्टप्, पावसाचा आवाज, नर्तिकांचे गिरक्या घेणारे ताफे ह्यांची एकच सरमिसळ झाली. लहान्या मांड्यांनी व उघड्या पोटऱ्यांनी नाचणाऱ्या त्या बायकांच्या मधील एकीचा चेहरा व आकृती अगदीं वहिनीसारखी होती. बबनचे डोळे पूर्णपणें मिटले, व झोंपेंत मधूनच आंठ्या घालणाऱ्या व स्फुरणाऱ्या त्याच्या चेहऱ्यावर निळ्या दिव्याचा मंद प्रकाश सारखा पडत राहिला.

सकाळीं बबन उठला तो चिडचिड करीतच उठला. झोंपेमुळें सुद्धां त्याच्या मनाला प्रसन्नता आली नव्हती. आज सकाळींच कसल्यातरी महत्त्वाच्या केससाठीं नाना फडके वकीलाकडे खलबत करायला गेले हें बरें झालें. त्यामुळें कालच्या सिनेमाची गोष्ट सांगण्याचा प्रश्न बहुधा लांबणावर पडला आणि सकाळीं बाहेर जाण्यापूर्वी ते बहुधा एकदां त्याच्या खोलीत येऊन गेले होते. कारण मलपृष्ठ फाडलेलें ' Prisoner of Zenda ' त्यानें तिथें टाकलें होतें तिथें तें आतां नव्हतें. तें व्यवस्थित रॅकवर ठेवलें गेलें होतें. रात्रीं पोरानें बरेंच जागरण केलें आहे, अशाच कल्पनेनें नानांनीं त्याला जागें केलें नाहीं!

अंथरूणावर सूर्याचीं पहिलीं किरणें आलीं. तरी बबनला उठावेसें वाटेना. संवयीप्रमाणें टिप्या जोरजोरानें शेपूट हालवीत त्याच्या खोलींत आला आणि जीभ काढीत पलंगावर पुढचे पाय देऊन उभा राहिला. तेव्हां बबननें त्याच्या डोक्यावर थोपटण्याऐवजीं त्याला पडल्या पडल्या लाथेनें दूर ढकललें. टिप्याला हा अनुभव नवीन होता. तक्रारीचा शब्द काढीत त्यानें पुनः बबनच्या अंगावर पंजे टेकले. तेव्हां कुठें तो उठला व तोंड धुवायला खालीं गेला.

परसदारीं जातांनाच वाटेंत त्याला त्याच्याकडे आलेल्या तरुण जोडप्याची खोली लागली. खोलीचें दार उघडेंच होतें आणि आंत कुणीच नव्हतें. बिछाना, पांघरायची चादर, उशा, कांहींच आंवरलेलें नव्हतें. मऊ उशांवर दबलेल्या जागीं मस्तकांचे अस्पष्ट ठसे दिसत होते. पलंगावरील मच्छरदाणीच्या चौकटीवर बायका आंतून घालतात ती मलमलीची कांचोळी लोंबत होती. तो पलंग, त्या उशा, ती चादर आणि ती कांचोळी पाहून बबनला कसेंसेंच झालें. काल रात्रीं आपण जें कांहीं पाहिलें, तो कुठल्यातरी स्वप्नांत झालेला भास होता, असें आतांपर्यंत त्याला वाटत होतें, पण आतां मात्र तें सारें दुःख, ती सारी हुरहुर पुनः जीवंतपणाच्या नव्या तीव्रतेनें झाली.

तोंडांत ब्रश घालून न्हाणी घराच्या बाहेर बबन उभा असतांच होऊं नये तें झालें. एका हातांत फुलांची परडी घेऊन गांवत पळत वहिनी त्याच्या जवळ आल्या आणि बादलींतल्या गरम पाण्याचे चार थेंब त्यांनीं त्याच्या अंगावर उडवले. वहिनींना पाहून आज बबनला आनंद झाला नाहीं. उलट त्यानें कपाळाला आंठ्या घातल्या आणि तोंड फिरविलें. "एक माणूस रागावलं आहे वाटतं आज?" त्या त्याच्या बाळसेदार गालांवर टिचकी मारायला गेल्या, तेव्हां त्यांचा हात त्यानें हिसडून टाकला. तेवढ्यांत तोंडावर पदर ठेवून फिदीफिदी हंसत काशीबाई मोलकरीण तिथून गेली. काशीबाईनें ही दुनियाला बेचैन करील इतक्या कुत्सितपणें हंसायची कला कुठून पैदा केली देव जाणे! वास्तविक तिच्याच तरुणपणाच्या चरित्राचा डंका अजून गांवांत वाजत होता. म्हणून बहुधा तिला कां, कुठें आणि कसें हंसायचें हें चांगलें माहित झालें होतें. काशीबाईच्या दृष्टीला दृष्टी मिळतांच वहिनींच्या चेहऱ्याचा रंग पालटला आणि " वात्रट मेली " असें म्हणत त्या तिथून निघून गेल्या.

बबन जरा कुठें आपल्या खोलींत येऊन पुस्तक हातांत घेतो न घेतो, तोंच जिन्यावर पावलें वाजलीं आणि त्याच्या खोलींत सुमन आली. सुमनच्या बंगल्याचें आवार बबनच्या आवाराला लागूनच होतें. बबनचा जसा नुकताच सोळावा वाढदिवस झाला होता तसाच सुमनचा चौदावा वाढदिवस झाला होता. त्या दोघांचा जन्म एकाच महिन्यांतला होता. लहानपणापासून सुमन बबनबरोबर खेळत असे आणि त्याच्याकडे येत असे. त्यांच्या दरम्यान होणारा रंगीत मण्यांचा, मोरांच्या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

पिसांचा आणि खडूच्या कांड्यांचा व्यापार नुकताच थांबला होता. परकर आणि फ्रॉक टाकून सुमन साडी नेसायला लागली. त्याला अद्याप फारसे दिवस झाले नव्हते. सुमन मोठ्या निरोगी प्रकृतीची मुलगी होती. यामुळें ती होती त्यापेक्षां किंचित् मोठी दिसे. पण तरीहि वहिनीविषयीं बबनला जें कांहीं वाटे, तें सुमनविषयीं वाटत नव्हतें. वहिनी पूर्णावस्थेच्या अगदीं जवळ गेलेल्या गुलाबासारख्या असल्या तर सुमन घट्ट आणि अस्फुट अशा गुलाब कळीसारखी होती. ती फ्रॉक आणि परकराऐवजीं साडी नेसूं लागली होती एवढेंच, पण तिच्या वर्तनांतला पोरपणा अजूनहि गेला नव्हता. " सुमन बबनची बायको !" ही आसपास लोकप्रिय असलेली आरोळी अलिकडेच बंद पडली होती, पण त्या आरोळींत बबनला कधींच फारसा अर्थ वाटला नव्हता. ती आरोळी ऐकून पूर्वी उभयपक्षाचे लोक हंसत, पण आजकाल दोन्ही पक्षांचें वर्तन बरेंच बदललें होतें. सुमन बबनच्या खोलींत येऊन टेकते न टेकते तोंच मेंदीच्या कुंपणाआडून तिच्या आईची हांक ऐकूं येई— " अग सुमन ! आंग नाहीं धुवायचं का आज ? " आणि बबनची आईहि कांहींतरी निमित्त काढून सोधन्याला हात पुसत तेवढ्यांतल्या तेवढ्यांत वर चार फेऱ्या मारून जाई.

वेणीचा शेंपटा सांवरत सुमन जवळच्या किरकोळ ' सुंदरदास ' खुर्चीवर बसली तेव्हां बबन तिच्याकडे पाहात राहिला. परकरांतली सुमन त्या खुर्चीवर बसलेली बबननें पाहिली होती. पुण्याला घालवलेला उन्हाळा सुमनला फारच मानवला म्हणायचा ! खुर्चीची बैठक आतां कुठेंच रिकामी दिसत नव्हती !

" काय फुगली आहेस ग सुमने " डोळे विस्फारून बबन म्हणाला.

" आणखी तुझा आवाज तरी काय भसाडा झाला आहे ! ती मिसूड काय, त्या तोंडावर पुटकुळ्या काय...अहारे—! "

" मोठ्या पुरुषासारखा दिसायला लागलों मी आतां ? " बबननें उत्सुकतेनें विचारलें. पुरुषासारखें दिसणें ही बबनची फार जुनी महत्त्वाकांक्षा होती. स्वतःचा कोवळा चेहेरा त्याला अगदीं नकोसा झाला होता. कोवळेपणावर तोडगा म्हणून चेहेऱ्यावरून रोज सेफ्टी वस्तरा फिरविण्याचा सल्लासुद्धां त्याला टोणगेकडून मिळाला होता.

" अगदीं फार नाहीं. थोडा थोडा ! " बबनचा सौंदर्याच्या मर्दानी वळणाकडे जाणारा चेहेरा न्याहाळीत सुमन म्हणाली.

" तूं सुद्धां वहिनीसारखी दिसायला लागलीस थोडी ! "

बबन हातांत डिव्हायडर घेऊन मेजावर वर्तुळें काढीत होता. सुमन ओटावर पेन्सिल टेवून थोडा वेळ विचार करीत होती. मग कांहींतरी निश्चय झाल्यासारख्या स्वरांत सुमन म्हणाली—" तुला एक सांगूं ? " तिची चिंचोळी हनुवटी वर उचलली गेली. " सुमन बबनची बायको !" ही जुनी आरोळी बबनच्या कानांत घुमली व तिला कांहींतरी पुसट अर्थ आल्यासारखें त्याला वाटलें.

" Princess Flaria म्हणजे कोण रे ? "

" हें सांगणं झालं नाहीं सुमन. हें विचारणं झालं ! इंग्रजी पांचवी शिकते आहेस ! "

" बरं रे ! पण Princess Flaria म्हणजे कोण ? "

" आम्हांला Prisoner of Zenda आहे ना. त्यांतली ती नायिका आहे. ती ब्लॅक मायकेलला हवी असते. ब्लॅक मायकेल हा व्हिलन असतो. रूडोल्फ रॅसेंडिलवर तिचं प्रेम असतं. रूडोल्फ रॅसेंडिल हा नायक असतो. पण तिचं त्याच्याशीं लग्न होत नाहीं. तिचं लग्न खऱ्या राजाशीं होतं. Honour binds a woman too असं ती शेवटीं म्हणते. महत्त्वाचं वाक्य आहे ! " एक दमांत सांगतां येईल तें बबननें सांगितलें.

" अस्सं " सुमन म्हणाली. अजूनहि तिचा चेहेरा विचारीत होता.

" का बरं ? " डिव्हायडरनें काढत आलेलें नवें वर्तुळ तसेंच सोडून बबननें विचारलें.

" तो टोणगे आहे ना ? "

" हं ऽ "

" मी आणि कावेरी कर्वे शाळेंत जायला लागलों कीं तो आम्हांला आवाज देतो. "

" काय म्हणतो ? " रागानें जास्तच घोगऱ्या झालेल्या आवाजांत बबननें विचारलें.

" मला म्हणतो Princess Flaria आणि तिला म्हणतो Antoinette De Mauban अन्टॉयनेट डी मॉबाँ म्हणजे कोण ? "

" ती एक विधवा असते. ब्लॅक मायकलेवर तिचं प्रेम असतं; पण त्याचं तिच्यावर नसतं....थांब सुमन, दाखवतों साल्याला आज–! "

" शी: ! शिव्या काय देतोस घाणेरड्या ! टोणगेसारखंच बोलायला शिकला आहेस तूं सुद्धां ! "

बबनच्या तोंडांतून सहसा अपशब्द निघत नसे. पण मिसरूड आणि घोगरा आवाज हें जसें त्याला पौरुषाचें चिन्ह वाटे, तसेंच इरसाल शिव्या देतां येणें हेंहि वाटे. टोणगेचा ज्या कांहीं थोड्या बाबतींत त्याला हेवा वाटत असे, त्यापैकीं त्याचें शिव्याशास्त्रावरील साहजिक प्रभुत्व ही एक होती. ह्याक्षणीं मात्र अनावर संतापामुळें त्याच्या तोंडांतून शिवी निघून गेली व तो गुरगुरत म्हणाला—

" समजलं ग आजीबाई ! "

" मारामारी मात्र करूं नकोस हं बबन " बबननें आपल्यासाठीं मारामारी करावी असेंच वास्तविक सुमनला वाटत होतें. तसाच बबननेंहि निश्चय केला होता. वहिनीविषयीं ती भाषा ! सुमनविषयीं ही ! बदमाष साला !

" जेवायचं झालं आहे रे बबन ! " जिन्यांतून आईची हांक आली.

" आज आंग नाहीं का धुवायचं सुमे ? " मेंदीच्या कुंपणाआडून सुमनच्या आईचा आवाज उठला.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"सुमन बबनची बायको" केव्हांचा तरी विस्मृत कोलाहल बबनच्या कानांत घुमून गेला! "आले–आले" म्हणून म्हणत क्षणार्धांत सुमन जिना उतरून गेली. तिनें रिकाम्या केलेल्या 'सुंदरदास' खुर्चीच्या बैठकीकडे कांहीं मिनिटें बबन पहात राहिला.

●

टोणगेविषयींच्या आकसानें धुमसतच आज बबन शाळेंत आला. टोणगे वहिनींविषयीं आजपर्यंत जें बोलला होता त्यामुळें बबन रागावला अवश्य. पण टोणगेचें बोलणें खरें व्हावें? त्या बोलण्याची त्याला प्रचीति यावी? ह्या प्रचीतीच्या जाणीवेमुळें बबन जळून खाक झाला. त्याच्यासारख्या देखण्या मुलाचें वहिनींनीं लाड केले तर तें एक ठीक आहे पण तिला दादांनीं—? दादांच्या आठवणीमुळें सुद्धां आतां बबनचें मन दुखलें. दादांविषयींचा राग, वहिनींविषयींचा राग सुमनविषयींचा राग, साऱ्यांचा राग त्याला आतां एकस्या टोणगेवर काढायचा होता. ब्लॅक मायकेलला रुडोल्फ रॅसेंडिल भ्याला नव्हता. रूपर्ड ऑफ ह्रेटझा तर कुणाला कधींच मोजत नसे. बबनहि आतां त्या टोणग्याला भिणार नव्हता. वहिनींचा अपमान! सुमनचा अपमान! Princess Flaria काय! मला 'पोरगी' समजतो होय लेकाचा! खिशांत वेगळा काढून ठेवलेला डिव्हायडर बबननें चांचपून पाहिला व दांत खात तो स्वतःशीं म्हणाला, 'टोणगे–टोणगे!'

बबनला ज्याची तहान लागली होती तो महात्मा यावेळीं फार दूर नव्हता. बबननें शाळेची सारी हिरवळ आणि आवार त्याच्यासाठीं धुंडलें. तेव्हां तो जवळच्या उपाहारगृहांत चहा व पोहे फस्त करून शांतपणें अखेरची सिगारेट ओढीत होता. होमवर्क करून न आणल्यामुळें इंग्रजीच्या पहिल्या तासाला त्यानें काट मारला व पहिल्या तासाला काट मारला या सबळ कारणास्तव त्यानें दुसऱ्या व तिसऱ्या तासाला काट मारला. मधल्या सुटींतला उपहाराचा कार्यक्रम चोखपणें पारपडल्यावर आतां तो शाळेच्या हिरवळीवर सांपडेल त्याची थोडीशी चेष्टा करणार होता. व मग घरीं पसार होणार होता. सिगारेटचा वास मारण्यासाठीं तोंडांत बडीशेप व वेलदोडे भरण्याची अनवश्यक खबरदारी घेत डुलत डुलत टोणगे हिरवळीवर आला. तेव्हां तो बबनचीच आठवण करीत होता. सुमनची ओळख करून देण्याविषयीं नवी विनंति त्याला बबनपाशीं करायची होती. कर्नल सॅप्ट, फ्रीट्झ् व्हॉन टार्लेनहिम, मार्शल स्ट्रॅकेन्झ इत्यादी किरकोळ नांवांची यथायोग्य वांटणी उरलेल्या वर्गबंधूंत करून क्रमिक पुस्तकाच्या वाचनाचें तुजबी ज्ञान कारणीं कसें लावावयाचें या विषयींहि त्यानें कांहीं विचार करून ठेवला होता. आणि हो! त्या बबन्याला त्याच्या वहिनीविषयींची दुःखदायक वार्ता सांगणेंहि अतिशय मनोरंजक ठरणार होतें. इकडे तिकडे भिरभिर पहात आणि खिसा चांचपत कारंज्याशीं उभा असलेला बबन टोणगेच्या दृष्टिपथांत येतांच तोंडांत घुटमळणारा शिलकी धूर नाकपुड्यांवाटे सोडून तो जोरानें ओरडला,

"बबन्या–"

थांबत बबन त्याच्याकडे आला आणि कमालीच्या उद्धटपणें खेंकसला, "काय रे साल्या ब्लॅक मायकेल!"

नशानें वखटी खाऊन शिकारी कुत्र्यावर हल्ला केल्याचा देखावा टोणगेनें पाहिला असता तरी त्याला अधिक आश्चर्य वाटलें नसतें. तुसत्या आश्चर्यानें क्षणभर त्याची वाचा बसली. तेलिया रंगाच्या टोणगेची अशी जिरलेली पाहून जवळच उभी असलेली चार पोरटीं हंसलीं नसतीं तर टोणगे आणखी कांहीं वेळ शुद्धीवर आला नसता. पण त्या हंसण्यानें आपल्या झालेल्या भयंकर अपमानाची जाणीव त्याला दिली. व अतिशय वात्रट स्वर काढून हातवारे करीत तो बबनला म्हणाला,

"क्यां ऽ ऽ वहिनी, येऊं का गालगुच्चा?"

बबनच्या संतापानें भीतीच्या व दूरदर्शीपणाच्या मर्यादा पार ओलांडल्या. वहिनींच्या दिशेनें शब्द नव्हे, तर टोणगेचे गलिच्छ हात जात आहेत असें त्याला वाटलें. चटकन् त्यानें खिशांतला टोंकदार डिव्हायडर काढला आणि "ये साल्या ये" म्हणून टोणगेच्या खांद्यावर, दंडावर, हातावर, वार करायला सुरवात केली. बबन दिसायला गोजिरवाणा असला तरी अशक्त नव्हता. एरवीं वयानें व शरीरानें मोठ्या असलेल्या टोणगेनें बबनला कावूंत आणलें असतें, पण बबनचा विलक्षण आवेश पाहून तो दिपून गेला. अंगात जाड कोट असला तरी डिव्हायडर ही वस्तू फारच बोंचते असें त्याच्या लक्षांत आलें. स्वतःच्या निःशस्त्र अवस्थेची त्याला जाणीव झाली आणि स्वतःच्या हातांतलें पुस्तक ढालीसारखें नाचवीत "अरे अरे बबन्या, पहा रे ह्याला कोणी सांगा. नाहीं तर ह्याचा खिमा करीन" असें ओरडत तो मागें मागें सरूं लागला.

बबनचा खिमा किंवा चटणी करण्याचा टोणगेचा बिलकुल विचार नव्हता. बहुतेक गुंडांप्रमाणें तोहि भेकड होता. बबनचा जीवघेऊ आवेश पाहून तो वास्तविक हादरला होता आणि कोणी तरी वेळींच पडून आपली अब्रू वांचवावी अशी त्याची परमेश्वरापाशीं मनोमय प्रार्थना होती. टोणगेची प्रार्थना सुद्धा ऐकण्याची त्यावेळीं परमेश्वराला लहर लागली आणि घाईघाईनें टांगा टाकीत आलेल्या तालिम मास्तरांनीं बबनकडे एक आश्चर्याचा आणि कौतुकाचा दृष्टिक्षेप करून बबनला टोणगे पासून दूर केलें. पण या मध्यस्तीमुळें टोणगेची इभ्रत मात्र वाचली नाहीं. कारण जातां जातां तालिम मास्तरांनी टोणगेच्या कानशिलांत एक सणसणीत थप्पड ठेवून दिली.

बबनचें तोंड लाल झालें होतें. आणि आवेशानें व आनंदानें त्याचे ओठ थरथर कांपत होते. त्याला ओरडून म्हणावेसें वाटत होतें "वहिनी, वहिनी, पाहिलंत मी तुमच्यासाठीं काय केलं?"

●

दोन्ही हात सोडून सायकल चालवीत बबन आपल्या बंगलीच्या दारासमोर उतरला आणि कॅरिअरवरचीं पुस्तकें काढीत त्यानें हळूच वहिनींच्या माडीकडे पाहिलें. बबनची शाळेंतून घरीं यायची वेळ झाली



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

म्हणजे वहिनी साधारणत: अपल्या माडीच्या दारांत उभ्या असत. निदान बबननें सायकलची घंटा वाजवली म्हणजे तरी त्या जरूर दारांत येत. पण आज वहिनी माडींत नव्हत्या. त्यांच्या माडींत पुष्कळसें सामान विसकटून पडलें होतें आणि उघड्या बंबी शरीरानें जानव्यांतून बोटें फिरवीत आणि प्रयत्नानें हालचाल करीत दादा एक होल्ड ऑल बांधण्याच्या फिकिरींत होते. तो देखावा पाहून बबनचें काळीज धडधडलें. व जोरजोरानें तो सायकलची घंटा वाजवीत सुटला. पण छे;! वहिनी दारांत आल्या नाहींत !

" ऐकलंस का बबन ? स्वयंपाकघराच्या दारांत बबननें पाऊल टाकतांच त्याची आई म्हणाली, " तुझ्या वहिनी जाणार आहेत. "

" कुठं ? " हातांतला लाडू परत वशींत ठेवीत बबननें विचारलें.

" दादांची तारेनं बदली झाली आहे. उद्यां सकाळींच ते तिला माहेरीं पोंचविणार आहेत. पुन: केव्हां भेट होईल पोरीची तें खरं ! "

बबनचा जीव गुदमरला. समोरची दशी त्यानें बाजूला ढकलली. जवळच काम करणाऱ्या काशीबाईकडे वळून त्याची आई पुढें म्हणाली,

" कशी सोन्यासारखी पोर आहे ! एखादं मूल असतं तिला म्हणजे किती बरं झालं असतं. "

काशीबाई हंसली. तिच्या बेचैन करणाऱ्या पद्धतीनें ती हंसली आणि म्हणाली,

" बबनराव, तो लाडू खा कीं, वहिनी जाणार म्हणून इतकं कांहीं नको वाईट वाटून घ्यायला ! "

" इश्श ! बबन हें रे काय ? येईलच तुला भेटायला सावित्री वहिनी इतक्यांत ! सांगून गेली आहे मला ती. " बबनची आई.

" मग आज झोकेच झोके " काशीबाईचें पुन: तेंच हंसणें !

●

झोंपाळयाच्या " कर्रर-कूं, कर्रर कूं " असा आवाज होत होता. झोका वर खालीं जातांना विजेच्या दिव्यांत वहिनींच्या नाकांतली चमकी झगमगून उठत होती. वाऱ्याच्या प्रत्येक झोताबरोबर तिनें डोक्यांत घातलेल्या केवड्याच्या पानाचा दरवळ सुटे. भुईला पाय लावून वहिनींनीं ते परत सरळ केले कीं कर्दळीच्या गाभ्यासारख्या तिच्या पोटऱ्या किंचित् दिसत आणि वाऱ्याबर उडणारा तिच्या इलकली लुगड्याचा पदर एकाद्या परीच्या पंखासारखा फडफडे.

बबनला अगदीं जवळ घेऊन आज वहिनी झोके घेत होती. फुलपांखरानें गुलाबाला बिलगावें तसा बबन वहिनींला बिलगून बसला होता. वहिनींच्या कपड्यांचा, वहिनींच्या तरुण शरीराचा, वहिनींच्या डोक्यांतला केवड्याचा वास बबनच्या रोमारोमांत भिनत होता. तिच्या बांगड्यांचा आवाज त्याला ऐकूं येत होता. तिची शुभ्र दंतपंक्ति त्याला दिसत होती. तिच्या नाकांतील अलंकार त्याच्या डोळ्यासमोर नाचत होता. मधुनच वहिनीचा हात त्याच्याभोंवतीं पडे व मग मखमलीच्या उशींत तुसत्या सुखानें गुदमरावें तसें त्याला होई. झोपाळा खालीं जात होता आणि वर येत होता. खालीं जातू होता आणि वर ! इतकें सुख बबननें कधीं पाहिलें नव्हतें. इतकें दु:ख बबननें कधीं अनुभवलें नव्हतें. बांगड्यांचा आवाज, हिऱ्याची झळाळी, केवड्याचा सुवास, रेशमाची सळसळी, गति, गति, गति, वाऱ्याचे झोत, वर आणि खालीं ! वर आणि खालीं !

चेतना गेल्यासारखा बबन वहिनीच्या पुढ्यांत बसला होता त्याला कितीतरी बोलावेसें वाटत होतें. पण कांहींच बोलतां येत नव्हतें. मधेंच वहिनींनीं झोक्याची गति कमी केली, तेव्हां घाबरून वर पाहात बबन म्हणाला,

" वहिनी "

" काय बबून ? "

" तुम्हीं माझ्यावर रागावल्यात ? "

" नाहीं रे ! "

" मग झोंका का थांबवतां ? "

" घरीं नको का जायला आतां ? "

" आणखी थोडा वेळ "

" उशीर होतो बबन ! "

वहिनींनीं आपले गुलाबी पाय पुन:भुईवर टेकले. त्यांनीं पुन:झोपाळ्याला गति दिली. मूर्तिमंत सुखावर रेलावें तसा बबन त्यांच्यावर रेलला. आणि पुन:एकदां बांगड्या वाजल्या, पुन: केवडा सुवास उधळूं लागला, पुन: हिरकणी चकाकूं लागली. अगदीं थोडावेळ गेला असें बबनला वाटलें. तेव्हां पुन: झोका मंदावला.

" बबन, "

" नकोना वहिनी "

" उशीर होतो रे ! "

" आणखी एकदां, शप्पत एकदांच "

" वेडा मुलगा "

" पुन:झोंका वर चढला. पुन: परीचे पंख पसरले. प्रसन्नतेच्या परमावधीनें बबन म्हणाला,

" वहिनी "

" काय ? "

" मी आज काय केलं माहीत आहे ? "

" काय केलंस् ? "

" भय्या टोणगेला पिटून काढलं "

" बारे ! "

" कां ? माहित आहे ? "

" कां ? "

" तो तुमच्याविषयीं फाजील बोलला म्हणून. "

बबनचा हात दाबला गेला. त्याचा गाल कुसकरला गेला. वहिनीसाठीं आपण शाळेतल्या प्रत्येक मुलाला डिव्हायडरनें भोसकून काढूं शकूं असें त्या क्षणीं बबनला वाटलें. झोपाळयाचा लयबद्ध आवाज वेगानें चालू झाला " कर्रर कूं, कर्रर कूं "—

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

घड्याळाचे काटे थांबावेत, पृथ्वीचें भ्रमण थांबावें, आणि केवळ आपला झोका चालू रहावा असें बबनला वाटत होतें. बबनची आई शोधण्याला ओले हात पुसत चार दोनदां तेथें येऊन गेली. तिनेंसुद्धां "बबन दिवसें दिवस लहान होतो आहेस कां रे तूं?" ही ठरीव सलामी त्याला दिली नाहीं. वहिनींनी झोपाळ्याची गति मंद केली कीं त्यांना अधिकच बिलगून बबन म्हणे,

"एकदांच, शप्पत एकदांच. उद्यां तुम्ही जाणार. पुनः कधीं मग झोके घेऊं आपण?" आणि थोडें बहुत भान हरपलेल्या वहिनी पुनः झोपाळ्याला गति देत, पुनः बांगड्यांची किणकिण, पुनः केवड्याचा सुवास, पुनः पदराची फडफड, कर्रर्र कूं, कर्रर्र कूं.—

बाहेर नानांची दिशा दणाणणारी गर्जना ऐकूं येईपर्यंत हें असेंच चाललें होतें.

हात उष्टावल्यासारखा करून बबन जो पानावरून उठला, तो तडक आपल्या खोलींत गेला आणि उशीवर तोंड लपवून ओक्शाबोक्शीं रडूं लागला. आपल्याला काय होतें आहे तें बबनला कळेना. त्याचें शरीर आणि मन सारखें हेलावत आणि उचंबळत होतें आणि छाती फाटून गेल्यासारखा स्फुंदून स्फुंदून तो रडत होता. आपलें आयुष्य अगदीं उजाड झालें, त्यांत आतां कांहीं उरलें नाहीं, असें त्याला वाटत होतें. आपलें हें रडणें कधींच संपणार नाहीं, कधींच संपूं नये असें त्याला वाटत होतें. आता काय थोडें सुख असेल, आतां काय थोडें समाधान असेल तर तें केवळ रडण्यांत. दुःखाच्या राहून राहून येणाऱ्या प्रत्येक उमाळ्याबरोबर बबनचें सारें शरीर वादळांत सांपडलेल्या रोपट्याप्रमाणें कांपत होतें "वहिनी, वहिनी" तो उशीवर तोंड दाबून मोठमोठाले हुंदके देत म्हणत होता, "वहिनी, वहिनी"—

रडतां रडतां बबनला झोंप लागली त्याच्या चेहेऱ्यावर अजूनहि अश्रूंचे सुकलेले ओघळ होते. पण दुःखाच्या खुणा मात्र आतां तेथून पूर्णपणें पुसल्या गेल्या होत्या. झोंपेंत त्याच्या चेहेऱ्याच्या स्नायूंची हालचाल सुरूं झाली. व फवाऱ्यानें पाणी उडविल्यामुळें थरकणाऱ्या बागेसारखा त्याचा चेहेरा टवटवीत दिसूं लागला. बबनला स्वप्न पडत होतें. त्याच्या स्वप्नसृष्टींत आतां सुमननें प्रवेश केला होता. आणि बापरे! सुमनची आकृती हळुहळू अगदीं वहिनीसारखी भरीव आणि डौलदार बनत चालली होती. एखाद्या तडागावर वाऱ्यानें लहर उमटावी तसें बबनच्या चेहेऱ्यावर स्मित उमटलें आणि पसरत गेलें. त्या स्मितावर विजेच्या निळ्या दिव्याचा मंद आणि शांत प्रकाश पडला होता.



## आवाहन

येइ जिवलगे! मन्दिरांत या
जीवनतृष्णा ने मम विलया!
    विश्वलोचनीं निद्रा भरली
    चन्द्र नभीं ये चोर पाउलीं
    गन्धभरें दशदिशा दाटलीं
आतुर करि रजनीची छाया!
    सकलहि अपुलें वैभव घेउनि
    ये ये सखये, माझ्या सदनीं
    करुणामय अनुराग वितरुनी
पावन करि गे झोंपडीस या!
    तुझिया चरणस्पर्शें प्यारी
    स्वर्णछटा ये धुळींत न्यारी,
    अतुलनीय तव मनोमाधुरी—
दवडुं नको हें वैभव वाया!
    माड उभा गंभीर समोरी
    दूर खळखळे नदी रुपेरी
    सार्थ करूं ही घटिका गहिरी
मधुर अनुभवूं मीलनमाया!
    स्वप्न सखे तूं मम नयनांचें,
    भावगीत तूं माझ्या उरिचें
    मळे बहरवी रोमांचांचे—
स्पर्शसुखें तव कोमल काया!
    युगायुगांतुनि धुंडुनि तुजला,
    जीवजाहला व्याकुळ, शिणला,
    वर्षुनि अपुल्या प्रीतिजलाला—
ये गे जीवित सफल कराया!

—शान्ता ज. शेळके

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




NEW JACK PRINTING WORKS LTD.

● LETTERPRESS ● LITHOGRAPHY
● BLOCK-MAKING ● OFFSET
&
PHOTO ENGRAVING

●

*Specialists in Designing & Manufacturing Packages*

●

CARTOON & PAPER BOXES

**New Jack Printing Works Ltd.**
Delisle Road, Globe Mills
Passage, Parel, Bombay.
Phone: 45594




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# नायक आणि नायिका

: लेखक :
वसंत शांताराम देसाई

**● गडकऱ्यांचा सुधाकर कसा आहे हें त्याच्या कृतीवरून आणि उक्तीवरूनच ठरविलें पाहिजे. त्याच्या कृतीचें आणि उक्तीचें संशोधन केल्यानंतर, तो जर अत्यंत हीन दर्जाचा मनुष्य ठरला तर त्यामुळें गडकरीभक्तांना विषाद वाटण्याचें कारण नाहीं.**

सुधाकर हा एकच प्याल्याचा नायक आहे. एका कुलीन घराण्यांतल्या तरुण आणि यशस्वी वकिलाच्या संसाराची दारूमुळें कशी धूळधाण झाली तें दाखविण्याकरितां त्याची योजना झाली आहे. सुधाकरासंबंधीचें रामलालचें मत नाटकाच्या पहिल्या प्रवेशांत प्रेक्षकांना सविस्तर ऐकवून गडकऱ्यांनीं पुढील कथानकाची वैचारिक पार्श्वभूमी तयार केली आहे. रामलालच्या मताप्रमाणें सुधाकर म्हणजे "जनसमुद्राच्या गरीब तळाशीं सांपडलेलं एक अमूल्य रत्न आहे." तो अलौकिक बुद्धिमान असून, स्वतंत्र कर्तृत्वामुळें "त्याचा मूळचा मानीपणा जवळच्या मित्रांना सुद्धां असह्य होण्याइतक्या" उग्र स्वरूपाचा झालेला आहे. बरोबरीच्या वकिलांचा मत्सर आणि ज्येष्ठ व्यवसायबंधूंची सहानुभूतिशून्य स्पर्धा अशा खिंडींतून तो आपल्या व्यवसायिक आयुष्यांत मार्गक्रमणा करीत आहे. सबब, "त्याचं कौतुक करणारा, त्याला धीर देणारा, रागाच्या ऐन भरांत त्याचा तोल संभाळणारा आणि त्याच्या अफाट बुद्धिमत्तेला पुरून उरण्याजोग्या कामगिरीमधें त्याला गुंतवून ठेवणारा" जणू काय सुहृदच या नात्यानें त्याला सिंधूच्या हवालीं करून रामलाल परदेशगमन करतो. बंडगार्डनच्या प्रवेशांत पूर्वाश्रमींच्या जिवलग बंधूंचा त्याच्या तोंडीं उल्लेख असला तरी, रामलालशिवाय दुसरा जिवाभावाचा स्नेही उभ्या पुण्यांत सुधाकराला आहे असें दिसत नाहीं. पद्माकराला तो सांगतो, "भाई गेल्यापासून मोकळेपणानं चार शब्द बोलायचं समाधानच नाहींसं झालं आहे." अशा अनेक कारणामुळें क्षीरसागर म्हणतात, "सज्जनांच्या स्नेहशून्य अवस्थेंत जो भेसूर एकलेपणा अनुभवाला येतो…बाजारी, निगरगट्ट आणि मठ्ठ अशा जगांत मानी आणि सरळ मनाचा जो कोंडमारा होतो", त्याचाच परिपाक म्हणजे एकच प्याल्याची शोकांतिका होय! रामलाल काय वाटेल तें सांगो, सुधाकराच्या नाटकांत व्यक्त होणाऱ्या स्वभावधर्मांच्या आणि त्याच्या कृतींच्या उजेडांत हें मत तपासून पाहिलें पाहिजे.

सहवासाला सिंधू नाहीं आणि रामलालही नाहीं, अशा परिस्थितींत सुधाकराची सनद सहा महिने रद्द झाल्यामुळें त्याच्या जीविताच्या शोकांतिकेची सुरवात होते. त्या प्रसंगाची 'चक्षुः वैं सत्यम्' अशी हकिकत फक्त तळिरामाच्या तोंडून आपल्याला समजते. "कुठल्याशा मुद्यावर यांचं म्हणणं मुन्सफांना पटेना—दादासाहेबांनीं नीट समजावून द्यायला पाहिजे होतं—पण नव्या दमांत एवढा पोंच कोठून राहणार?—ते रागारागानं बोलायला लागले—चारचौघांनीं हंसून हेटाळणी करायला सुरवात केली—दादासाहेबांचा सुमार सुटला आणि मुन्सफाला काय होय नव्हे तें बोलूं लागले!" रामलाल सुधाकराच्या उग्र स्वाभिमानाबद्दल ग्वाही देत असला, तर त्याच्यासंबंधीं "शहाणा—सात्त्व" (मन्याबापू पृ. २१) असेंही मत असावें असें दिसतें. एखाद्या मुद्यासंबंधीं एखाद्या तरुण आणि

अनुक्रमणिका






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



दिवाळीच्या मंगल प्रसंगीं
केसासाठीं जगप्रसिद्ध
कामिनिया ऑईल
( रजिस्टर्ड )
वापरून आपलें मन सुप्रसन्न ठेवा.

कपड्यांस व हातरुमालास लावण्यासाठीं
'सेंट चा राजा' म्हणजे
ओटो दिल बहार ( रजिस्टर्ड )
नेहमीं वापरा
= सर्वत्र मिळतात =
अँग्लो इंडियन ड्रग आणि केमि.
कंपनी
मुंबई नं. २




तडफदार वकीलाचा मुन्सफाशीं मतभेद होणें स्वाभाविक आहे. अशा प्रसंगीं आपला मुद्दा नीट समजावून न सांगतां वकिलानें रागारागानें बोलू लागावें आणि त्यामुळें विरुद्ध बाजूच्या वकीलांनी मिस्किलपणें आपल्या अस्तन्यांतून स्मित करीत त्याची हेटाळणी करावी असाही प्रसंग उद्भवतो. परंतु तळिरामानें सांगितलेल्या इतिवृत्तांत "सुधाकराचा मुद्दा न पटणें" या खेरीज मुन्सफाकडे कोणताही दोष दिसत नाहीं. मुन्सफ त्याला टाकून बोलला, पक्षपातामुळें सुधाकराच्या न्याय्य हक्कांची त्यानें पायमल्ली केली असा कोणताच प्रकार घडला नाहीं. अशा प्रसंगीं खरोखरीच अफाट बुद्धिमत्तेचा आणि पराकाष्ठेचा स्वाभिमानी वकील सुद्धां कधीं मुन्सफाला टाकून बोलत नसतो. ज्या अर्थी सनद रद्द झाली, त्या अर्थी सुधाकरानें चक्क शिवीगाळ करून न्यायमंदिराची बेअदबी केली असली पाहिजे. मुन्सफाला सनद रद्द करतां येत नाहीं खरी, परंतु सुधाकराला पुण्यांतून उचलून मुंबई कोर्टांत ठेवला म्हणजे नाटकांत कोणताही बदल न करतां, एकच प्यालाचा हा एक ठळक दोष नाहींसा होण्यासारखा आहे. परंतु न्यायाधिशाला मुद्दा पटला नाहीं म्हणून त्याच्यावर शिवराळ तोंडसुख घेणें हें कर्तबगारीचें, बुद्धिमत्तेचें किंवा स्वाभिमानाचें लक्षण नव्हे. अगदीं साधारण संस्कृतीच्या आणि बुद्धीच्या वकिलाला सुद्धां न्यायाधिशाला टाकून बोलूं नये हें समजत असतें. स्वतःच्या पायावर उभें राहून नांवारूपाला आलेल्या वकिलाला तर न्यायाधिशाचा निकाल अपीलांत फिरवून घेण्याची हिंमत असते. सारांश सुधाकराची सनद ज्या कारणामुळें जाऊन त्याच्या जीविताच्या शोकांतिकेला सुरुवात झाली, त्या प्रसंगींची त्याची वागणूक रामलालकृत वर्तनाला शोभेशी नाहीं.

वकिलीची सनद जाणें हा त्याचा अत्यंत मोठा मानभंग असल्यामुळें, अपमानाच्या असह्य जाचण्या सुसह्य करण्याकरितां सुधाकर मद्याचा स्वीकार करतो हें सुसंगत आहे. जातां जातां प्रश्न असा उद्भवतो कीं, इतका दारूबाज कारकून सुधाकरानें आपल्या पदरीं ठेवला कसा? "जीवनांत ज्या अनेक चमत्कृति आणि विसंगति दिसतात त्यापैकीं तो एक नमूना आहे," अशी, या वस्तुतः सामान्य आणि सुसंगत घटनेची, क्षीरसागर उपपत्ति सांगतात! परंतु तळिरामासारखा महान् मद्यपी सुधाकरानें कारकून म्हणून स्वीकारावा ही दारूच्या कथानकांत, गडकऱ्यांनीं कदाचित स्वतःच्या नकळत साधलेली, सूचक सुसंगति आहे! "तळीराम (कारकुनींत) हुशार, चलाख (आणि नेहमीच्या आयुष्यांत) जिवाला जीव देणारा" आहे ना! मग त्याच्या खाजगी आयुष्याशीं आपल्याला काय करावयाचें?—हीच सुधाकराची भावना असणार! "व्यसनी आहे—पण त्याच्या गुणाकडे पाहिलं म्हणजे त्याला हजार गुन्हे माफ करावेसे वाटतात," म्हणूनच कित्येक व्यसनी कलावंताकडे एकंदर समाज आणि त्याचे निकटवर्ति स्नेही सहृदय कौतुकानें पहात असतात. कदाचित सिंधूनें आक्षेप घेतला असता, पण "घरांतल्या माणसापलीकडे असलेल्या" नीतिमुळें तिनें तळीरामाच्या व्यसनाकडे दुर्लक्ष केलें असावें. पुढें मागें दारूमुळें नराधम बनलेल्या या कारकुनाचा आपल्या मंगळसूत्राशीं अमंगळ संबंध येणार आहे, हें त्या बिचारीला काय माहित? तळिरामाच्या संबंधांत सुद्धां दारूचा सक्रिय निषेध न करणारी सिंधूची संकोच वृत्ति जशी सूचित होते, त्याचप्रमाणें दारूचें सानिध्य मान्य करणारी सुधाकराची वृत्ति देखील सूचित होते! अशा उदार, उदासीन किंवा उपेक्षात्मक वृत्तीनें तळिरामाचें दारूबाज सानिध्य मान्य करणारा सुधाकरच मद्याचा पहिला प्याला स्वीकारूं शकतो! तळिरामाच्या सहवासामुळें मद्यासंबंधींची त्याची भीड अगोदरच चेपलेली असते, "तुम्हीं घ्या मी नुसता मजेकरितां येऊन बसेन" अशा भावनेनें मद्याच्या मजलशींत सामील होणारा मनुष्यच अखेर मद्याच्या आहारीं जातो! कारण मद्यपान म्हणजे महापातक आणि सर्वनाश, असा दारूबद्दलचा निषेध सुधाकराप्रमाणें त्याच्या मनोभूमिकेंतून आस्ते आस्ते नाहींसा झालेला असतो. जो

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

मनुष्य निकटवर्तियांची दारूबाजी सहन करतो, किंवा जो सुहृदांच्या सहवासलालसेमुळें मद्य-पानाच्या बैठकींत सुरवातीला तटस्थ म्हणून सामील होऊं शकतो तोच प्रसंगविशेषीं मद्याचा पहिला प्याला स्वीकारूं शकतो. " दारूचें नांव निघालं म्हणजे माझ्या पायाची आग मस्तकाला जाते " अशा वृत्तीचा कचदेवच, " बाबांचा राग शांत करण्याकरितां एकवेळ तरी आपल्या प्रेमांत दारू कालवा " ही देवयानीची विनंति ' पद्यवपुषांना लत्ताप्रहार' करून झिडकारूं शकतो ! तळिरामाच्या सहवासानुळें दारूबद्दलची भीति आणि दारूसंबंधीचा निषेध सुधाकराच्या मनांतून नाहींसा झाल्यामुळें पहिला एकच प्याला घेण्यापूर्वी, " संवय वगैरेचा बागुलबुवा मला मुळींच वाटत नाहीं " असा विश्वास तो दाखवितो. म्हणजे संवय लागली नाहीं तर मद्यपानांत कांहीं गैर नाहीं असें मानण्याइयंत त्याचें मन तयार झालें असतें. संवयीचा बागुलबुवा वाटला नाहीं, पहिल्या एकच प्याल्याचा विपरीत अनुभव न येतां थोडा आरामच वाटला, म्हणजेच नवशिका मद्यपी दारूच्या नादीं लागतो.

अशा रीतीनें सुधाकराचा दारूशीं सहवास जडून त्याला मद्यपानाची संवय लागते. परंतु त्या संवयीची सांगतां करण्याकरितां त्यानें तळिरामाच्या नेतृत्वाखालील आर्यमदिरा-मंडळांत सामील व्हावें ही गोष्ट त्याच्या तथाकथित स्वाभिमानाशीं आणि प्रतिष्ठेशीं विसंगत आहे. तो खरोखरच अलौकिक बुद्धिमान, अतीव स्वाभिमानी आणि प्रतिष्ठित असता तर तो आपल्या कारकुनानें भरविलेल्या मजलशींत कधींच सामील झाला नसता. सिंधू घरीं नाहीं म्हणून सुरवातीचा एकच प्याला जसा त्यानें स्वगृहीं प्राशन केला त्याच प्रमाणें सिंधू आणि शरदच्या पुनरागमापर्यंत तरी तो घरींच दारू पीत राहिला असतां आणि त्यानंतर कदाचित् त्यानें एखाद्या सुप्रतिष्ठित दुकानाचा ( Bar ) आश्रय घेतला असता. तो आर्यमंदिरीमंडळांत सामील झाला तो सार्वजनिक दुकानांत गेल्यामुळें निर्माण होणारा लोकापवाद टाळण्याकरितां खचित् नव्हे ! कारण आर्यमदिरामंडळांतील बारा चिल्लर सभासदांसमवेत आणि " हुसेन भटियाऱ्याच्या " समक्ष दररोज दारू प्याल्यावर आपलें व्यसन गुप्त राहील हें त्याच्यासारख्या अलौकिक बुद्धिवानाला खरें वाटण्याचें कारण नाहीं. सुधाकर आर्यमदिरामंडळांत सामील झाला याचें कारण हेंच कीं त्याचा स्वाभिमान त्याच्या स्वतःच्या समजुतीपुरता होता, त्याच्या बुद्धीची आणि संस्कृतीची पातळी फार खालच्या दर्जाची होती, " ह्या खबर गुलामांची—उद्यां त्या लोकांच्या नाकावर टिचून दारू पिऊन कचेरींत जा " असें म्हणणाऱ्या स्तुतिपाठकांची त्याला चटक लागली होती. " माझ्या मानी स्वभावामुळें मी रामलालकडून शिक्षणासाठीं मदत घेतली नाहीं " असें अकारण जाहीर करणारा सुधाकर, नाहीं नाहीं म्हणत कां होईना, त्याची सनद रद्द झाल्यापासून सासऱ्यानें मोकळ्या मुठीनें पाठविलेल्या पैशांचा [पृ. २८] स्वीकार करीतच होता. सारांश, एकेकाळीं तो कांहींसा स्वाभिमानी असला तर व्यवसायांतील सुरवातीच्या यशानें तो मगरूर बनला होता. विद्यार्जनाच्या काळांतील त्याचा करारी बाणा भूतकाळांत जमा झाला होता. एके काळच्या स्वाभिमानी आणि करारीवृत्तीचें, त्याच्या मूलभूत ( inherent ) स्वभावधर्मामुळें मगरूरींत आणि सुखासीन परावलंबित्वांत पर्यवसान झालें होतें. तसें नसतें तर पुण्या-सारख्या शहरांत त्याच्यासारख्या तरुण आणि यशस्वी वकिलाला मित्र नसावेत, चांगल्या मित्रांनासुद्धां त्याची वागणूक असह्य व्हावी आणि त्याला " शत्रूच फार असावेत " असें घडलें नसतें. आपल्या निकटवर्ती नातेवाईकांना ज्यानें घरातून घालवून दिलें तो स्वाभिमानी आणि कर्तबगार असता, तर दररोज रात्रीं दारू प्याला तरी दिवसा कांहींतरी चरितार्थ-साधनेचा उद्योग करीत राहिला असता. सिंधूच्या काबाडकष्टांवर त्यानें आपलें पोट जाळलें नसतें. पक्षकाराच्या पैशांचा अपहार करणाऱ्या एखाद्या गुन्हेगार वकिलाची जरी




अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

कदम कदम बढाये जा।
खुषीसे गीत गाये जा।
जिंदगी पुण्यांतली–
चला–तिथें–लुटो मजा !






पुण्यांतील जेवणाची आणि
राहण्याची उत्कृष्ट सोय !
म्हणजेच
–पूना गेस्ट हौस–
लक्ष्मी रोड, पुणें २.


अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

रद्द झाली तरी एकंदर वकिलवर्गाला त्याजबद्दल अखेर सहानुभूतीच वाटते. परंतु केवळ मुन्सफाला अपशब्द बोलल्यामुळें ज्याची सनद रद्द झाली, त्याची त्याच्या व्यवसाय बंधूंनी हेटाळणी करावी याला सज्जनांना सुद्धां दुखविणारा त्याचा बेमुर्वत मस्तवालपणाच कारणीभूत झाला असला पाहिजे.

त्या नंतर सनद पुनः मिळावयाची त्या दिवशीं तरी कोणताही वकील, किती का दारूबाज असेना, व्यवस्थितपणेंच कोर्टांत गेला असता. आदल्या रात्रीच्या बैठकींत 'भरकचेरींत खेटरानं एकेकाची पूजा करतो...उद्यां दारु पिऊन कचेरींत जातो आणि घेतों पायांतला हातांत' अशी हिंमत सुधाकरानें बांधली असली तरी ती कृतींत उतरविण्याचें कांहींच कारण नव्हतें. त्याच्या त्या संकल्पाला कोणीही विरोध करीत नाहीं, ही गोष्ट आर्यमदिरामंडळाच्या सभासदांची बेफाम आणि बेजबाबदार वृत्तीच दर्शविते. त्या प्रतिज्ञेच्या पालनासाठीं सुधाकर मद्यपान करूनच कचेरींत जातो, वाटेल त्याला वाटेल तें बोलतो आणि आपली सनद कायमची गमावून बसतो! हा स्वाभिमानी सुसंस्कृत मनाचा खेळ म्हणावयाचा कीं एका मस्तवाल नादानाचा व्यसनाधीनतेमुळें झालेला अधःपात समजावयाचा?




सनद गेल्यानंतरच्या प्रवेशांत तळिरामानें त्याचा (ज्याचें मगरूरपणांत रूपांतर झालें आहे असा) स्वाभिमान डिवचला आणि पद्माकर–रामलालाविरुद्ध त्याला चिथावलें. परंतु, "सिंधू कोणाचा पैसा—कोणाचं कांहीं—कांहीं घरांत आणायचं नाहीं" असें बजावण्या इतक्या शुद्धींत तो आहे. अशा स्थितींत सिंधूसारख्या साध्वीसंबंधीं आणि आपल्या पितृतुल्य पाटीराख्यासंबंधीं, "तुमची सनद गेली त्यावेळीं यानें बाईसाहेबांना मिठी मारली" हें तळिरामाचें घाणेरडें वाक्य त्यानें निमुटपणानें ऐकून घ्यावें हें त्याच्या संस्कृतीचें द्योतक कीं स्वाभिमानाचें? कोणताही सुसंस्कृत वकील मद्यप्राशन करून कितीही बेफाम बनला तरी तो कुणालाही आपल्या बायकोच्या गळ्यातलें मंगळसूत्र तोडायला सांगेल काय? हा स्वाभिमानाचा परिपाक कीं बेफाम मवाली वृत्तीचा परिणाम? एकीकडे रामलालची सरबत्ती ऐकून आणि मदिरामंडळांतील किळसवाणे प्रकार पाहून भगीरथ दारू सोडतो, तर सिंधूची अवस्था पाहून आणि गीतेच्या जिभेच्या "चाबकाचे फटकारे" खाऊन दारू सोडण्याची प्रतिज्ञा करतो–या दोन्ही प्रकारांची क्रियापद्धति (modus operandi) सारखीच आहे. त्यानंतरच्या बंडगार्डनच्या प्रवेशांत, ज्यावेळीं एखादा पतित पश्चातापामुळें शुचिर्भूत होऊन पुण्यमार्गाकडे वळतो, त्यावेळीं सहानुभूतिशून्य जग त्याला दूर लोटतें आणि त्यामुळें तो कायमचा पतित बनतो, या वास्तवतेचें दिग्दर्शन गडकऱ्यांनीं अत्यंत उत्कृष्टपणानें केलें आहे, दारु सोडण्याची प्रतिज्ञा केल्यानंतर सुधाकरानें रामलालकडे जाऊं नये हें स्वाभाविकच होतें, कारण रामलालवर त्यानें केलेल्या हीन आरोपांनंतर सुधाकर त्याला तोंड कसें दाखविणार? सुधाकरानें रामलालची भेट घेऊं नये, सिंधूच्या सहवासांत चोवीस तरी घालवूं नयेत, मनाला विरंगुळा वाटावा म्हणून त्यानें बंडगार्डनमध्यें जावें, तिथें त्याची चार गृहस्थांशी गांठ पडावी, नोकरी मागावयाची जी जागा नाहीं अशा ठिकाणीं त्यानें नोकरी मागावी, त्याचा अपमान व्हावा–आणि पुन्हा त्यानें आर्यमदिरामंडळीकडे वळावें हा शोकांतिकेला अवश्य असणारा एक अपघातच समजला पाहिजे. डॅस्डिमोनानें ऐन वेळीं आपला हातरुमाल विसरावा किंवा इंग्लंडला जाणाऱ्या हॅमलेटच्या जहाजावर चाचे लोकांनीं हल्ला करून त्याला डेन्मार्कच्या किनाऱ्यावर आणून सोडावा. अशा प्रकारचा तो अपघात आहे, परंतु—!

दारु सोडल्यावर, "सनद गेली तरी बहेत्तर –मी नुसता कायद्याची सल्लामसलत देऊन (Chamber practice) पैसे मिळवीन –किंवा दस्तैवज तयार करून देईन–किंवा एखाद्या शाळेंत नोकरी पतकरीन–" असा विचार सुधाकर क्षणमात्रसुद्धां करीत नाहीं, हें देखील त्याच्या अफाट बुद्धिमत्तेचें आणि कर्तबगारीचें लक्षण समजावयाचें काय? त्याच्या अफाट बुद्धिमत्तेची साक्ष नाटकांत कुठेंच पटत नाहीं. चौथ्या अंकांतील त्याचें मदिरेसंबंधीचें विस्तृत विवेचन कल्पनाशीलतेचें द्योतक आहे, परंतु त्याप्रसंगीं सुधाकराऐवजीं गडकरीच प्रेक्षकांसमोर उभे राहतात. स्वतःच्या स्वाभिमानाला शोभेशा व्यवसायसाधनेच्या मार्गाचा यत्किंचितही विचार न करतां, बंडगार्डनमधें तो "मद्यपानाच्या खेळांत उगाच ज्या वजनदार लोकांनीं अडल्या वेळीं सहाय्य करण्याची वारंवार वचनें दिलीं त्यांची भेट घेण्याच्या अपेक्षेनें" जातो. अशा वजनदार स्नेह्यांमार्फत "नोकरीची सोय" लावण्याचा मनसुबा त्यानें सिंधूला देखील कथन केला (पृ. ७०). त्यावेळीं देखील आपल्या कायद्याच्या ज्ञानाचाच उपयोग करून पैसे मिळविण्याची त्याला कल्पना सुचली नाहीं. त्याला फार मोठ्या नोकरीची अपेक्षा होती असें नाहीं. "फार झाले पंधरा—" असें म्हणण्यापर्यंत त्याच्या अल्पसंतुष्टतेची आणि स्वतःसंबंधीच्या "स्वाभिमानी आत्मविश्वासाची" मजल गेली आहे! बंडगार्डनमधील चार गृहस्थांनीं त्याला तुच्छतेनें वागविलें. त्याचें कारण तो मद्यपी होता म्हणून नव्हे. असे कित्येक मद्यपी एकत्र आले असतां सार्वजनिक ठिकाणीं खेळीमेळीनें वागतात परंतु दारूच्या व्यसनामुळें सुधाकरानें केलेल्या

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट






पर्ल कंपनी, राणीबाग, मुंबई २७

---

उत्कृष्ट व लज्जतदार **चहा**

स्पेशल बी.ओ.पी. आणि ओ.पी. पॅकेटस्

उत्तम जळाऊ **कोळसा**

जी. आय्. पी., बी. बी. सी. आय्., एच्. एम्. आय्., हॉटेल्स व मोठे मोठे कारखान्यांत सप्लायर्स.

P.R/DB.2

**देसाई ब्रदर्स** ११९-१२१ कांदेवाडी मुंबई, ४

---

हिंवताप, मलेरिया वगैरे तापांवर

# कर्णिक

## एग्युमिक्श्चर—वापरा

उगीच भलतींसलतीं औषधें पोटांत घेऊन तापासारखा रोग लांबणीवर टाकूं नका.

# इन्डोबाम

डोकें दुखणें, लचक, संधिवात, दंतशूळ, सर्दी, विंचूदंश, तसेंच विषारी माशा चावणें वगैरे विकारांवर थोड्याच मलमानें चांगला गुण येतो. इतर बामप्रमाणें उगीच आग होत नाहीं.

**कर्णिक ब्रदर्स, गिरगांव, मुंबई नं. ४.**

---

दैवत कोणतेंही असो उदबत्ती एकच

फुलराणी

सेंटबत्ती व अगरबत्ती

**बॉम्बे अगरबत्ती कंपनी**

सिंप्लेक्स वि.पाववाला स्ट्री. कृष्णसिनेमाजवळ मुंबई नं. ४

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनन्वित अत्याचारांचा डंका पुण्यासारख्या शहरांत वाजल्याशिवाय कसा राहिला असेल ! त्याच्यासारख्या माणसाला पाहतांच त्या व्यक्तींनी पण प्रतिष्ठित गृहस्थांना, "आपलंच पाप भाडवं आलं" असें वाटलें तर त्यांचा काय दोष ?

सुधाकराच्या अनेक प्रलयांची चिकित्सा केली असतां त्याच्या अफाट बुद्धिमत्तेवर आणि संस्कृतीवर अधिक प्रकाश पडेल. हा गृहस्थ बायकोच्या समोर आणि इतरांच्या देखत 'ऋतुमानाच्या' (पृ. ५) आणि 'तुंबलेल्या हक्काच्या रजेच्या' गलिच्छ कोट्या करतो. तळिरामाला 'तूं माझा भाऊ आहेस—बाप आहेस' असा मान देऊन त्याला सिंधूच्या गळ्यांतलें मंगळसूत्र तोडायला सांगतो, सासऱ्याला उद्देशून "त्या थेरड्याला एक लाथ मार—" अशी गटारांत लोळणाऱ्या अशिक्षित आणि असंस्कृत दारुबाजासारखी शिवीगाळ करतो. "या हरामखोरांना हाकलून दे" असें सिंधूला बजावतो. चार गृहस्थांकडे "पट्टेवाल्याची—हमालाची" नोकरी मागतो, "तें कारटं रामलालचं आहे—सिंधू, तूं पतिव्रता नाहींस" असा आपल्या देवतातुल्य पत्नीवर आरोप आणि "आतां कारटं मर जाव" म्हणून आपल्या अबोल अर्भकाला चेंचून टाकतो ! हें एखाद्या मानी, अफाट बुद्धिमत्तेच्या, सरळ, सालस आणि सुसंस्कृत माणसाचें चित्र आहे, कीं मगरूर, असंस्कृत, बेफाम, नादान आणि हलक्या कानाच्या माणसाचें चित्र आहे ?

रामलालनें सुधाकराला ओळखलेंच नव्हतें. भगीरथाला सुद्धां 'हतभागी महाभागा' अशा अतिरंजित भाषेनें संबोधिणारा रामलाल, विचारांच्या आणि उच्चारांच्या बाबतींत अतिरंजनाचा मक्तेदार ठरतो. नाटकाच्या पहिल्याच प्रवेशांत त्यानें सुधाकराच्या स्वभावाचें जें मूल्यमापन केलें आहे, तें जिवलग मित्राच्या दोषांना गुणस्वरूप समजणाऱ्या स्नेहभावाचें आणि अतिरंजित भाषेचें अपत्य आहे. सिंधूची स्थितप्रज्ञता देखील त्याला अजमावितां आलेली नाहीं. सुधाकर मद्यप्राशन करतो असें समजलें तर ती "आपल्या जिवाचा अनर्थपात करील" अशी त्याला भीति वाटते. नाटकांतील एखादें महत्त्वाचें पात्र सुद्धा नायकाचें जें स्वभाववर्णन करतें तोच नायकाचा स्वभाव, असें गृहित धरणें बरोबर नाहीं. आयागोसारखा एखादा खलनायक गैरसमज निर्माण करण्याकरितां ज्या प्रकारची विधानें करतो, त्याच प्रकारची विधानें रामलालसारखा अतिरंजनाचा मक्तेदार करूं शकतो. या संबंधांत ब्रॅडले म्हणतो,

"One must constantly remember not to believe a syllable that Iago utters on any subject including himself, until one has tested his statement by comparing it with known facts or with other statements of his own or other people,... The implicit confidance which his acquaintances placed in his integrity has descended to most of his critics; and this, reinforcing the comical habit of quoting as Shakespear's own statement every thing said by his characters, has been a fruitful source of misinterpretation." हें विधान रामलालकृत सुधाकराच्या अतिरंजित आणि फसव्या स्वभाववर्णनाला लागू पडण्यासारखें आहे.

सबब, गडकऱ्यांचा सुधाकर कसा आहे हें त्याच्या कृतीवरून आणि उक्तीवरूनच ठरविलें पाहिजे, त्याच्या कृतींचें आणि उक्तींचें संशोधन केल्यानंतर, तो जर अत्यंत हीन दर्जाचा मनुष्य ठरला तर त्यामुळें गडकरी—भक्तांना विषाद वाटण्याचें कारण नाहीं. त्याच्या दर्जाशीं गडकऱ्यांच्या प्रतिभेच्या दर्जाचा कोणताही संबंध नाहीं. उलटपक्षी, दारूच्या दुष्परिणामासंबंधीं प्रचारप्रधान नाटक लिहितांना ज्या मगदूराच्या कथानायकाला हातीं धरिलें असतां अत्यंत आवेगाचा अधःपात दाखवितां येईल, असा कथानक गडकऱ्यांनीं जाणूनबुजून निवडलं हें त्यांचें कौशल्यच समजलें पाहिजे. अनेक कुलीन आणि विद्वान् गृहस्थ मद्यप्राशन करतात, परंतु ते आपल्या संसाराची सुधाकराप्रमाणें मसणवटी बनवितात काय ? मद्यप्राशनाची "सुप्रतिष्ठित बाजू" गडकऱ्यांना माहित होती, परंतु ती दाखवून त्यांचें



" साहेब, ह्या सज्जन माणसांना कुणी लुबाडलंय् म्हणे ! "

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

प्रचारकार्य साधलें नसतें. म्हणूनच, ज्याच्या संबंधांत इतका दारुण, भीषण आणि मवाळी अधःपात दाखवितां येईल असा सुधाकरासारखा व्यवसायिक दृष्ट्या यशस्वी पण अव्यवहारी, सुशिक्षित पण अविवेकी, कुलीन घराण्यांतला पण हीन अभिरुचीचा, सकृद्दर्शनीं स्वाभिमानी वाटणारा पण खरोखरीचा मगरूर, कांहीसा कर्तबगार पण बेहिमती, बुद्धिमान पण चंचल वृत्तीचा आणि उतावळेपणानें चुकीचे निर्णय घेणारा, सहानुभूतिशून्य आणि हलक्या कानांचा कथानायक गडकऱ्यांनीं हेतुपुरःसरच निवडला आहे. परंतु रामलालच्या भाषणाला अवास्तव महत्त्व देऊन क्षिरसागर आपल्या आवडत्या सिद्धांताचें प्रतिपादन करतांना म्हणतात, "एकच प्याल्याचा मुख्य विषम म्हणजे एका पाणीदार, बुद्धिवान आणि सरळ अशी पुरुषाची शोककथा...सुधाकराचा अधःपात हा सज्जनाच्या स्नेहशून्य अवस्थेंत जो भेसूर एकलेपणा अनुभवावा लागतो त्याचा परिणाम होय...एक थोर मनाचें आणि अवनत समाजाचें संमिश्र चित्र या दृष्टीनेंच एकच प्याल्यांतील प्रस्तुत-अप्रस्तुत भाग ठरवावे लागतील....एकच प्याल्याचा गाभा म्हणजे बाजारी, निगरगट्ट आणि मठ्ठ जगांत मानी आणि सरळ मनाचा होणारा कोंडमारा !"

हॅम्लेटच्या शोकांतिकेचें मूल्यमापन करितांना E. K. Chambers म्हणतो, ;

"The tragedy of Hamlet dose not lie in the fact that it begins with a murder and ends with a massacre. It is something deeper, more spiritual than that. The most tragic, the most afflicting thing in the world is the ruin of a high soul. This is the theme of Hamlet. It is a tragedy of the failure of a great nature, confronted with a low environment, and so by perversity of things made ineffective and disastrous through its own greatness. Keeping this, the central idea in mind, let us attempt an analysis of the play in which it is set forth."

'Hamlet is no ordinary prince. His spirit has been touched to finer issues. His wit is keen-edged and dipped in irony. His delicacy of moral insight is unusual among the ruder Danes. The keynote of Hamlet's character is the overcultivation of mind. His worship of intellect the absorbing interest in music and theatre, the nervous excitability......It is the tragedy of spiritual impotence, of deadened energies and paralysed will..'

हॅम्लेटच्या स्वभावाचें हें मूल्यमापन अंशमात्रानें जरी सुधाकराला लागू पडत असतें, तर क्षिरसागरांचे विधान वादाकरितां तरी मान्य करितां आलें असतें. आपल्या सिद्धान्ताच्या समर्थनार्थ क्षीरसागर म्हणतात, "नाटकाच्या अधःपाताची हकीकत म्हणावी तर पतितांसंबंधीं वाटणारा अनादर आपल्याला सुधाकराबद्दल वाटत नाहीं—" सुधाकराबद्दल अनादर वाटत नसला तरी त्याच्याबद्दल आदरहि वाटत नाहीं, म्हणूनच त्याबद्दल सहानुभूति वाटते असें म्हणतां येईल. त्याचप्रमाणें तळिरामाबद्दल तरी कुठे अनादर वाटतो ? त्याचें कारणच असें कीं मदिरेच्या "सावजांसंबंधी" अनादर निर्माण करणें हा गडकऱ्यांचा हेतु नसून, त्यांच्या अधःपाताला जी कारण झाली त्या मदिरेबद्दल त्यांना समाजाच्या मनांत भीति आणि तिटकारा उत्पन्न करावयाचा होता. म्हणूनच त्यांनीं एखाद्या कुशल प्रचारकामुळें सुधाकराभोंवतीं थोरपणाचा आभास निर्माण केला आहे, वृत्तीनें त्याला चंचल आणि बेफाम दाखविला आहे आणि सर्व खापर मदिरेच्या डोक्यावर फोडलें आहे. "साऱ्या अनर्थांचं कारण दारूचा हा एकच प्याला" हें त्यांना प्रेक्षकांच्या मनावर ठसवायचें होतें. हजरजबाबी विनोदामुळें ज्याप्रमाणें तळिरामाबद्दल प्रेक्षकांच्या मनांत अनादर निर्माण होत नाहीं, त्याचप्रमाणें पश्चातापदग्ध होऊन सुधाकर सिंधूसमोर दोनदां विनम्र होतो म्हणून त्याज बद्दलहि अनादर निर्माण होत नाहीं. किंबहुना, सिंधू हीच खरी एकच प्याल्याची प्राणज्योत आहे असेंच समजलें पाहिजे.



मुंबई रेडियो स्टेशन 'मुलांचा कार्यक्रम' सादर करीत आहे !

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




# जो गल्लादास तो कालिदास

: लेखक :

— माधवराव जोशी —

●● नाटकांत भरपूर विनोद पाहिजे, प्रेक्षकांची भरपूर करमणूक झाली पाहिजे, नाट्यप्रसंग चालू असतां हंसतां हंसतां लोकांच्या मुरकुंड्या वळवतां आल्या पाहिजेत, इतकी शक्ति असेल तरच नाटकें रंगभूमीवर येतील आणि टिकतील !

मला लहानपणापासून नाटकें पहाण्याची भारी हौस होती. वडलांना नाटकांविषयीं भयंकर तिटकारा असे. तेव्हां चोरून नाटकांचीं पुस्तकें मी बोलावित असे आणि ती वाचीत असे. माझ्या लहानपणची नाटकें व नाटक कंपन्या अजून मला आठवतात. माझ्या आवडीच्या दोन कंपन्या होत्या. 'वाशिमकर नाटक मंडळी' आणि 'नाट्यकला-प्रवर्तक मंडळी.' शेक्सपियरचीं नाटकें 'नाट्यकलाप्रवर्तक' करीत असे; व 'बाजीराव-मस्तानी' इत्यादि खेळ 'वाशिमकर नाटक मंडळी' करीत असे. नाटकाची व नाट्यवाचनाची चटक लावली ती या दोन नाटक कंपन्यांनींच. नाटक वाचण्यांत मी गढून गेलेला असे, तेव्हां माझे वडील माझ्या हातांतलें नाटकाचें पुस्तक फेंकून देत व बजावीत, "मी कांहीं थोडं फार तुला राखून ठेवलं आहे. तुझ्या उदरनिर्वाहाचं साधन करून दिलं आहे, पण जर का तूं या नाटकी लोकांच्या संगतीनं बिघडलास आणि सर्वस्व घालवून भिकेला लागलास तर मी जबाबदार नाहीं." त्यावर मी कशीतरी वेळ मारून नेत असे. १९०९ ते १९११ माझे वडील फार आजारी होते. त्यामुळें मला माझ्या उद्योगांत आणखी फावलें. नाटक-वाचनाबरोबरच मला आपल्या जुन्या कवींच्या कवितांची अत्यंत गोडी वाटून मी त्यांचा निदिध्यास घेतला. मुक्तेश्वर, वामन, मोरोपंत, नामदेव, तुकाराम इत्यादि कवींचें समग्र ग्रंथ निदान चार चार वेळां मी वाचून काढले. 'केकावली' मला अजुन रामरक्षेसारखी पाठ आहे. जुन्या नाटकांची ती भाषा आणि प्रासादिक कवींची ती वाणी यांची तुलना करतां जुन्या नाटकांतलें संवाद आणि पदें यांची मला चीड येऊं लागली. आपणहि एखादें नाटक कां लिहूं नये असें त्यावेळीं मला वाटलें. आणि त्या हिरिरींत मी माझें पहिलें नाटक 'संगीत कृष्णविजय' लिहून काढलें. त्यानंतर 'कर्णार्जुन'. त्यांतली कविता, संवाद इत्यादींवर खूप होऊन श्री. खाडिलकर, श्री. केळकर, श्री. कृ. कोल्हटकर, डॉ. रामकृष्ण भांडारकर यांनीं उत्तमोत्तम अभिप्राय दिले. कोणास हें खरेंदेखील वाटणार नाहीं.

●

१९११ मध्यें माझे वडील हैद्राबाद-बोलारम-येथें निवर्तले. तेव्हां मी माझा बंगला विकून आई, कुटुंब व एक मुलगी यांसह पुण्यास निघून आलों. शनीच्या पाराजवळ भुसाऱ्यांच्या वाड्यांत पहिलें बिऱ्हाड थाटलें. सध्यां 'भारत गायन समाज' तेथें आहे. यावेळीं मी बऱ्याचशा पुस्तकांचा संग्रह केला. माझी गृहस्थिति अगदीं गरिबीहि नव्हे व साधारण मध्यम सुखवस्तूहि नव्हे अशी होती. या सुमारास 'किर्लोस्कर नाटक मंडळी' पुण्यास आली. श्री. शंकर बापूजी मुजुमदार याना माझीं तीं दोन नाटकें मी वाचून दाखविलीं आणि त्यावरचे अभिप्रायहि दाखविले. मुजुमदार यांनीं धाडस करून माझीं दोन्ही नाटकें घेतलीं. धाडस म्हणण्याचें कारण, नाटककार या नात्याची प्रसिद्धी आणि पुण्याई माझ्याजवळ नव्हती. त्यावेळीं ज्या कांहीं दोनचार मोठ्या नाटक मंडळ्या होत्या त्यांचे त्यांचे कवी, नाटककंपनींत जहागिरदारासारखे वावरत. तेव्हां मला वाव कोण देणार ? पण शंकररावांनीं हें धाडस केलें.

माझें पहिलें प्रोज नाटक ' कर्णार्जुन ' हें पुणें येथें किर्लोस्कर थिएटरमध्यें रंगभूमीवर आलें. त्या रात्रीं पुण्यांतील अत्यंत सुशिक्षित समाज माझ्या नाटकास हजर होता. त्यांना माझें नाटक अतिशय आवडलें. पुढें ' कृष्णविजय ' हें संगीत नाटक सातारा मुक्कामीं किर्लोस्कराच्याच रंगभूमीवर आलें. कृष्णशिष्टाईपासून पांडवांच्या राज्याभिषेक येथवरचा काल 'कृष्णविजय'नाटकांत मी घेतला होता. त्यांतील वीर रस,करूण रस, रौद्ररस आणि भयानक रस लोकांना भयंकर आवडले. कारण या नाट-कांत शृंगाराला जागाच नव्हती. किर्लोस्कर मंडळीनें सिनसिनरी, कपडा लत्ता यांत खर्च बराच केला. पुढें पण माझ्या त्या नाटकाचें हरिकीर्तन झालें! कारण त्या दोन्ही नाटकांत शृंगार तर नव्हताच, पण विनोददेखील अज़िबात नव्हता. विनोद कसा लिहावा, हास्यरस निर्माण कसा करावा याची गुरुकिल्ली मला अजूनहि सांपडली नव्हती. पुराणश्रवण, हरिकीर्तन किंवा तत्त्वविवेचन इत्यादि मालेच्या पठडींत माझीं दोन्हीं नाटकें बसलीं व चार पांच महिन्यांतच त्यांचे रंगभूमीवरील प्रयोग बंद पडले. उत्पन्नच घटत घटत चाललें, तर तींच नाटकें रंगभूमीवर बळजबरीनें लावील कोण? पदरमोड करून घेईल असा कोण शाहणा आहे! खेळ बंद पडल्यावर मला परमावधीचें दुःख झालें. माझें कांहींतरी चुकतें आहे याची मनाला रुखरुख लागली. मला ही चूक उमगली आणि मनाशीं मी म्हणालों कीं, गड्या, प्रेक्षक रंगभूमीकडे वळतात ते थकल्या-भागल्या जीवांना विसांवा देण्यासाठीं; चिंता आणि काळजी यांचें पटल दूर करून मनाला विरंगुळा मिळावा म्हणून. आणि अशा आशेनें आलेल्या प्रेक्षकांवर जर मी पुराण, हरिकीर्तन आणि भगवद्गीतेंतलें अगाध तत्त्वज्ञान यांचा तोफखाना सुरू केला तर माझ्या थाऱ्यामोऱ्यास कोण उभें राहणार?

आणि आजहि तोच माझा अनुभव कायम आहे, ठाम आहे आणि खरा आहे. उत्तमोत्तम नाटकें, उदाहरणार्थ मृच्छकटिक, मानाप-मान, एकच प्याला, मूकनायक हीं कीर्तिवंत नाटकें. पण यांतील जर हास्यरसाचे प्रवेश अजिबात गाळले तर हीं नाटकें धुळीस मिळाल्याशिवाय राहणार नाहींत. त्यांतील तत्त्वज्ञान ऐकण्यास कोणीहि शाहाणा प्रेक्षक जाग्यावर राहणार नाहीं. असा माझ्या नाटकांचा कटु अनुभव मला आला आणि लोकांना काय हवें याची अचूक गुरुकिल्ली सांपडली. नाटकांत भरपूर विनोद पाहिजे, प्रेक्षकांची भरपूर करमणूक झाली पाहिजे, नाट्यप्रसंग चालू असतां हंसतां हंसतां लोकांच्या मुर-कुंड्या वळवतां आल्या पाहिजेत; इतकी शक्ति असेल तरच माझीं नाटकें रंगभूमीवर येतील आणि टिकतील असें वाटून मी इंग्लिश फार्साकडे वळलों.

लंडन येथील, टाईम्स बुकक्लब मधून शेरिडनचीं नाटकें, सबंध मर्मेड सिरिज्, कॉंग्रीव्ह, विचर्ले, हेन्री फील्डींग, जॉन ओ कीव, सर विल्यम गिल्बर्ट, यांचीं पुस्तकें मी बोलाविलीं. तसेंच हातखंडा हास्यरसाचा प्राणदाता जो मोलियर त्याचेहीं सबंध ग्रंथ मागविले. यानंतर वक्रोक्ति, विडंबन, निंदा, टवाळी कशी खुबीनें करावी, त्याच बरोबर कठोर टीकाहि कशी लिहावी याचें कसब माहित असलेला राजाधिराज जो जोनॅदन स्विफ्ट त्याचाहि अभ्यास केला. मोलियरचें ' ब्लंडरर ' मला अतिशय आवडलें. त्यांतली जोडी ' विनोद ' नाटकांत शंकरराव व गोपाळरावांच्या रूपानें मी आणली. त्यावेळची सुधारणा, स्त्रीशिक्षण यावर सुंद्राबाईचा क्लब व तिची शाळा या प्रसंगांतून खूप कोरडे ओढले. काव्यांत अतिशय संस्कृत शब्द घालणें, जवळ जवळ संस्कृतच काव्य करणें, तसेंच स्त्रीसौंदर्याचें ठराविक वर्णन करतांना कमल, विमल, लोल, कल्लोल, तोंडलीं, चंद्र, शंख, कर्दळीचे स्तंभ, इत्यादि शब्दांची जी खैरात सुरू होत असे त्याचा सूड घेण्याकरितां वामनराव—इंदिरेची जोडी उभी केली. तसेंच स्त्रियांच्या क्लबांतील भानगडी बाहेर काढण्यासाठीं सगुणा नांवाची मोलकरीण आणि गणू संगीत्या हीं नोकरांची जोडी मी निर्माण केली. एकंदरीनें गोळा-बेरीज, 'विनोद' हें मी प्रथम लिहिलें. तें नाटक वाचीत असतांना अत्यंत प्रसन्न होऊन मी हंसत असे. गड्या, जिंकली रे जिंकली! अहो, जिंकली पण घरांत जिंकली, माझीं दोन नाटकें किर्लोस्कर नाटक मंडळीच्या रंगभूमीवर हापटल्यामुळें ' विनोद ' नाटकाची ही वही हातीं धरणार कोण? त्यावेळेस येथें रामभाऊ सवाई गंधर्वांची कंपनी आलेली होती व त्या कंपनीचे पाठीराखे केशवराव नगरकर, माधवराव केळकर, अशी

दि बँक ऑफ महाराष्ट्र लि. मुंबई
हेड ऑफिस : पुणें.
—: बोर्ड ऑफ डायरेक्टर्स :—
श्री. घों. कृ. साठे, चेअरमन.
श्री. वा. पु. वर्दे, श्री. न. ग. पवार, श्री. श्री. गो. मराठे,
श्री. र. चिं. सोहोनी, श्री. मा. रा. जोशी, श्री. फ. दो. पदमसी,
श्री. म. वि. गोखले, श्री. मा. वि. शहा, श्री. शं. ल. किर्लोस्कर,
— भाण्डवल —
अधिकृत रु. ५०,००,००० खपलेलें रु. २५,००,०००
जमा रु. १२,५०,००० रिझर्व्ह व इतर फं. रु. ३,००,०००
एकूण खेळतें भाण्डवल रु. १, ८०,००,०००
–: शाखा :–
गिरगांव, डेक्कन जिमखाना, खडकी, जळगांव, नागपूर, कोपरगांव, रत्नागिरी, सोलापूर, धुळें, चाळीसगांव व फैजपूर ( पे. ऑफिस )
खालील ठिकाणीं लौकरच शाखा उघडतील.
नासिक, हुबळी, इतवारी ( नागपूर )
बँकिंगचे सर्व व्यवहार केले जातात.
एक्झिक्यूटर व ट्रस्टी कंपनीचे कामास सुरवात झाली आहे.
पी. व्ही. आगाशे,
एजंट–मुंबई.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अशीच मंडळी होती. व यांचा एक छोटासा क्लब किंवा गप्पांचा अड्डा किर्लोस्कर थिएटरजवळच एका माडीवर होता. तरुणपणीं टवाळी, कुचेष्टा, हास्यरसाचे प्रसंग आणि उत्कट शृंगार कुणास आवडत नाहीं? अगदीं जख्ख म्हातारा जरी झाला तरी तारुण्यांतलें ते प्रसंग आठवून तो मनांतल्या मनांत खुदकन् हंसतो. मग ही तर बोलून चालून तरुण मंडळी! एक दिवस काखेंत वही मारून मी त्यांच्या क्लबांत गेलों आणि भीत भीत प्रार्थना केली, "मी एक नाटक लिहिलं आहे 'विनोद' ऐकतां का?" नित्याच्या रिवाजाप्रमाणें दीर्घ श्वास सोडून त्यांनीं तावडतोड उत्तर दिलें, "आज वेळ नाहीं. वाटल्यास तुम्ही रविवारीं दुपारीं तीन वाजण्याच्या सुमारास या." मी परतलों. आतां हा रविवार केव्हां उजाडतो असें मला होऊन गेलें. ठरल्याप्रमाणें त्या दिवशीं मी गेलों. मंडळी जमतच होती. चहापान झालें, मलाहि त्यांनीं आग्रह केला. चहा घेऊन नाटक वाचून दाखविण्याला मी प्रारंभ केला. पहिलाच सीन टेनिसचा. ऐकतांच त्यांचेहि चेंडू हापट्या खाऊं लागले! आणि जे लांब लांब पसरले होते, ते जवळ येऊन बसले. मी तें समग्र नाटक खड्या सुरांत वाचून दाखविलें. पदेंहि गाऊन दाखविलीं! मंडळी बेहद्द खूष झाली. माझा पत्ता देऊन मी निघून आलों. असो. जास्त पाल्हाळ न लावतां एकदम सांगतों कीं, या तरुण मंडळीच्या उत्साहामुळें सवाई गंधर्वांच्या नाटकमंडळीनें माझें तें नाटक प्रथम रंगभूमीवर आणलें. कंपनीनें कपडालत्ता, सीन-सिनरी सुंदर केली होती. नाटकहि छान बसविलें होतें. तालमीच्या वेळीं मीहि हजर असल्यामुळें त्यांत कमीजास्त फेरफार करून मी ते बसवून घेत असें. पहिले खेळास जवळजवळ दोनशें रुपये मिळाले. मला अतिशय आनंद झाला. उत्पन्न मिळालें म्हणून नव्हे, पण नाटकास आलेला प्रेक्षक हंसतां हंसतां आपल्या सीटवरून कोसळून खालीं पडला म्हणून. ही वार्ता गांवांत वाऱ्यासारखी पसरली. दुसरे खेळास ४०० रु. उत्पन्न झालें. पुढें हा आंकडा ७००–९०० पर्यंत गेला. हें त्या काळचे सर्वांत मोठ्या उत्पन्नाचें मान असे. 'विनोद' नाटकाचे पुण्यास एकसारखे ६४ प्रयोग झाले. नाटक चिकार पॉप्युलर झालें. कांहीं कांहीं प्रेक्षक तर हें नाटक लिहिणारा नाटककार आहे तरी कोण, म्हणून मला उत्कंठेनें भेटून जात आणि म्हणत, "महाराज, आपण गुरु आहांत! कंपनीला काय जो गल्लादास तो कालिदास!" महिन्या–सवा महिन्यांत मी सवाई गंधर्वांचा कालिदास ठरलों! त्यावेळीं 'विनोद' नाटकाची २०,००० एडिशन विकली गेली. पुस्तकांत जवळ जवळ चार–साडेचार हजार रुपये मला मिळाले व नाटकाचे साडे तीन हजार!

अशा रीतीनें रंगभूमीवर नाटककार या नात्यानें माझें खरें पाऊल पडलें. आणि मग मी सर्व उद्योग सोडून इंग्लिश नाटकांचा अभ्यास सुरूं केला आणि आजपर्यंत माझा तो आयुष्यक्रम मी सोडलेला नाहीं. नाटकाचा एक खरा अभ्यासू विद्यार्थी म्हणूनच मला मरण यावें ही माझी शेवटची इच्छा आहे!


# संरक्षण!

हल्लींच्या धामधुमीच्या काळांत आपल्या व आपल्या कुटुंबाच्या **संरक्षणासाठीं** दिपवाळीच्या मुहूर्तावर **आपला विमा** पुणें येथील सुप्रतिष्ठित

## कॉमनवेल्थ

मध्येंच **उतरून संरक्षण** घ्या.

**लिहा अगर भेटा**

—: स्पेशल ऑर्गनायझर्स :—

[१] मे. जी. व्ही. पटवर्धन ॲण्ड सन्स, ९ ए. इस्माईल बिल्डिंग, फोर्ट–मुंबई.

[२] मे. टी. वाय्. फडके ॲण्ड सन्स, पांडुरंगवाडी, गिरगांव रोड, मुंबई ४.

**श्री. म. जोशी**
मॅनेजिंग डायरेक्टर.


अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

## नॅशनल इंडियन
### लाइफ इन्शुरन्स कं. लि. कलकत्ता

स्थापना  १९०६



ही दीपावली व नूतन वर्ष आमच्या
असंख्य ग्राहकांना व कार्यकर्त्यांना
सुखाचें व समृद्धीचे जावो—

सेक्रेटरी : एन्. एल्. अमीन

— मुंबई ऑफीस —

नॅशनल इंडियन इन्शुरन्स बिल्डिंग
काळाघोडा, फोर्ट-मुंबई.

## दीपावली भेट

| | |
|---|---|
| तीन तपस्वी............ | प्रभाकर पाध्ये |
| नवी वसाहत................ | प्रा. मा. म. गोरे |
| शिंपले आणि मोती...... | प्रा. अनंत काणेकर |
| झोंपी गेलेला देश....... | टुर्गेनिव्ह |
| प्रतिबिंब..................... | दि. चिं. देशपांडे |
| सुखाचा शोध.......... | वि. स. खांडेकर |
| माझें बालपण......... | मॅक्झिम गॉर्की |
| फरारी................ | राजरत्न जोशी |
| चौघांच्या चार तऱ्हा... | रविंद्रनाथ टागोर |
| जळतें रहस्य.............. | स्टिफेन झ्वायग |
| अटकेपार................... | प्रा. ना. सी. फडके |

आमचा नवा कॅटलॉग मागवा. विनामूल्य पाठवूं.

**स्कूल व कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर.**

<u>चौकशी कां करीत नाहीं</u>

## धी आर्यन चँपिअन इन्शुअरन्स कं. लि.

[ स्थापना : १९३४ ]

मुख्य कचेरी : कोट, मुंबई.

अध्यक्ष : शेठ भोगीलाल एम्. पटेल
आयुष्याच्या विम्यासाठीं अत्यंत आकर्षक योजना !—
तुमच्या गरजा भागवणारी अत्यंत पुरोगामी संस्था

| | |
|---|---|
| **अधीकृत भांडवल** | रु. ५०,००,००० |
| **वर्गीकृत भांडवल** | „ ८,०६,००० |
| **भरणा झालेले भांडवल** | „ ४,७९,५१० |
| **आयुविमा निधी** | „ ५,५०,०००(पेक्षा जास्त) |
| **एकंदर मालमत्ता** | „ १२,००,००० „ |

कंपनीच्या पुर्नघटना योजनेंत कर्तबगार तरुणांना
अत्यंत उत्साहि संधी ! विमाव्यवसाय
करूं इच्छितात त्यांनीं लिहावें.

**डी. एम्. कुमटा**, बी. ए.
व्यवस्थापक,

**जी. एल्. देसाई**, बी. ए.
मुख्य व्यवस्थापक

## स्वातंत्र्यवीर सावरकर

यांचे तेजस्वी लेखणींतून उतरलेले

### दोन क्रांतीकारक पोवाडे

श्री. दलाल यांचीं तीन रंगी मुखपृष्ठें :

| सिंहगड | बाजी प्रभु |
|---|---|
| मूल्य ८ आणे | मूल्य ८ आणे |

दोन्ही पोवाड्यासाठीं रु. १। पाठवा.

प्राप्तिस्थल : बलवंत पुस्तक भाण्डार, गिरगांव नाका,
मुंबई नं. ४

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



: कवि :

गो. ल. आपटे

## उंबराचीं फुलें!

हें काय आश्चर्य! साभार येई
        कसा लेख परतून हा मागुती
सौंदर्य, विद्या जिला लाभलेली
        अशा लेखिकेनें जरी धाडिला!

●

खरी माहिती सांगती साक्षिदार
        नफेबाजिची केस होती जरी
अन् केस शाबीत कोर्टांत होई
        आरोपी जरी लठ्ठसा शेटजी!

★  ★

वेड्यापरी स्वैर नाचावयाला
        असे लागला, काय झालें तरी?
हां, लाभली राहण्या त्यांस जागा
        स्वस्तांत अन् पागडी वांचुनी!
किती आदरें बोलतो, कष्टतो हा
        जणू बांधवांचा असे नौकर
कुणा देव नाहीं मुळीं कष्ट कांहीं
        तरी तो असे गांवचा पोलिस!

●

खुबीनें करी रोज बाजार काळा
        फुगें बँक–खातें फुग्यामारखें
परी वापरी खादि ना, होई ना तो
        समाजांत कॉंग्रेसचा सेवक!

★  ★

असे स्वच्छ पोषाख, बिल्ला तसा
        एक पट्टा गळीं घातलेला असे
आधेला–रुपाया न घेता, सुखानें
        तुम्हाला वरिष्ठास तो भेटवी!

●

करी नौकरी गांठुनी देहु–रोड
        नसे सोबतीला कुणी मैत्रिण
अन् रेलगाडींत तो सभ्यतेनें
        सदा वापरी पासही आपुला!
ऊतारु मुळी घेति ना एक जादा
        सुटे योग्य वेळेस मोटार अन्
वाटेंतही ती कधीं मोडते ना
        न होई कुणा त्रास अत्यल्पही!

●

असे खूप श्रीमंत, प्राप्ती–कराला
        खरी माहिती सर्व तो देतसे
जमा–खर्च जाड्या वह्यामाजि नोंदी
        खरा, स्वच्छ, निर्भेळ, खोटा नसे!

●

मुखे देवतेला स्मरोनी उभा
        राहतो साक्ष देण्यास कोर्टामध्यें
खरी माहिती सर्व सांगून टाकी
        कुणाला भितो ना, न द्रव्यां वश!

अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

ही दिवाळी व नूतनवर्ष आमच्या पॉलिसी होल्डर्सना व शेअर होल्डर्सना सुखाची आणि समृद्धीची जावो !



**धी ग्रेट सोशल**
**लाईफ ॲण्ड जनरल ॲश्योरन्स लि.**

ग्रेटसोशल बिल्डिंग,
सर फिरोजशहा मेहता रोड,
फोर्ट........................मुंबई.
चेअरमन :-शेट जयंतीलाल ओझा.

दि
**इंडस्ट्रिअल ॲण्ड प्रूडेन्शिअल विमा कंपनी लि०.**
**मुंबई**

चेअरमन :-सर चिमणलाल एच्. सेटलवाड.

दीपावलीच्या मंगलप्रसंगीं ह्या सर्वश्रेष्ठ कंपनीची पॉलिसी घेऊन आपला भावी काल सुखमय करा.

माहितीकरितां लिहा :—

व्ही. सी. सेटलवाड,
जनरल मॅनेजर. :

एस्. आर. गद्रे,
: चीफ एजंट फॉर महाराष्ट्र.
३२५ क, सदाशिव, पुणें २.

## आमचीं लोकप्रिय पुस्तकें

| | | |
|---|---|---|
| आपलें अन्न | अनु : श्री. चं. वि. बावडेकर | १—०-० |
| जंगलांतील छाया (कादंबरी) | आचार्य भिसे | ५—०-० |
| सुवर्णतुला (टीकालेख) | श्री. श्री. के. क्षीरसागर | ३—०-० |
| समाजवादाचा फेरविचार | अनु : अनंत काणेकर | १—०-० |
| भारत नेते | अनु : श्री. ना. म. संत | १—०-० |
| **पालकांसाठीं** | | |
| आमचें घर | श्री. ताराबाई मोडक | ०-१२-० |
| बालकांचा हट्ट | ,, ,, ,, | ०-१२-० |
| बालविकास व शिस्त | ,, ,, ,, | १—८-० |
| विचारी बालकें | ,, ,, ,, | १—४-० |
| **नवीन पुस्तकें** | | |
| गांधीजींच्या सान्निध्यांत | श्री. प्रभाकर दिवाण | ४—०-० |
| गांधीप्रणीत अर्थयोजना | अनु: प्रा.वा.कृ. चोरघडे | ३-१३-० |
| **आगामी पुस्तकें** | | |
| मखमालीचा पडदा | श्री. वसंत शांताराम देसाई | |
| गांवगप्पा | ,, उमाकांत भेंडे | |
| दृष्टि आड सृष्टि | सौ. कृष्णाबाई मोटे | |
| **मुलांसाठीं** | | |
| राष्ट्र झेंडा (सचित्र) | ले. कपिला ठाकोर अनु : स्नेहलता भेंडे | |

टेलीग्राम : एव्हर ग्रीन
**पद्म प्रकाशन लिमिटेड**
फिरोजशहा मेहता रोड, मुंबई
टेलिफोन : ३३६२९

## बांबू वारा फ्ल्यूटस्

हल्लीं मिळत नसल्यामुळें त्यांची मागणी कोणी करूं नये परंतु लौकरच
**इंग्लंडहून ब्रासच्या फ्ल्यूट्स**
येतील तरी त्याबद्दल आमचेकडे चौकशी केल्यास आम्हीं आपणांस त्याबद्दल सविस्तर माहिती कळवूं.

**वाराट्यून :** जुन्या झालेल्या रेकॉर्डस् पुन्हां नवीन बनविण्यासाठीं वाराट्यून सोल्यूशन वापरा.
किं. प्रत्येक बाटली. रु. २-०-०

**आनंदजी कल्याणजी वारा**
हार्मोनियम, ग्रामोफोन रेकॉर्डस् वगैरेंचे व्यापारी
हत्ती बिल्डिंग, काळबादेवी रोड. मुंबई २




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



मुलींचा थवा जातसे ज्याच मार्गें
    रुबाबांत मारी दुचाकी तिथें
परी खोकतो ना, करी मस्करी ना,
    असा ब्रह्मचारी असें फांकडा !
सदा वापरी फाटकें वस्त्र अंगीं
    बिचारा असें काटकीळा पुरा
अन् नौकरी रेशनिंग-ऑफिसांते
    इमानें करी रोज तो बापुडा !

●

हिंदूंसवें घेइ मुस्लीम-भाई
    सुखें नांदती भांडती ना कधीं
जरी गर्जना ठोकती ते पुढारी
    किती दाढि, शेंडी उभारुनिया !
जरी राबती रोज ते कामगार
    नसे वाढ कांहीं पगारामधे
तरी जाति संपावरी ना कधींही
    जणूं मूक अज्ञान तीं मेंढरें !



जगीं लोक झाले, सुखी सर्व राष्ट्रें
    अहा ! नांदती बंधुबंधूसम
असें पारतंत्र्यास विश्रांत जागा
    नसें श्वानें-शेंपूटही वांकडें !




लक्षांत असूं द्या
योग्य किंमतींत घड्याळें मिळण्याचें
एकच ठिकाण.
एथें सर्व तऱ्हेची व मेकरची घड्याळें, व प्रेझेन्टेशनला लागणाऱ्या इ. पी. एन. एस. च्या सुंदर वस्तू योग्य किंमतींत मिळतील. व घड्याळे दुरुस्तीचें काम योग्य ग्यारंटीनें केलें जातें.

ॲकमे वॉच कंपनी
कृष्ण भुवन ५१५, सँडहर्स्ट ब्रिज. आपेरा हाऊसजवळ मुंबई ४.







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

| | | |
|---|---|---|
| भाऊ | गुंड आधीं दुसऱ्यास मारतो । पुंड मारल्यास उलट ठोकतो । कोणी मारल्यास रडत वसतो । षंढ तोची जाणावा ॥ | |
| | तुंडाशीं ( तोंडाळाशीं ) व्हावें तुंड । गुंडाशीं व्हावें पुंड । धैर्य धरूनी उदंड । प्रतिकार करावा ॥ | बोध |

# गुंड, पुंड व षंढ !

: लेखक :

**' भाला ' कार भाऊसाहेब भोपटकर**

जगतांतील कोणत्याही मानव समाजाकडे पाहिल्यास, त्यांत तीन मनोवृत्तींचे लोक आढळून येतील. ज्यांना शिक्षणाचा दूरचाही स्पर्श झालेला नसून, जे नेहमीं दांडगाईच्या जोरावर आपला उदरनिर्वाह कसा बसा करीत असतात, अशा मनोवृत्तीच्या बदमाषांना " गुंड " ही संज्ञा प्राप्त झालेली आहे. कोणत्या स्थळीं केव्हां बेबंदशाही माजून आपणांस खून करण्याची, लूट मारण्याची व जाळपोळ करण्याची संधि मिळेल, याची वाट हे गुंड चातकाप्रमाणें पहात असतात. ही संधि गुंडांना मिळतांच त्यांच्या अंतःकरणांत घोरत पडलेला सैतान एकदम जागा होतो व मग इतर सभ्य व सालस लोकांवर ते भयंकर अत्याचार करतात. गुंडांना एकदां मस्ती आल्यावर त्यांना जागच्या जागीं ठेंचणारी व नामोहरम करणारी शक्ति म्हणजे ती पोलिसी किंवा लष्करी शक्ति होय. पण ही शक्ति ' कायदेपाळू ' लोकांना वेळेवर न मिळाल्यास, अशा सालस लोकांचे व त्यांच्या बायकापोरांचे हाल अंगावर शहारे येण्याइतके भयंकर होतात. पोलिसी किंवा लष्करी शक्तीच्या अभावीं कायदेपाळू लोकांचें ऐत्या वेळीं संरक्षण करणारी दुसरी शक्ति म्हणजे त्यांच्या अंतःकरणांत व मनगटांत वसत असलेली मर्दानी मनोवृत्ति होय. गुंडांशीं गांठ पडल्यावर जे वीर पुरुष त्यांच्यांशीं दोन हात करून, एकतर स्वतः मरतात किंवा गुंडांना तरी मारतात, अशा रणझुंजार व्यक्तींना आम्ही " पुंड " हें नांव देतो. गुंड आपण होऊन दुसऱ्यावर दुष्ट हेतुनें हल्ला करतात, तर अशा दुष्टाचा प्रतिकार करण्यासाठीं पुंड आपल्या स्वतःचे जीव धोक्यांत घालतात. पण या दोन्ही वर्गांशिवाय आणखी एक तिसरा वर्ग आहे. तो म्हणजे षंढांचा उर्फ भेकडांचा होय. कोणत्याही समाजांत अशा भेकडांची संख्या इतकी बेसुमार असते कीं, दंग्याच्या वेळीं तिचा काडीचाही उपयोग न होता, उलट पुंडांच्या स्वसंरक्षणाच्या कार्यांत तीं एक मोठी अडचण उत्पन्न होते. गुंडाच्या हातून मरण्याशिवाय दुसरा इतर मार्ग खुला नसतांही, हे असले षंढ गुंडांची पायधरणी करून स्वतःला बकऱ्यासारखे कापून घेतात. त्यांच्या भेकड डोक्यांत असा विचार येत नाहीं कीं, एर्वीतेवीं मरावयाचेंच, तर ' मारतां मारतां ' कां मरूं नये ! पण शिक्षणामुळें, वा श्रीमंतीमुळें किंवा मानसिक दुबळेपणामुळें षंढाच्या अंगांत शेवटपर्यंत वीरश्रीचें तेज चमकत नाहीं व ते नादानपणानें मरून जातात. अशा षंढ लोकांना दंड करण्याचा एकच सोपा मार्ग म्हणजे त्यांच्या दुबळेपणाची जाणीव वेळोवेळीं व जागजागीं, त्यांचा शाब्दिक पाणउतारा करून, त्यांना करून देणें हा होय. षंढ लोक स्वसंरक्षणाच्या प्रत्येक मार्गावरील एक भली मोठी धोंड आहे. त्यांचें दर्शन इतकें भयंकर विषारी असतें कीं, त्यांच्यांशीं संपर्क झाल्याबरोबर ते इतरांनाही आपल्यासारखे तावडतोब भेकड व भित्रे करतात.

वरील विचार सुचण्याचें कारण सोळा ऑगस्ट शुक्रवारीं कलकत्ता येथें झालेली भयंकर कत्तल होय. तो अशुभ दिवस मागील इतर दिवसाप्रमाणें शांतपणें उगवला. तो दिवस सुट्टीचा असल्यामुळें शाळा व कॉलेजे बंद होतीं व सर्व सरकारीं कचेऱ्यांना टाळीं लागल्यामुळें सर्व लहानमोठे सरकारी नोकर घरोघर आपआपल्या बायकापोरांच्या सोबतींत मग्न होते. कोणाच्याही कल्पनेंत वारा वाजेतोंपर्यंत असें आलें नव्हें कीं, आपल्या समक्षच्या आनंदाचा शेवट अवघ्या चार तासांत हाहाःकारांत होईल.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



संकल्प आणि सिद्धि यांत परमेश्वरापेक्षां सैतानाचीच मर्जी उभी असते असा कटु अनुभव या वेळीं आम्हाला आला. नाहीं तर 'भाला'कार भाऊसाहेब भोपटकर यांचा 'पुंड, गुंड व षंढ' हा उपान्त्य पानावरचा, मुद्दाम आर्जवून लिहून घेतलेला लेख अर्ध्यावरच खतम करावा लागला नसता.

भालाकारांचा लेख चतकोरच कां होईना पण तो 'दीपावलीं'त जाऊं तरी शकला परन्तु आमच्या विनंतीनें हातीं आलेले आणि असलेले लेख कंपोज होऊन सुद्धां, मुंबईतील चालूं दुष्ट परिस्थितीमुळें जाऊं शकले नाहींत याचें दुःख आम्हाला शब्दांत व्यक्त करतां येत नाहीं !—

आणि म्हणून, ही आजची परिस्थिती निवळतांच 'दीपावली'च्या असंख्य ग्राहकांचा नि वाचकांचा राग आम्ही दूर करणार आहों एवढेंच तूर्त आम्ही अभिवचन देऊं इच्छितों.

अवघ्या दहापंधरा दिवसांत मजकुराचा 'द्रोणागिरी' या दीडशें पानांच्या द्रोणांत जुळवून उभा केल्याबद्दल नवयुग मुद्रणालयाचे फोरमन श्री. मारुतिराव यांचे, तसेंच तारी, राणे, मुंज, सदाशिवराव वगैरे कामगार बंधूंचे आभार कसे मानावे हें समजत नाहीं.

नवयुग छापखान्याचे संचालक श्री. मोहित, सापळे व अण्णासाहेब बोले यांचा आमच्यावरील लोभ, मौजेचे भागवत बंधू यांचे अढळ पाठबळ, बॉम्बे प्रोसेस स्टुडियोचे श्री. कामत यांचा अकृत्रिम स्नेह, श्री. स. दाभोळकर यांचे संपादकीय सहकार्य, फेमस पिक्चर्सचे श्री.बाबूराव पै, श्री. पी. सामन्त आणि कंपनीचे श्री. पुरुषोत्तम सामन्त व नवयुगचे श्री. बापूराव राजगुरु यांचें प्रोत्साहन–यामुळेंच आज ही 'दीपावली' आम्ही काढूं शकलों !

दीपावलीचे लेखक, मुद्रक, प्रकाशक जाहिरातदार, असंख्य वाचक व हितचिंतक यांना ही दिवाळी सुखसमृद्धीची जावो !

—संपादक

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

ही दिपावली व नवें वर्ष
आमच्या असंख्य आश्रयदात्यांना
सुखसमृद्धीचें जावो !

सर्व प्रकारचीं लिथोचीं कामें, अत्यंत काळजीपूर्वक व चांगल्या प्रकारें तुर्तेच वक्तशीरपणें, करून मिळण्याचें, खात्रीलायक ठिकाण

खा न वि ल क र लि थो प्रे स

५/४३, परमानंदाची वाडी ठाकुरद्वार रोड, मुंबई नं. २

गिल्बर्टस
डायबीटीझ्
क्युअर

जगप्रसिद्ध "गिल्बर्टस डायबिटीस क्युअर" (गिल्बर्टचें मधुमेहावर औषध) आतां हिंदुस्थानांत मिळूं लागलें आहे. हें औषध प्रत्येक अधिकृत अशा व्यक्तींनीं मधुमेहावर अचूक योजना असल्याचें मान्य केलें आहे. मधुमेह कितीहि जुना अगर कायमचा असो या औषधानें साखर जाण्याचें थांबून प्रकृतीवर योग्य तो परिणाम व्हावयास प्रारंभ होतो. हें अमौलिक औषध आजच घेण्यास सुरू करा आणि प्रकृति तजेलदार व निकोप कशी होते तें पाहा. पंधरा दिवस पुरणाऱ्या एका बाटलीची किंमत १० रु. ट. ख. निराळा. सर्वत्र मिळतें.

एजंटस्—पेरी ॲण्ड कं. लि. ग्रँटरोड, मुंबई.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट


अनुक्रमणिका

## दिवाळीस भेट देण्यासाठीं

आजच मागणी करा

[ कादंबरी ]

**ठेंगणें अस्मान** ले. श्रीधर देशपांडे ४ रु.

**मानस-चित्रे** [ कथासंग्रह ] ले. गंगाधर गाडगीळ २॥ रु.

**उपायन** [ कथा व लेख ] ले. मनोहर म. केळकर २॥ रु.

शिवाय मनोहर ग्रंथमाला माहिती पत्रकासाठीं आजच लिहा

**मनोहर ग्रंथमाला कार्यालय**

टिळक रोड, पुणें २.






असंख्य हितचिंतक,

ग्राहक व व्यापारी बंधू यांस:-

सप्रेम नमस्कार वि. वि.

आजपर्यंतच्या आपल्या अमोल सहकार्याबद्दल अत्यंत आभारी आहोंत.

आमचीं नित्योपयोगीं आयुर्वेदिक औषधें हेमकिरण ( सर्वश्रेष्ठ शक्तिवर्धक ) व किरणांगतेल ( बाळ, बाळंतीण व अशक्तांना उपयुक्त मसाज तेल ) हीं आपल्या परिचयाचीं आहेतच. त्या बरोबरच आम्ही हरघडी लागणारीं अशीं औषधें अत्यंत स्वस्त किंमतीनें देण्याची व्यवस्था 'अेकआणा पाकिट' या सिरीजमध्यें नुकतीच केली आहे.

शेवटीं, चालूं दिपवाळी व नुतनवर्ष आपणांस सुखदायक व भरभराटीचें जावो अशी शुभेच्छा व्यक्त करून हें निवेदन पुरें करतो.

कळावें, लोभ असावा हे विनंति

मुंबई केन्द्र:-
१७३ गिरगांव रोड
मुंबई नं० ४

आपले,
पी. लिमये आणि कंपनी
मॅनेजिंग एजन्टस्



दांत शुभ्र व निरोगी होण्यासाठीं मी नेहमीं बिजॉय टूथ पावडर वापरते.

जखम व घाव यावर सुद्धा बिजॉयचा चांगला उपयोग होतो.

-: सोल अेजंटस् :-






EXCELSIOR INDUSTRIAL & GENERAL Co. LTD.
POST BOX 1167 BOMBAY 1

गांवोगांवीं अेजंटस् पाहिजेत.—

स्थानिक विक्रेते:-प्रफुल्ल स्टोअर्स, १ चर्नीरोड, मुंबई ४



शिवणकामासाठी

प्रकाश थ्रेड कं.चा

मजबूत व लोकप्रिय दोरा वापरा!






१९४ डी. गायवाडी गिरगाव मुंबई ४




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

WISH YOU A Happy Diwali

FOR MADHOO MOTORS

- We buy and sell at reasonable price.
- Before buying and selling consult us. It will pay you.
- Exchange your cars "THIS IS THE TIME" We will do the needful for you.

TELEPHONE 30106

MADHOO Motors

GOVERNMENT AUTHORISED DEALER

KAPUR MANSION, HUGHES ROAD, BOMBAY.

(स्थापना १९०९)

अद्यावत्
नमुन्याचीं उत्कृष्ट
रिस्ट वॉचेस,
इलेक्ट्रिक क्लॉक्स, वायंडिंग क्लॉक्स इत्यादि
हरतऱ्हेचीं घड्याळें
खात्रीपूर्वक
मिळतील.

रामदास रामचंद्र आणि कं.
२०, पायधुणी, मुंबई.

मावळंकर ब्रदर्स
लिमिटेड
म्हणजेच सर्व प्रकारचें
कापड



उद्योग मंदिर, २५७ गिरगांव रोड, मुंबई ४.


अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# चंद्रमा पिक्चर्स

" सामर्थ्य आहे च[illegible]चें जो जो करील तयाचें संगीत, प्रणय, आणि विनोद यांची प्र[illegible] मेजवानी देणारा व एकापेक्षां एक खळबळ उडवणाऱ्या प्रसंगांनीं नटलेला चंद्रमा पिक्चर्सचा पहिला प्रभावशाली हिंदी विनोदी बोलपट

## " आपकी सेवामें "

लवकरच रुपेरी पडद्यावर झळकणार

—: निर्माते :—
चंद्रमा पिक्चर्स

—: सूत्रधार :—
श्री. डी. आर. गोखले

—: कथानक :—
श्री. दत्तू बांदेकर,

—: संगीत :—
श्री. डावजेकर,

—: छाया :—
श्री. कुकडे

—: ध्वनि :—
श्री. बाबूराव भालचंद्र

—: दिग्दर्शक :—
श्री. वसंतराव जोगळेकर

—: भूमिका :—
विनोदमूर्ती दिक्षित, केसरी, शांतारिन, सरोज बोरकर, निंबाळकर, सँप्सन्, प्रो, हुब्लांकर, भालचंद्र मराठे, बेबी नलिनी व डी. आर. गोखले.

—: निर्मिती स्थळ :—
प्रकाश स्टूडियोज् अंधेरी

## चंद्रमा पिक्चर्स

[illegible] बिल्डिंग, पारेख स्ट्रीट, मुंबई नं. ४



## नेताजींचें दर्शन

नेताजी सुभाषचंद्र बोस यांचें सदोदित दर्शन घडण्यासाठीं त्यांचें भव्य चित्र आजच घ्या

| | |
|---|---|
| १४ रंगी छपाई | किंमत फक्त |
| १४×२० साईज | १ रुपया |
| जाड कागद | डझनास ९. रुपये |

श्री शिवाजी महाराज, राणा प्रताप, दत्तात्रय वगैरे सुंदर चित्रें मिळतात.

मॉडर्न पिक्चर्स पब्लिशर्स ऑफ इंडिया, मुंबई ४


दिवाळी व नवें वर्ष आपणांस सुखाचें जावो !





पटवर्धन आणि कंपनी लिमिटेड

—ज्युएलर्स—

कल्चर मोती व फॅन्सी दागिन्यांचे व्यापारी

सराफा:—लेडी जमशेटजी रोड, दादर, (बी. बी.) मुंबई. १४.

शाखा:—८६६ सदाशिव पेठ, पुणे. २.




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# सा ख र

साखरे ऐवजी

## शुगरिन् वड्या

वापरा

खालील ठिकाणीं मिळतात—

१ लक्ष्मण वी. जोगळेकर, ३९१ बुधवार, पुणें २

२ मे. पेरी अँड कं. लि., ग्रँट रोड मुंबई, ८

नर्माते—

**डी. दाराशा अँड कं.**

२४ जांबुळ वाडी, मुंबई २.



**अभीष्ट चिंतन**

● आजकाल उच्च दर्जाचें ललित वा इतर [illegible] मराठी भाषेंत लेखकांच्या व धंदेवाईक प्रकाशकांच्या मिरास [illegible] वाचकांपुढें येणें कठीण होऊन बसलें आहे. [illegible] लेखक, तेच तेच विचार, यामुळें मराठी साहित्या[illegible] प्रकारची स्थितप्रज्ञता प्राप्त झाली आहे. स्थित[illegible]ज्ञतेची ही [illegible] फोडून वाचकांना नव विचार सांग[illegible] लेखक महाराष्ट्रांत आज नाहींत असें नव्हें, पण प्रकाशकांच्या अभावीं ते अंधारांत पडून आहेत. अशा लेखकांच्या व अन्य देशीय वा भारतीय लेखकांच्या उत्कृष्ट वाङ्मयकृति स्वस्त मूल्यांत महाराष्ट्र-वाचकांना सादर करणें हा **अभिनव प्रकाशन** चा मूलभूत हेतु आहे.

● **श्रावणांतलें खेडें, वसुधा, अन्नदाता, इन्किलाब जिंदाबाद, अग्निपराग, माती** हीं आमचीं प्रकाशनेंच आम्हीं आपल्या हेतूंशीं कितपत प्रामाणिक राहिलों याची ग्वाही देतील.

आमच्याशीं सहकार्य करणाऱ्या आमच्या असंख्य वाचकांना, नवीन वर्षांत पदार्पण करतांना आम्हीं आश्वासन देतों कीं या वर्षींही तुमच्या आनंदांत व ज्ञानांत भर घालण्यासाठीं **अभिनव प्रकाशन** संस्था झटेल.

**अभिनव प्रकाशन**

रतन हाऊस,

१२ त्रिभुवन रोड, मुंबई ४



Gram. Treaty

# कारमॉग ब्रदर्स लि.

Phone 34301

**बॉम्बे म्यूचिअल बिल्डिंग,**

**हॉर्नबी रोड, मुंबई १**

**पो. ऑ. बॉ. ११७६**

इंपोर्टर्स व एक्स्पोर्टर्स मॅन्युफॅक्चर्स रिप्रेझेंटिव्हस्

**विशेषतः पुढील मालाची आयात करतात.**

इलेक्ट्रिकल सामान, पीसगुडस्, प्रिंटिंगचे सामान, फाऊंटनपेन्स, स्टेशनरी, रंग इत्यादि

इन्शुअरन्स व प्रिंटिंगचें सर्व तऱ्हेचें काम केलें जातें.

शाखा :- **कराची, नवी दिल्ली, कलकत्ता, अलेप्पी, कोचीन, कालिकत.**



●

# भारतीय केशकलाप

प्राचिन भारतांतील केशकलापाचें संवर्धन करण्याची पद्धत, आज युरोपियन देशांत उपयोगांत आणली जात आहे अमेरिका त्यांतल्या त्यांत हॉलीवुडमध्यें भारतीय पद्धतीनें केशकलापाचें संवर्धन केलें जात आहे. भारतांतल्या शोकीन स्त्रीया स्वतःचे केशसौंदर्य वाढविण्यासाठीं 'विम्स'चे सुगधी, हेर ऑईल, ब्रिलियन्टाईन आणि सेंट वापरतात.

**विम्स अँन्ड को.**

**चिराबझार मुंबई नं. २**

●


अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

## बालवाचकांकरितां पुस्तकें

| | आणे | | आणे |
|---|---|---|---|
| रामायण म[illegible]गोष्टी | ४ | चंद्रमोहन व इतर गोष्टी | ४ |
| सुरस नी[illegible]इ. १ ला | ४ | इंदु इति. मनोहर गोष्टी | २॥ |
| २ री ५ आ. ३ री ५ आ. ४ थी ६ | | इसले ते फसले | ४ |
| सचित्र बालकथा | ५ | प्रसाद | ४ |
| एकतीस गोष्टी | ६ | नकुच्या गोष्टी | ६ |
| बावीस गोष्टी | ८ | नंदापरी | ५ |
| नीति कुंज | ५ | चांदा गोन्हा | ८ |
| शिशुकथा | ४ | तिसरी भाकरी | ३ |
| बालगीत भाग १ ला | ५ | अग्रपूजा व इतर गोष्टी | १ रु. |
| ,, भाग २ रा | ७ | दिव्य विहंग | १ रु. |
| माणूस आणि पशु | ६ | कॅप्टन प्रताप भाग १ ला | १। रु. |
| तशी काय झालं ? | ४ | काय म्हणतां ? | ६ आ. |
| मग किनई | ६ | | |

केमकर आणि मंडळी, बुकसेलर्स, पब्लिशर्स व स्टेशनर्स

त्रि. प. रोड, मुंबई नं. ४; ग्रँटरोड ब्रँच मुंबई नं. ७

नूतन वर्षाभिनंदन

## स्वदेशी मालास उत्तेजन द्या

भारतांतील तज्ञ कारागिरांनीं बनविलेला



## * स्वदेशी कॅमेरा *

स्वस्त पण मजबूत
सुंदर नवीन डिझाईन,
या कॅमेऱ्यानें आपण
वाटेल त्या मनपसंत

वस्तूंचा टिकाऊ फोटो २॥×३॥ इंचांत काढूं शकता
सुंदर फोटो न निघाल्यास पैसे परत करण्याची गॅरंटी.
कॅमेऱ्याबरोबर कार्ड, केमिकल्स व माहिती फुकट.

बॉक्स कॅमेरा रु. ६॥
फोल्डिंग रु. १२॥; ट. ख. १-८

**सी. एम्. ब्रदर्स ( डी. २२१ ) अलिगड**

अद्यावत यंत्रसामुग्रीनें व आधुनिक सुखसोयींनी सुसज्ज अशा चित्रपटगृहांतून हिंदुस्तानांतील व पाश्चिमात्य देशांतील अग्रेसर चित्रपट निर्मात्यांचे उत्तमोत्तम चित्रपट दाखविणारी दक्षिण महाराष्ट्रांतील एकमेव संस्था—

●

आमच्या असंख्य चाहत्यांना ही दिवाळी व नवें वर्ष सुखाचें, आनंदाचें आणि भरभराटीचें जावो—

●



# डेक्कन थिएटर्स



बेळगांव फोन नं. ४७







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

